# नवभारत

वर्ष २ रें ]  डिसेंबर १९४८  [ अंक ३ रा



१ रुपया

अनुक्रमणिका















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

वर्ष दुसरें
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रो. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक : श्री. र. ग. जोशी

मुद्रणस्थळ : सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पुणें २ : प्रकाशनस्थळ : नवभारत कचेरी, २९१ शनिवार पुणें २.)






# ‘नवभारत’ डिसेंबर १९४८

## लेखक–परिचय

[या अंकांतील लेखकांपैकीं ज्या लेखकांचे लेख ‘नवभारतां’त या अंकासमवेत पहिल्या प्रथमच येत आहेत, त्यांचा थोडक्यांत परिचय खालीं दिला आहे. बाकीच्या लेखकांचे लेख ‘नवभारतां’त पूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा थोडक्यांत दिलेला परिचय वाचकांस विदित आहेच.—का. सं.]

**प्रा. कृ. ब. निकुम्ब**— धारवाड येथील कर्नाटक कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ‘उज्ज्वला’ या कवितासंग्रहाचे कर्ते.

**डॉ. मा. स. केळकर** (अकोला)— हे आपल्या आरोग्यपद्धतीचे प्रयोग १९१६ सालापासून करीत असून त्यांनीं अनेक जुने रोगी आपल्या उपचारपद्धतीनें बरे केले आहेत. गेल्या वर्षापासून कांहीं महारोग्यांस आपल्या आरोग्यपद्धतीनें उपचार करीत आहेत.

**प्रा. द. रा. बेंद्रे**—सोलापूर येथें डी. ए. व्ही. कॉलेजमध्यें कानडीचे प्राध्यापक. कानडी भाषेंतील अग्रगण्य कवि व समीक्षक.—अलीकडे त्यांनीं मराठींत लिहावयास सुरुवात केली आहे. कांहीं महिन्यांपूर्वी मुंबई साहित्यसंघासमोर झालेल्या त्यांच्या ‘जीवन, नाट्य, व कला’ या विषयावरील प्रतिभाशाली भाषणानें महाराष्ट्रांत मोठें कुतूहल उत्पन्न केलें आहे.

**प्रा. दे. अ. दाभोलकर**— पुणें येथील बृ. म. कॉलेज ऑफ कॉमर्समध्यें अर्थेतिहास (Economic History) या विषयाचे प्राध्यापक.

**प्रा. रा. ना. पुसाळकर**, बी. ए., एल्‌एल्. बी. (कोल्हापूर)—कोल्हापूर लॉ कॉलेजमध्यें प्राध्यापक होते. मराठी नियतकालिकांतून यांचे लेख प्रकाशित झाले आहेत.

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृति-पोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवन-विषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य याचा विनाश न होतां विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

# संपादकीय धोरणाचा खुलासा

प्रा. पुणतांबेकर यांचा 'हिंदु राज्यांतील राज्यसत्ता व धर्मसत्ता : स्थान व संबंध' हा लेख 'नवभारता'च्या सप्टेंबर, १९४८च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्याच अंकांत आचार्य जावडेकर यांचा "धर्मराज्य म्हणजे हिंदुराज्य नव्हे" हा त्या लेखावरील टीकात्मक लेख प्रसिद्ध झाला आहे. ह्या धोरणासंबंधीं प्रा. पुणतांबेकर यांनीं आपलें मत लिहून कळविलें. त्या पत्रामुळें संपादकीय धोरणाचा खुलासा करणें संपादकमंडळास इष्ट वाटतें. म्हणून प्रा. पुणतांबेकर यांचेशीं झालेला पत्रव्यवहार खालीं प्रसिद्ध करण्यांत येत आहे. हा खुलासा झाल्यानंतर गैरसमजास जागा रहाणार नाहीं अशी आशा वाटते.

—कार्यकारी संपादक

## प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर यांचें पत्र

धरमपेठ, नागपूर
५–९–४८

सा. न. वि. वि.

...............

लेखकावर मल्लिनाथी करणारा संपादक– अध्यक्ष असतो अशी आपल्या मासिकाची नवी प्रथा दिसते. त्यांच्या टीकेला उत्तर देणें आपल्या प्रथेनुसार प्रशस्त आहे काय? उत्तररूपानें कळवावें. पत्रोत्तराची वाट पहात आहे. प्रथा नसल्यास दुसऱ्या मासिकांत उत्तर देण्याचा विचार आहे. माझ्या मतें असें खंडनकारी संपादकत्व प्रशस्त नाहीं. स्वतंत्र लेख असावे. कळावें.

आ.
श्री. व्यं. पुणतांबेकर

❋ ❋ ❋

## प्रा. पुणतांबेकर यांना पाठविलेलें पत्र

नवभारत कार्यालय, पुणें
ता. १६–९–४८

स. न. वि. वि.

आपलें ५ ता.चें पत्र पोहोंचलें.

सप्टेंबर अंकांतील आपल्या लेखाला आचार्य जावडेकरांनीं त्याच अंकांत उत्तर दिलें आहे. त्यासंबंधीं आपण आपली नापसंती सूचित केली असून 'असें खंडनकारी संपादकत्व प्रशस्त नाहीं' असें आपण आपलें मत दिलें आहे.

आचार्य जावडेकरांचा लेख त्याच अंकात देण्यांत आमची भूमिका काय आहे हें मी नम्रपणें आपणांपुढें मांडूं इच्छितों. ती पाहून आपल्या नापसंतीची तीव्रता कमी होईल अशी आशा आहे.

आचार्य जावडेकर हे 'नवभारता'चे एक संपादक आहेत. मासिकांत येणाऱ्या एकाद्या लेखासंबंधीं वाचकाच्या दृष्टीनें आणखी एकाद्या बाजूचें वाचकाला दिग्दर्शन व्हावें असें संपादकास वाटत असल्यास तसें संपादकांपैकींच एकानें करणें औचित्याला सोडून आहे असें वाटत नाहीं. विशेषतः एकाद्या वादग्रस्त विषयावर लेख असेल व त्या विषयासंबंधीं दुसरा दृष्टिकोण वाचकांसमोर ताबडतोब येणें अवश्य आहे असें संपादकांना वाटत असेल तर तसें त्या दृष्टिकोणाचें दिग्दर्शन करणें औचित्याला धरूनहि होईल. या भूमिकेनेंच आचार्य जावडेकरांचा लेख त्याच अंकांत दिला.

ही भूमिका लक्षांत घेऊन आपला गैरसमज आपण दूर करावा अशी आपणांस विनन्ति आहे. असें करणें आपणांस नापसंत होईल अशी कल्पनाच आली नाहीं.

आचार्य जावडेकरांनीं मांडलेल्या बाजूवर आपण उत्तर देण्याची इच्छा व्यक्त केली आहे. आपण आपलें उत्तर लिहून पाठवावें अशी विनन्ति आहे. तें वाचून कांहीं नवीन मुद्दे आढळल्यास व तें छाप-



अनुक्रमणिका

त्यानें त्या विषयावरील चर्चेला मदत होणार आहे असें दिसल्यास आम्हीं तें अवश्य छापूं. कळावें, लोभ असावा ही विनंति.

आपला.
वि. म. बेडेकर
कार्यकारी संपादक.

* * *

## प्रा. पुणतांबेकर यांना पाठविलेलें दुसरें पत्र

' नवभारत ' कार्यालय, पुणें
ता. ४-१०-४८

स. नमस्कार वि. वि.

संचालक श्री. शंकरराव देव व संपादक येथें सर्व नुकतेच जमले होते. आपला सप्टेंबर अंकांतील लेख, त्याला आ. शं. द. जावडेकर यांनीं दिलेलें उत्तर, त्याबाबत आपण व्यक्त केलेलें मत, त्याला कार्यकारी संपादकांतर्फे आम्हीं दिलेलें उत्तर–वगैरे सर्व गोष्टींचा आम्हीं सर्वांनीं एकत्र विचार केला. त्या विचाराअंतीं या विशिष्ट बाबतींतील धोरणाबाबत आम्ही जो निर्णय घेतला आहे तो आपणांस कळवूं इच्छितों.

आपल्या लेखावरील आ. जावडेकर यांचे टीकात्मक विचार त्याच अंकांत प्रसिद्ध करण्यास आपली संमति घेऊन आपला लेख प्रसिद्ध केला असता तर गैरसमज होण्यास कारण उरलें नसतें. यावरून आम्हीं असा निर्णय घेतला आहे कीं, एकाद्या लेखासंबंधीं असे विचार त्याच अंकांत प्रसिद्ध करणें अवश्य आहे असें वाटल्यास तसें करण्यास मूळ लेखकाची संमति घेऊन मगच तो लेख प्रसिद्ध करावा.

आपल्या लेखाबाबत अशी योजना झाली नाहीं याबद्दल आम्हांस खेद होतो. आपण आचार्य जावडेकर यांच्या टीकेस तात्त्विक उत्तर दिलें, तर तें आम्हीं प्रसिद्ध करूं हें आपणांस मागें कळविलेंच आहे.

आपला,
वि. म. बेडेकर
कार्यकारी संपादक

ता. क.– ' नवभारता 'चें संपादकीय धोरण सर्वांस कळावें या हेतूनें आपणांमध्यें झालेला यासंबंधींचा पत्रव्यवहार ' नवभारतां 'त छापण्याचें आम्ही योजिलें आहे. आपलें ता. ५।९।४८चें पत्र छापावयास आपली परवानगी द्यावी अशी विनंति आहे.

—कार्यकारी संपादक

* * *

## प्रा. पुणतांबेकरांचें उत्तर

धरमपेठ,
नागपूर
७-१०-४८

सा. न. वि. वि.

आपलें ता. ४ चें पत्र पावलें. माझें पत्र छापावयास हरकत नाहीं. संपादक मंडळाची विशिष्ट ध्येयें, नीतिकल्पना, इतिहासाच्या रहस्याच्या अथवा ओघाच्या विशिष्ट कल्पना आणि समाजरचनेचा विशिष्ट वाद असला तर तीं सर्व आम्हां लेखकांस माहीत पाहिजेत. त्याचप्रमाणें संपादकाचे खंडनमंडनात्मक अधिकार इत्यादिहि कळले पाहिजे. म्हणजे आम्हां लेखकांना लेख लिहिण्याचा विचार करतां येतील. कळावें.

आपला
श्री. व्यं. पुणतांबेकर





प्रा. अ. रा. कामत

# मार्क्सवादाचें एक शतक

## ३) १८७२ ते १९०४*

१८४८ ते १८७१ या धामधुमीच्या कालखंडाच्या मानानें पाहतां हा दुसरा कालखंड शांततेचा गेला असें म्हणतां येईल. लेनिन त्याविषयीं लिहितोः—

"१८७२ ते १९०४ हा दुसरा कालखंड पहिल्याहून वेगळा असल्याचें दिसतें. हा वेगळेपणा त्याच्या 'शांततामय' स्वरूपांत व क्रांतिकारक आंदोलनांच्या अभावांत दिसून येतो. पाश्चात्य राष्ट्रांत भांडवली क्रांति होऊन गेली होती, पौर्वात्य राष्ट्रें अद्याप त्या अवस्थेपर्यंत पोंचलेलीं नव्हतीं." (लेनिन : कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य.)

### 'शांतते'चें कारण

१८७९पर्यंत फ्रान्स, जर्मनी वगैरे युरोपांतील देशांत भांडवलदारी पद्धति रूढ होऊन झपाट्यानें प्रगति करीत होती. क्रांतिकारक आंदोलनें ओसरलीं होतीं. या देशांचे सत्ताधारी आतां बाजारपेठा आणि कच्च्या मालाचे प्रदेश यांसाठीं आशिया आणि आफ्रिका खंडांतील मागासलेल्या प्रदेशांवर साम्राज्य पसरवून जगाची परिसीमा गांठीत होते. जगाची वांटणी पुरी होऊन साम्राज्यवाद्यांची आपसांतील स्पर्धा अद्याप निकराला आली नव्हती. साम्राज्यांतील क्रोडों लोकांची पिळणूक करून पाश्चात्य सत्ताधारी वर्ग गबर होत होता. या लुटीचा कांहीं थोडा हिस्सा स्वदेशांतील कामगारांना चारून वर्गलढ्याची तीव्रता त्याला कमी करतां येत होती. पाश्चात्य राष्ट्रांना हा कालखंड "शांततेचा" आणि "सुबत्तेचा" वाटावा याचें खरें कारण हें असें होतें.

पाश्चात्य राष्ट्रांत याप्रमाणें "सुबत्तेचें" वातावरण पसरल्यामुळें भांडवलदारी उलथून पाडण्यासाठीं झगडा न करतां यापुढील प्रगति "शांततामय" पद्धतीनें होईल अशी खोटी आशा कामगारवर्गाच्या कांहीं विभागांत प्रसृत होऊं लागली. साम्राज्यवादी भांडवलदार या प्रवृत्तीला अर्थातच उचलून धरीत होते. वस्तुतः पिळणारे "धानिक" आणि पिळले जाणारे "कष्टकरी" हा भेद केवळ देशांतल्या देशांत राहिला नसून आतां पिळणारीं "धानिक" पाश्चात्य राष्ट्रें आणि पिळलीं जाणारीं वासाहतिक "कष्टकरी" राष्ट्रें अशी साऱ्या जगाचीच विभागणी होऊन वर्गलढ्याला नवीन, जागतिक स्वरूप प्राप्त होत होतें. परंतु 'धानिक' राष्ट्रांतील सत्ताधारी वर्गाला स्वतःच्या देशांतील वर्गलढा कांहींसा शमवितां आला यांत शंकाच नाहीं.

भांडवली क्रांति प्रथम झाल्यामुळें आणि हिंदुस्थानसारखा जगांतला सर्वांत मोठा संपन्न भाग जिंकल्यामुळें इंग्लंड हें राष्ट्र सर्वांत अधिक "धानिक" बनलें होतें. त्यामुळें तेथें सत्ताधारी वर्गाच्या ताटांतील उच्छिष्टावर पोसलेला एक नवा "उच्चवर्गीय" कामगार–विभाग निर्माण झाला होता. चार्टिस्ट चळवळीचा भर ओसरल्यावर इंग्लंडमधील कामगार-चळवळीचें पुढारीपण या

---

* प्रा. अ. रा. कामत यांचा या विषयावरील पहिला लेखांक 'नवभारता'च्या ऑगस्ट महिन्याच्या अंकांत आला असून हा दुसरा व शेवटचा लेखांक आहे.—का. सं.












विभागाकडे आलें. राजकारणांत "कामगार-प्रागतिक" ('लिबलॅब' ऊर्फ लिबरल-लेबर)-एकजुटीचें किळसवाणें दृश्य दिसूं लागलें. एंगल्सनें १८८२ सालीं लिहिलेल्या पत्रांत पुढील उल्लेख आहे—

"इंग्लंडमधील कामगारवर्गाला साम्राज्यवादी धोरणाबद्दल काय वाटतें, असा तुझा प्रश्न आहे. सर्वसाधारणपणें राजकारणाबद्दल त्याला जें वाटतें तेंच या गोष्टीबद्दलहि. येथें कामगारांचा पक्षच नाहीं, येथें फक्त कॉन्झर्वेटिव आणि प्रागतिक-पुरोगामी (लिबरल-रॅडिकल) आहेत आणि जागतिक बाजारपेठ आणि वासाहतिक परतंत्र देश यांवर आज इंग्लंडची जी मक्तेदारी आहे, त्या मेजवानींत येथील कामगार आनंदानें भाग घेत आहेत."

इंग्लंडची ही मक्तेदारी संपली असली, दोन महायुद्धांत ब्रिटिश साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेला ठोकर बसली असली आणि त्यामुळें कामगारवर्गांत मार्क्सवादी पक्षाचा प्रभाव वाढूं लागला असला, तरी आज शंभर वर्षांनंतरही इंग्लंडमधील कामगार-पुढाऱ्यांची ही भांडवल-धार्जिणी साम्राज्यवादी प्रवृत्ति नाहींशी झालेली नाहीं. ॲटली व बेव्हिन चर्चिल-इतक्याच अभिमानानें साम्राज्यवादी वारसा उचलण्यांत धन्यता मानीत आहेत !

इतर साम्राज्यवादी राष्ट्रांमध्येंहि हीच प्रवृत्ति वावरत होती. अशा रीतीनें वर्गलढ्याची धार बोथटल्यामुळें साम्राज्यधार्जिण्या समाजवाद्यांना हा काळ "शांततेचा" आणि "सुबत्तेचा" वाटावा यांत नवल नाहीं.

### पूर्वेकडील 'साम्राज्यवादी शांतता'

पण आशिया व आफ्रिका यांतील जनतेला हा काळ अर्थातच "शांततेचा" नव्हता आणि "सुबत्तेचाही" नव्हता. ब्रह्मदेश, मलाया वगैरे प्रदेश जिंकण्यासाठीं, चीनची बाजारपेठ काबीज करण्यासाठीं आणि आफ्रिका खंडाचे खरवसाप्रमाणें तुकडे पाडण्यासाठीं पाश्चात्य साम्राज्यवादी भीषण युद्धें करीत होते. साम्राज्यशाहीच्या क्षेत्रांत जबरीनें ओढली गेल्यामुळें या मागासलेल्या प्रदेशांतील अर्थव्यवस्था कोसळून पडत होती आणि त्या जागीं भांडवली प्रगति येऊं शकत नसल्यामुळें तेथील जनतेचें दैन्य व तिच्या हालअपेष्टा हीं सारखीं वाढत होतीं. कच्च्या मालाचा पुरवठा करणारे आणि तयार मालाची हमखास बाजारपेठ असें स्वरूप त्यांस येत होतें. या सर्व गोष्टी पाश्चात्य साम्राज्यवाद्यांनीं सत्ताधारी वर्गाच्या नेहमींच्या राक्षसी पद्धतीनें घडवून आणल्या. या परतंत्र राष्ट्रांत राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या क्रांतिकारक चळवळी अद्याप रुजावयाच्या होत्या. या प्रदेशांची पध्दतशीर पिळणूक करण्यासाठीं आणि अचाट फायदा लाटण्यासाठीं साम्राज्यवादी मक्तेदार पुढील काळांत तेथें भांडवल गुंतविणार, त्यामुळें कांहीं अंशीं कारखानदारी निर्माण होणार आणि यामधून राष्ट्रीय चळवळ उभी राहणार हा अंदाज मार्क्सनें यापूर्वीच केला होता. साम्राज्यवादी राष्ट्रांतील कामगार-क्रांति आणि परतंत्र राष्ट्रांतील राष्ट्रीय क्रांति यांचा परस्परांना पोषक असलेला अन्योन्य-संबंध मार्क्सनें उघड केला होता, याचा उल्लेख मागें आलाच आहे; पण हें सर्व अद्याप व्हावयाचें होतें आणि या परतंत्र वासाहतिक देशांत कामगार-वर्ग उत्पन्न होऊन राष्ट्रीय क्रांतिकारक चळवळीला जोर चढेपर्यंत या पूर्वेकडील राष्ट्रांत "साम्राज्यवादी शांतता" नांदणार हें उघड होतें.

### वाढती कामगार-चळवळ

वरवर पाहतां सर्वत्र "शांतता आणि सुबत्ता" दिसत असली तरी वास्तविक भांडवली व्यवस्थेच्या प्रगतीबरोबर तिचे अंतर्विरोधहि वाढत होते. खुली प्रतिस्पर्धा नष्ट होऊं लागली, भांडवली अर्थव्यवस्था मक्तेदारांच्या हातांत जाऊं लागली. इंग्लंडचें जागतिक वर्चस्व कमी झालें. इतर युरोपियन राष्ट्रें त्या आखाड्यांत उतरलीं, साम्राज्यवादी राष्ट्रांची व्यापारी चुरस तीव्र होऊं लागली, बडी कारखानदारी झपाट्यानें वाढली व तिच्याच जोडीनें कामगार-वर्गहि वाढला त्यामुळें या दोन वर्गांचे हितविरोध अधिक स्पष्टपणें पुढें आले. भांडवली प्रगतीच्या पाठोपाठ कामगार-चळवळ, कामगार-संघटना व समाजवादी चळवळ यांची वाढ होणें अपरिहार्य होतें. भांडवली अर्थव्यवस्थेचे अंतर्विरोध वाढत गेल्यानें कामगार-चळवळीची प्रगतीहि झपाट्यानें झाली.

# मार्क्सवादाचें एक शतक

जगांतील सर्वांत "धनिक" राष्ट्र जें इंग्लंड तेथेंही याचे पडसाद उठल्यावांचून राहिले नाहींत. चार्टिस्ट चळवळीनंतर प्रथमच कामगार-चळवळीमध्यें समाजवादाची—मार्क्सवादाची सुद्धां भाषा निघूं लागली. कामगारांची स्वतंत्र राजकीय संघटना असावी व तिनें पार्लमेंटच्या निवडणुकी लढवाव्या, असें मत प्रदर्शित करण्यांत येऊं लागलें; यामधूनच पुढें सध्यांच्या मजूर-पक्षाचा उदय झाला.

युरोपांतील देशांच्या कामगार—संघटना आरंभापासूनच मार्क्सवाद प्रमाण मानूं लागल्या. कायद्याच्या कक्षेंत बसणाऱ्या सर्व चळवळी करून त्यांनीं आपली ताकद वाढविली. विशेषतः फ्रान्स आणि जर्मनी या देशांत कामगारांचे सामर्थ्यशाली पक्ष प्रस्थापित झाले. याविषयीं लेनिन लिहितोः—

"या कालखंडांत पाश्चात्य देशांत भविष्यकाळांतील घडामोडींची पूर्वतयारी 'शांततामय' पद्धतीनें चालू होती. मुख्यतः कामगारवर्गीय असलेले समाजवादी पक्ष सर्वत्र अस्तित्वांत आले. हे पक्ष भांडवली लोकशाहीचा उपयोग करावयास शिकूं लागले आणि त्यांनीं स्वतःचीं वृत्तपत्रें, स्वतःच्या शिक्षण संस्था, कामगार—संघटना आणि सहकारी संस्था चालविण्यास सुरुवात केली. मार्क्सची शिकवण पूर्णपणें विजयी झाली आणि मार्क्सवादाचा विस्तार वाढला. कामगारवर्गाला आगामी लढ्यासाठीं सज्ज करण्याच्या कार्यांत सावकाश पण सतत प्रगति होत होती." (लेनिन : कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य.)

## दुसरी इंटरनॅशनल

या पायावर १८८९ सालीं नवी आंतरराष्ट्रीय कामगार—संघटना—दुसरी इंटरनॅशनल—स्थापन झाली; पहिल्या इंटरनॅशनलपेक्षां आतां कामगार—संघटनांची ताकद आणि त्यांचा व्याप हीं किती तरी पटींनीं वाढलीं असलीं तरी दुसऱ्या इंटरनॅशनलमध्यें बराच कमकुवतपणा राहिला होता असें म्हटलें पाहिजे. निरनिराळ्या राष्ट्रांतील कामगार-संघटना पहिल्या इंटरनॅशनलच्या वेळेइतक्या एकोप्यानें जवळ आल्या नव्हत्या; फुटीरपणा अधिक झाला होता. तसेंच तिच्या कार्यक्रमांत बरीच अस्पष्टता व संधिसाधूपणा होती, त्यामुळें मार्क्सवादाच्या नांवाखालीं संधिसाधूपणा शिरून ती पुढें पोखरली गेली. आणि या दोन प्रवृत्तींमुळें पहिल्या महायुद्धाच्या सुरुवातीस तिची दिवाळखोरी दृष्टोत्पत्तीस येऊन अखेर ती विलयास गेली. याविषयीं लेनिन लिहितोः—

"भांडवलदारीविरुद्ध क्रांतिकारक उठावाची तयारी करण्यासाठीं पहिल्या इंटरनॅशनलनें (१८६४–७२) आंतरराष्ट्रीय कामगार-संघटनेचा पाया घातला. दुसऱ्या इंटरनॅशलनें आंतरराष्ट्रीय कामगार—चळवळीचा विस्तार वाढविला. पण तिची क्रांतिकारक पातळी तात्पुरती खालावली. संधिसाधू प्रवृत्तींची ताकद तात्पुरती वाढली आणि यामुळें तिचा अधःपात होऊन ती कोलमडली" (लेनिन—तिसरी इंटरनॅशनल व तिचें इतिहासांतील स्थान.)

तरी पण या काळांत कामगार—चळवळीची प्रतिष्ठा वाढली, मार्क्सवादाचा प्रभाव वाढला, यांत शंका नाहीं.

"युरोपांतील समाजवादी चळवळ मुख्यतः कम्युनिस्ट—जाहीरनाम्यांत सांगितलेल्या तत्त्वांवरच उभी आहे", "सायबेरियापासून कॅलिफोर्नियापर्यंत पसरलेल्या सर्व देशांतील लक्षावधि कामगारांनीं जाहीरनाम्यांतील कार्यक्रम अंगीकारिला आहे",

"युरोपांतील आणि अमेरिकेंतील कामगार आपल्या सामर्थ्याचें समालोचन (दुसरी इंटरनॅशनल) करीत आहेत. ...... आजचें दृश्य पाहून सर्व देशांचे कामगार आज खरोखरीच एक झाले आहेत, हें भांडवलदार—जमीनदारांना जाणवत असेल." या शब्दांत एंगल्सनें १८९० सालीं कामगार-चळवळीच्या आणि मार्क्सवादाच्या प्रगतीचें वर्णन केलें होतें.

## मार्क्सवाद आणि सुधारणावाद

कामगार-चळवळीच्या या वाढत्या यशाला भांडवलदार-वर्गाकडून कमालीचा विरोध होणार हें ठरल्यासारखेंच होतें. भांडवली साम्राज्यवादी तिच्यावर समोरून उघड हल्ला करीत होते. तसेंच साम्राज्यवादी प्रवृत्ती कामगार—चळवळींत शिरून आणि मार्क्सवाद सुधारण्याच्या मिषानें मार्क्सवादी पक्षांत घुसून त्यांवर आंतून प्रहार करूं लागल्या.

इंग्लंडमध्यें कामगार-चळवळीवर आणि समाजवादी चळवळींत मार्क्सवादाचें फारसें वजन नसल्यामुळें तेथें मार्क्सवादावर प्रहार करण्यासाठीं मार्क्सवादाचा बुरखा घेण्याचें कांहींच कारण नव्हतें. सिडने वेबचा फेबियनवाद, मॅक्डोनाल्डसारखे उजवे मजूरपक्षीय आणि स्वतंत्र मजूर पक्ष या कामीं पुढाकार घेत होते. मार्क्सवाद (इंग्लंडमधील) कामगार-चळवळीला लागूं पडत नाहीं, सनदशीर पद्धतीनें इंग्लंडमधील कामगारवर्गानें किती तरी हक्क संपादन केले आहेत, अशा प्रकारचे सुधारणावादी विचार मांडून ते एक प्रकारें मार्क्सपूर्वीच्या समाजवादाची उजळणीच करीत होते. ब्रिटिश कामगार-वर्गाची सापेक्ष सुस्थिति, आणि ब्रिटनमधील लोकशाहीचा देखावा हीं हिंदुस्थानसारख्या देशांतील कोट्यवधि दलित जनतेच्या अमानुष पिळणुकीवर आधारलेलीं आहेत, याची दखल या साम्राज्यधार्जिण्या समाजवाद्यांना घेण्याची आवश्यकता वाटली नाहीं. तसेंच भांडवलशाहीचा हा फुलोरा अल्पजीवी ठरणार आहे याची शंका सुद्धां त्यांना येत नव्हती; त्यांचा समाजवाद अश्या तऱ्हेचा पोकळ, श्रमजीवी व भांडवलधार्जिणा समाजवाद होता.

युरोपांतील कामगार-चळवळ मार्क्सवादालाच प्रमाण मानीत होती, तेथें साम्राज्यवादी प्रवृत्तींना अशा प्रकारें मार्क्सवादावर उघड हल्ला चढविणें शक्य नव्हतें. मार्क्सनें प्रथम शास्त्रीय समाजवाद मांडला त्यास पन्नास वर्षें झालीं, आजची परिस्थिति त्या वेळेहून निराळी आहे, मार्क्सवादांत आतां 'दुरुस्त्या' करून तो 'सुधारणें' आवश्यक झालें आहे, अशा प्रकारचे विचार स्वतांला मार्क्सवादी म्हणविणारे युरोपांतील समाजवादी पुढारी प्रदर्शित करूं लागले. याविषयीं लेनिन म्हणतो:—

"ऐतिहासिक घटना अशी घडून आली कीं, मार्क्सवादाच्या तात्त्विक विजयामुळें त्याच्या शत्रूंना मार्क्सवादाचें सोंग घेणें भाग पडलें. यापूर्वी पूर्णपणें सडके ठरलेले प्रागतिक (लिबरल) विचार समाजवादी संधिसाधूपणाच्या रूपानें आपलें पुनरुज्जीवन करूं लागले. हा काळ आगामी महान् लढ्याची तयारी करण्याचा काळ आहे असें न मानतां लढा करण्याची जरूरी नाहीं असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें..." "सामाजिक सलोख्याचा (म्हणजे गुलामांनीं मालकांशीं केलेल्या सलोख्याचा) वर्ग-लढा सोडून देण्याचा आणि असाच इतर प्रचार ते (संधिसाधू) भागूबाईप्रमाणें करीत आहेत. कायदेमंडळाचे समाजवादी सभासद, कामगार-संघटनांतील पदाधिकारी आणि बुद्धिजीवी 'सहानुभूतिदार' यांमध्यें त्यांचे अनेक अनुयायी आहेत."

(लेनिन— कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य.)

## मार्क्सवादाची "सुधारणा"

मार्क्सवाद "सुधारूं" निघालेल्या या 'मार्क्सवाद्यां'चें काय म्हणणें होतें ? भांडवलशाहीचा उत्तरोत्तर विकास होत राहणार असा त्यांस मिथ्याभास झाला होता. पाश्चात्य कामगारांतील कांहीं विभागांनीं कांहीं हक्क मिळविले यावरून एकंदर कामगारवर्गाची परिस्थिति सुधारत आहे असा चुकीचा अंदाज ते बांधीत होते. या तकलुपी आणि तुटपुंज्या सुधारणा साम्राज्यांतील असंख्य प्रजेच्या पिळणुकीवर उभारलेल्या आहेत आणि साम्राज्यप्रसारामुळेंच आर्थिक अरिष्टांची आणि अंतर्विरोधांची तीव्रता तात्पुरती कमी झाली आहे यांकडे त्यांनीं काणाडोळा केला. या ढिसूळ पायावर उभे राहून ते मार्क्सवाद सुधारण्याची बडबड करूं लागले. सार्वत्रिक मताधिकार आणि लोकशाही यांमुळें वर्गलढ्याचें तत्त्व निकामी झालें आहे; समाजवाद प्रस्थापित करण्याकरितां क्रांतिकारक लढ्याची आवश्यकता नाहीं; 'शांततामय' आणि 'सनदशीर' 'उत्क्रांती'नें समाजवाद 'हळूहळू' साध्य होईल, असें या 'सुधारणावादी मार्क्सवाद्यां'चें म्हणणें होतें. कामगारवर्गानें संपादन केलेल्या कांहीं हक्कांकडे बोट दाखवून 'हा कांहीं अंशीं समाजवादच आहे' असें प्रतिपादन करण्यापर्यंत त्यांची मजल गेली. [इंग्लंडमधील मजूर-पक्ष आजहि हेंच म्हणत आहे आणि आपल्याकडील सर्वोदयवादी, सत्याग्रहि समाजवादी व 'लोकशाही' समाजवादी यांचें म्हणणेंहि याहून फारसें वेगळें नाहीं !]








यामुळें दैनंदिन प्रश्न व निवडणुकी यांमध्यें या 'सुधारणावादी' मार्क्सवाद्यांचें राजकारण रुतूं लागलें. "दैनंदिन चळवळ हेंच सर्वस्व, अंतिम ध्येयाला महत्त्व नाहीं" (बर्नस्टाइन) असें म्हणण्यांत ते धन्यता मानूं लागले. जर्मनींतील सोशल डेमोक्रॅटिक पक्षाचा पुढारी बर्नस्टाईन आणि त्यानंतरच्या काळांत कौट्स्की हे या संधिसाधू सुधारणावाद्यांचे अध्वर्यू होते. त्यांच्या नेतृत्वाखालीं जर्मनींतील सामर्थ्यवान् समाजवादी चळवळ आणि कामगार-संघटना जर्मन सत्ताधारी वर्गाच्या आहारीं जाऊन अखेर रसातळाला गेली. पहिल्या महायुद्धांत भांडवलदारांच्या रथाला जुंपून घेण्यांतच त्यांनीं धन्यता मानली आणि त्या वेळीं व युद्धानंतर कामगार-क्रांतीचा विश्वासघात केला. जर्मन राष्ट्र आणि कामगार-चळवळ अद्यापही त्याचे परिणाम भोगीत आहेत. ही संधिसाधू प्रवृत्ति कमी-अधिक प्रमाणांत दुसऱ्या इंटरनॅशनलमध्यें समाविष्ट झालेल्या, मार्क्सवाद मानणाऱ्या सर्व देशांतील कामगार-चळवळींतही होती. पन्नास वर्षांपूर्वी (१८४८सालीं) मार्क्सवाद हा समाजवादी विचार-प्रवाहापैकीं फक्त एक प्रवाह होता; पण आतां सर्वंच कामगार-चळवळींत खरे मार्क्सवादी आणि त्याचे उघड अथवा छुपे (सुधारणावादी) विरोधक असे दोन स्वच्छ तट सर्वत्र पडले, हें एक प्रकारें मार्क्सवादाच्या वाढत्या सामर्थ्याचें निदर्शक होतें असें म्हटलें पाहिजे.

मार्क्सवाद "सुधारण्या"चा हा खटाटोप खुद्द मार्क्सच्या हयातींतच सुरू झाला होता; आणि मार्क्सनें त्यावर जोराचे प्रहार केले होते. या संधिसाधू सुधारणावाद्यांची "मार्क्सवादी" पोपटपंची ऐकून "मी स्वतःच मार्क्सवादी नाहीं" असे अधिक्षेपाचे उद्गार त्यानें काढले होते! जर्मन कामगार-चळवळींतील कायदेमंडळी राजकारणावर आणि एकंदर तडजोडवादी संधिसाधू प्रवृत्तींवर एंगल्सनें कित्येकदां जोराचे कोरडे ओढल्याचें नमूद आहे.

## मार्क्सवादाचा संधिसाधूंशीं लढा

मार्क्स–एंगल्सनंतर रशियांतील मार्क्सवादी पक्षानें या अपप्रवृत्तीशीं लढा देऊन मार्क्सवादाची क्रांतिकारक परंपरा पुढें चालविली. खुद्द एंगल्सनें "रशिया हा आतां युरोपमधील क्रांतिकारक–चळवळीच्या आघाडीवर आहे" असे उद्गार १८९० सालीं काढले होते. लेनिननें या संधिसाधू प्रवृत्तींवर कडक टीकास्त्र धरलें. लेनिन म्हणतो—

"मार्क्सवादी चळवळ दुसऱ्या अर्धशतकांत शिरली, १८९० नंतर तेव्हांपासून मार्क्सवादी चळवळींत शिरलेल्या मार्क्सवादविरोधी प्रवृत्तीशीं लढा द्यावा लागला." (लेनिनः मार्क्सवाद आणि मार्क्सवादाची सुधारणा)

बर्नस्टाईन, कौट्स्की आणि दुसऱ्या इंटरनॅशनलमधील इतर सुधारणावादी आणि प्लेकॉनॉव, मर्तोव वगैरे रशियन मार्क्सवादी यांच्याशीं लेनिनला दीर्घकाळ झगडावें लागलें, आणि अखेर १९३०मध्यें रशियन सोशल डेमोक्रॅटिक पक्षांत दुफळी होऊन लेनिननें क्रांतिकारक मार्क्सवाद पुढें नेणारा बोल्शेविकपक्ष स्थापला. यापुढें मार्क्सवादाची तात्त्विक आणि लढाऊ परंपरा पुढें नेण्याचें कार्य लेनिन आणि बोल्शेविक पक्ष यांनींच मुख्यतः केलें असें म्हणावयास हरकत नाहीं.

## क्रांतिकालाची पहिली सलामी

वास्तविक पाहतां भांडवलशाहीचा जोम आतां ओसरत असल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. खुल्या प्रतिस्पर्धेची जागा जागतिक स्वरूपाच्या भांडवली मक्तेदाऱ्यांनीं घेतली होती आणि साम्राज्यवाद्यांनीं आपापसांत सर्व जगाची वांटणी करून घेतली होती. आतां आर्थिक अरिष्टें तीव्र होणार असा धोका दिसूं लागला होता आणि भांडवलशाहीच्या वेगवेगळ्या देशांतील कमीअधिक विकासामुळें परस्पर स्पर्धा तीव्रतर होऊन त्याचें पर्यवसान शस्त्रास्त्रांच्या उत्पादनाचा वेग वाढण्यांत आणि जगाच्या फेरवांटणीसाठीं जगड्व्याळ महायुद्ध जुंपण्यांत होणार असा स्पष्ट संभव दिसत होता. याचबरोबर तद्देशीय भांडवलदार आणि मध्यमवर्ग निर्माण झाल्यामुळें वासाहतिक राष्ट्रांच्या स्वातंत्र्य चळवळीनें मूळ धरलें होतें. चीनमध्यें सन्-यत-सेननें आरंभिलेली 'चिनी पुनरुज्जीवनाची चळवळ' आणि हिंदुस्थानांतील राष्ट्रीय कॉंग्रेस हीं याचीं पूर्वचिन्हें होतीं. अनियंत्रित झारशाहीच्या तुरुंगांत खितपत असलेली रशियन

आणि रशियनेतर जनता उठावाची भाषा बोलत होती.

भांडवलशाहीची सद्दी संपली होती. "सुबत्ता" आणि "शांतता" यांचें युग शेवटास येत होतें. वेबसारखे उत्क्रांतिवादी आणि मार्क्सवाद "सुधारूं" पाहणारे संधिसाधू मार्क्सवादी यांची "हळूहळू" समाजवाद आणण्याचीं स्वप्नें कायमचीं विरणार होतीं. महायुद्धें, कामगार-क्रांति व वासाहतिक राष्ट्रांचे स्वातंत्र्य–लढे यांनीं भरलेल्या तुफानी युगाकडे सर्व जग झेंप घेत होतें.

१९०५ सालच्या पहिल्या रशियन क्रांतीनें या नव्या क्रांतिकालाची पहिली सलामी दिली.

या नव्या कालखंडाला उद्देशून लेनिन १९१३ सालीं लिहितोः—

"पण 'सामाजिक सलोख्या' (सोशल पीस) ची आणि 'लोकशाही' मध्यें क्रांतिकारक उठावांची आवश्यकता नाहीं, याविषयींचीं संधिसाधू गात असलेलीं स्तुतिस्तोत्रें संपण्यापूर्वींच आशियांत नव्या प्रचंड आंदोलनास सुरुवात झाली आहे. ...

"आशियाच्या मागून युरोपांतहि हालचाल सुरू झाली आहे. १८७२ ते १९०४ हा "शांततामय" काळ पूर्णपणें संपुष्टांत आला आहे, कायमचा संपला आहे. ... शस्त्रास्त्रांची झपाट्यानें होणारी वाढ आणि साम्राज्यशाही राजकारण यामुळें आज युरोपमध्यें नांदत असलेला 'सामाजिक सलोखा' म्हणजे दारूनें भरलेलें कोठार झालें आहे...... आतां सुरु होणाऱ्या ऐतिहासिक कालखंडांत कामगार-वर्गाच्या तत्त्वज्ञानाला–मार्क्सवादाला, पूर्वीपेक्षांहि मोठाले विजय मिळणार आहेत." (लेनिन : कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य.)

लेनिनचे निष्कर्ष तंतोतंत बरोबर ठरले आणि लेनिनच्या नेतृत्वाखालीं झालेल्या सतरा सालच्या रशियन क्रांतीनें मार्क्सवादाला अपूर्व विजय मिळवून दिला याची साक्ष आजकालचा इतिहास देत आहे.

१९०५ नंतरच्या काळाचे तीन भाग पाडतां येतातः— (१) १९०५ सालच्या पहिल्या रशियन क्रांतीपासून १९१७ सालच्या समाजवादी सोव्हिएट क्रांतीपर्यंत (२) १९१८ सालापासून १९४५ सालीं दुसरें महायुद्ध संपेपर्यंत (३) दुसऱ्या महायुद्धानंतर, १९४५ सालापासून पुढें.

## ४) १९०५ ते १९१७.

### १९०५ सालची रशियन क्रांति व तिचें महत्त्व

१९०५ सालची रशियन क्रांति ही या नव्या क्रांतिकालाची ललकारी होती. या वर्षीं रशियन जनतेनें झारशाही उलथून पाडण्याचा निकराचा प्रयत्न केला. कामगारवर्ग क्रांतीच्या आघाडीवर होता; संप, निदर्शनें यांपासून या आंदोलनास सुरुवात झाली आणि मॉस्कोंतील कामगारांनीं सत्ता काबीज करण्यासाठीं उठाव करून आंदोलनाचा कळस गांठला. खेड्यांपाड्यांत अनेक ठिकाणीं शेतकऱ्यांनीं जमीनदारांपासून जमीन हिसकावून घेतली; सैन्य व आरमार यांमध्येंहि असंतोष पसरला; रशियन साम्राज्याच्या टांचेखालीं भरडल्या जाणाऱ्या जनतेच्या सर्व थरांत क्रांतीचें लोण जाऊन पोंचलें.

मार्क्सवादी चळवळीच्या दृष्टीनें या क्रांतीला अतिशय महत्त्व आहे. भांडवलशाहीच्या अंतिम अवस्थेंत वेगवेगळ्या वर्गांचे अन्योन्य–संबंध कोणत्या प्रकारचे आहेत आणि समाजवादी क्रांतिकारक पक्षानें कोणतें धोरण व डावपेंच आंखले पाहिजेत हें या वेळीं स्पष्ट झालें. यापुढील काळांत भांडवलदार-वर्ग भांडवली लोकशाही क्रांति सुद्धां पुरी करणें शक्य नाहीं, तें कार्य कामगारवर्गच तडीस नेणार; आणि म्हणून सरंजामदारी व अनियंत्रित राजसत्ता यांविरुद्ध (भांडवली) लोकशाहीसाठीं होणारा उठाव तावडतोब समाजवादी क्रांतीचा मार्ग धरणार हें निश्चित झालें. [ मार्क्सनें जर्मन क्रांतीविषयीं हाच अंदाज केला होता; पण त्या वेळीं भांडवली विकास खुंटला नसल्यामुळें कामगार–क्रांति यशस्वी होणें दूरापास्त होतें. ] सतरा सालच्या क्रांतींत आणि आज पूर्व युरोपांतील देशांत तेथील मार्क्सवादी पक्षांनीं हें प्रत्यक्ष कृतींत आणून समाजवादी क्रांति यशस्वी केली, तर उलट जर्मन समाजवादी पक्षानें १९१८ सालीं संधिसाधू धोरण स्वीकारून समाजवादी क्रांति थोपवून धरण्याचा प्रयत्न केला आणि जर्मन क्रांति अयशस्वी केली, यांवरून याची सत्यता पटते.

# मार्क्सवादाचें एक शतक

समाजवादी क्रांति यशस्वी होण्यासाठीं कामगार वर्गाच्या नेतृत्वाखालीं शेतकरीवर्गहि क्रांतींत सामील झाला पाहिजे, ही दुसरी गोष्ट प्रत्ययास आली. १८४८ सालच्या फ्रेंच क्रांतीचें विवेचन करतांना मार्क्सनें याचा पुढील शब्दांत उल्लेख केला होता. "शेतकरी आणि मध्यम वर्ग हे भांडवलदारांविरुद्ध उठून कामगारांच्या नेतृत्वाखालीं क्रांतींत सामील झाल्याशिवाय फ्रेंच कामगार भांडवलशाहीच्या केंसालाही धक्का लावूं शकत नव्हते." (मार्क्स : फ्रान्समधील वर्गलढे.)

फ्रान्ससारख्या उद्योगप्रधान देशांत जी गोष्ट आवश्यक होती, ती रशियासारख्या शेतकीप्रधान देशांत तर अनेक पटींनीं आवश्यक होती. रशिया-सारख्या देशांत जमीनदारीविरुद्ध शेतकुळें आणि शेतमजूर यांच्या रूपानें प्रचंड क्रांतिकारक शक्ति वसत आहे आणि त्यामुळें कामगारांची शेतकरीवर्गाशीं क्रांतिकारक एकजूट घडून येणें हें जसें आवश्यक आहे तसेंच (योग्य धोरण आंखल्यास) शक्यहि आहे, हें रशियन क्रांतींत दिसून आलें. "कामगारवर्गाच्या नेतृत्वाखालीं शेतकरी-वर्गाशीं एकजूट" हें यापुढील मार्क्सवादी चळवळीचें महत्त्वाचें धोरण बनलें. सतरा सालची क्रांति, दुसऱ्या महायुद्धानंतर झालेल्या पूर्व युरोपांतील क्रांत्या, आजचा चिनी क्रांतीचा मोर्चा आणि हिंदुस्थान, ब्रह्मदेश वगैरे देशांतील सध्यांचीं क्रांति-कारक आंदोलनें यांवरून वरील गोष्टींचें आत्यंतिक महत्त्व नजरेस येतें.

पांच सालच्या रशियन क्रांतीनंतर मार्क्सवादी चळवळीचा राष्ट्रीय स्वयंनिर्णयाविषयींचा दृष्टिकोनहि स्पष्ट झाला. लेनिन व स्तालिन यांनीं राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय यांविषयीं असंदिग्ध भूमिका घेतली. साम्राज्यशाहीविरुद्ध होणारे राष्ट्रीय स्वातंत्र्याचे क्रांतिकारक लढे समाजवादी क्रांतीला कसे पोषक आहेत, हें त्यांनीं स्पष्टपणें निदर्शनास आणलें; पण त्याचबरोबर कामगार-क्रांति झाल्या-वरच स्वयंनिर्णयाचें तत्त्व संपूर्णपणें अंमलांत येणें शक्य आहे असाहि इषारा त्यांनीं दिला. सतरा सालची क्रांति यशस्वी होऊन पूर्वी "राष्ट्रांचा तुरुंग" म्हणून संबोधिल्या जाणाऱ्या झारशाहीच्या जागीं समानतेच्या पायावर उभारलेलें बलिष्ठ सोव्हिएट-संघराज्य निर्माण झालें, यांत ह्या मार्क्स-वादी शास्त्रशुद्ध भूमिकेचा अचूकपणा दिसून येतो.

**भांडवली लोकशाही क्रांतीचें समाजवादी क्रांतींत ताबडतोब रूपांतर, कामगारवर्गाच्या नेतृत्वाखालीं कामगार-शेतकऱ्यांची अभेद्य एकजूट आणि राष्ट्रीय स्वयंनिर्णयासंबंधीं शास्त्रशुद्ध दृष्टिकोन** हीं यापुढील काळांत मार्क्स-वादी चळवळीचीं तीन महत्त्वाचीं अंगें बनलीं.

## भांडवलशाहीची मृत्युघंटा

पांच सालच्या रशियन क्रांतीनें पुढील काळांत मार्गदर्शक ठरणारी आणखी एक गोष्ट दाखविली; ती म्हणजे क्रांतीनंतरच्या कामगार-सत्तेचें स्वरूप. पांच सालच्या क्रांतींत रशियन कामगार, शेतकरी आणि इतर जनता यांनीं 'लोकसमित्या' (सोव्हि-एट्स्) या क्रांतिकालीन संघटना उभ्या केल्या. सतरा सालच्या सोव्हिएट-सत्तेचा उगम या पांच सालच्या सोव्हिएट्स्मध्यें आहे. पॅरिस-कम्यूनच्या वेळीं आलेल्या अनुभवांत सोव्हिएटस्ची भर पडली आणि क्रांतिकालीं आणि नंतर कामगारवर्गानें हातीं घेतलेला राजदंड कोणतें रूप धारण करील याची कल्पना अधिक स्पष्ट झाली. म्हणूनच भावी क्रांतीची "रंगीत तालीम" असें तिचें सार्थ वर्णन करण्यांत येतें.

समाजवादी क्रांतीला पुढें ज्या प्रश्नांना तोंड द्यावें लागणार ते सर्व पांच सालच्या रशियन-क्रांतींत अनुभवास आले. हे अनुभव जमेस धरूनच लेनिन, स्तालीन आणि बोल्शेविक पक्ष यांनीं मार्क्सवादाचा क्रांतिकारक मोर्चा पुढें नेला. साम्राज्यशाहीचा काळ जवळ आला, भांडवली अर्थव्यवस्थेचें आयुष्य खलास झालें, असें खणखणीतपणें बजावून सांग-णारी भांडवलशाही समाजव्यवस्थेची ती मृत्युघंटा होती. ती अयशस्वी झाली तरी तिचे निनाद सर्व जगभर उमटले; युरोपांतील कामगार-चळवळ आणि पूर्वेकडील परतंत्र राष्ट्रांची स्वातंत्र्याची चळवळ यांवर तिचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं.

## महायुद्धाचे वारे

विसाव्या शतकाच्या आरंभास मक्तेदारीनें सर्व भांडवली जग व्यापून टाकलें आणि भांडवली अर्थ-

व्यवस्थेचा विकास खुंटला; आर्थिक अरिष्टें तीव्रतर होऊं लागलीं. जगाच्या फेरवांटणीचा सवाल पुढें आणून साम्राज्यशाही राष्ट्रें शस्त्रास्त्रांची तयारी जोरानें करूं लागलीं. "स्पेन–अमेरिका युद्ध (१८९८), इंग्रज–बोअर युद्ध (१९००–१९०२), रशिया–जपान युद्ध (१९०४–५) आणि १९०० सालचें युरोपांतील आर्थिक अरिष्ट हीं या नव्या काळाचीं पूर्वचिन्हें होतीं." (लेनिन)

पण जगाची फेरवांटणी करण्याच्या मार्गांत आतां एक मोठाच अडथळा उभा राहत होता. तो म्हणजे या वासाहतिक राष्ट्रांतील लोकजागृति. पूर्वेकडील परतंत्र देशांत राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं जोमदार चळवळी उभ्या राहत होत्या. १९०८ सालीं लो. टिळकांना मंडालेस हद्दपार करण्यांत आलें, तेव्हां मुंबईच्या कामगारांनीं तीन दिवस हरताळ पाळला. 'हिंदी कामगारवर्गाचें पहिलें राजकीय निदर्शन' असें लेनिननें या संपाचें वर्णन केलें. सन्–यत्–सेनच्या नेतृत्वाखालीं १९११ सालीं चीन देशांत देशव्यापी क्रांतिकारक आंदोलन सुरू झालें. आशियांतील जागृतीचें महत्त्व सांगतांना लेनिन म्हणतोः—

"चिनी लोकसत्ताक राज्याचे लचके तोडण्यासाठीं आज अनेक "सुधारलेले" लांडगे जबडे वासून उभे आहेत. या महान् चीन देशाचें भवितव्य अद्याप ठरावयाचें असलें तरी एक गोष्ट मात्र निश्चित आहे. आशियाटिक अथवा तत्सदृश राष्ट्रांतील ही (नवोदित) शौर्यशाली लोकसत्ता नष्ट करण्याची अथवा आशियांत पूर्वीची गुलामगिरी पुनः लादण्याची ताकद जगांत आतां कोणालाहि नाहीं....

ज्या ध्येयासाठीं युरोप लढत आहे त्यासाठींच आज आशियांतील ऐंशी कोट जनता त्याच लढ्यांत ओढली जात आहे. या घटनेमुळें आपणांस स्फुरण चढलें पाहिजे.— " (लेनिन : कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य.)

भांडवलशाहीचे अंतर्विरोध याप्रमाणें तीव्रतर होऊं लागले तशी युरोपांतील कामगार–चळवळ अधिक लढाऊ स्वरूप धारण करूं लागली. ब्रिटन-सारख्या "धनिक" राष्ट्रांतही मोठाले संप होऊं लागले. रशियांत पांच सालच्या अपयशांतून आलेलें शैथिल्य केव्हांच नाहींसें होऊन कामगार–चळवळीनें पुनः उग्र स्वरूप धारण केलें आणि १९१४ च्या जुलै महिन्यांत पेट्रोग्राड शहरांत पुनः मोर्चे उभे राहिले तेव्हां हा पेंचप्रसंग चुकविण्यासाठीं भांडवल-शाहीला महायुद्धाशिवाय दुसरा उपाय राहिला नाहीं. सर्व जग महायुद्धांत लोटून भांडवलशाही अर्थव्यव-स्थेनें स्वतःची दिवाळखोरी सिद्ध केली.

## दुसऱ्या इंटरनॅशनलची दिवाळखोरी

अशा वेळीं समाजवादी चळवळीचें कर्तव्य अगदीं स्पष्ट होतें. १९१२ सालीं दुसऱ्या इंटरनॅशनलच्या बॅस्ले येथें भरलेल्या परिषदेंत याविषयीं अगदीं निःसंदिग्ध ठराव सर्वानुमतें पास झाले होते. बॅस्ले-जाहीरनाम्यांत "भांडवलदारांच्या फायद्याकरितां" आगामी युद्धाची तयारी केली जात आहे असें म्हणून या युद्धाचें स्वरूप साम्राज्यवादी व लुटारू असल्याचें घोषित केलें होतें. इतकेंच नव्हे तर, कामगारांनीं 'एकमेकांवर गोळ्या झाडणें' हा 'अक्षम्य गुन्हा' होईल असेंहि बजावण्यांत आलें होतें. या युद्धांत राजकीय आणि आर्थिक पेंचप्रसंग निर्माण होणार आणि जनतेला जागृत करून "भांडवली सत्तेचा शेवट जवळ आणण्याकरितां या पेंचप्रसंगाचा उपयोग करून घेतला पाहिजे" असा समाजवादी चळवळीला स्पष्ट आदेश देण्यांत आला होता.

कौट्स्की, नोसेक, शायेडमान, यांसारख्या संधिसाधू पुढाऱ्यांनीं हा जाहीरनामा कामगारांच्या वाढत्या जागृतीच्या दडपणामुळें आणि स्वतःचा मार्क्सवादी बुरखा टिकविण्यासाठीं केला होता, हें महायुद्ध सुरू होतांच दिसून आलें. या सर्व "समाजवाद्यां"नीं या साम्राज्यवादी युध्दांत आपापल्या सत्ताधाऱ्यांना पाठिंबा दिला. सर्व साम्राज्यशाह्या नष्ट होऊन तिची जागा एकच जागतिक साम्राज्यशाही घेणार आहे, तिच्यामधून समाजवाद अवतरेल, असें परिस्थितीचा बिलकुल आधार नसलेलें शाब्दिक जडजंबाल पुढें माजवून आपली फितुरी व आपला कामगार–द्रोह झांकण्याचा प्रयत्न ते करूं लागले. क्रांतिकारक परिस्थिति तीव्र होऊं लागली कीं भांडवल-धार्जिण्या "समाजवाद्यां"चे मारेकरी सत्यस्वरूप तावडतोब








उघडें पडतें, हें लेनिननें १९०८ सालीं केलेलें इषारे-वजा भाकित याप्रमाणें खरें ठरलें. यानंतरच्या काळांतहि हा अनुभव आणखी अनेकदां आला आहे. या अधःपातानंतर दुसरी इंटरनॅशनल नामशेष होणें क्रमप्राप्तच होतें.

**पहिलें समाजवादी राज्य**

लेनिन व स्तालिन यांच्या नेतृत्वाखालील रशियन बोल्शेविक पक्ष आणि इतर देशांतील लहान लहान गट यांनीं या संधिसाधू भांडवलदारांची दिवाळखोरी जगजाहीर करून आणि कामगार-चळवळीसमोर विरोधी क्रांतिकारक कार्यक्रम मांडून मार्क्सवादाची परंपरा राखली आणि पुढें नेली. महायुद्धांतून क्रांतिकाल जवळ येत आहे, भांडवल-शाहीच्या अंतिम अवस्थेंत एकेकट्या देशांत समाज-वादी क्रांति यशस्वी होणें शक्य आहे, हे निष्कर्ष प्रतिपादन करून त्याकरितां " साम्राज्यशाही युद्धाचें यादवी युद्धांत रूपांतर करा " " भांडवलदारांनीं कामगारांच्या हातीं एकमेकांना मारण्यासाठीं दिलेल्या तोफांचीं तोंडें वळवून त्या भांडवलदारांवरच रोखल्या पाहिजेत " अश्या घोषणांच्या द्वारा त्यांनीं स्पष्ट कार्यक्रम मांडला. ते आगामी समाजवादी क्रांतीच्या तयारीला लागले.

युद्धकाळ लांबत चालला तसतसा जागतिक साम्राज्यशाहीचा पेंचप्रसंग तीव्रतर होत गेला, दलित जनता अधिकाधिक जागृत होत गेली व क्रांतिकारक परिस्थिति निर्माण झाली. सतरा सालीं साम्राज्यशाही साखळदंडाचा झारशाही "कच्चा दुवा" तुटला. लेनिनच्या नेतृत्वाखालीं मार्क्सवादी बोल्शे-विक पक्षानें रशियावर कामगारक्रांतीचें निशाण फडकविलें.

सतरा सालच्या बोल्शेविक क्रांतीनें सर्व भांडवली जग हादरलें. रशियन-क्रांतीमागोमाग आणि विशे-षतः युद्धसमाप्तीनंतर जगभर क्रांतिकारक आंदो-लनांची एकच लाट उसळली. जर्मनींत कामगार-क्रांतीची उठावणी झाली, हंगेरींत सोव्हिएट–राज्य स्थापन झालें ( पण तें अल्पकालिक ठरलें ) आणि इतरत्र कामगार-चळवळीनें उग्र स्वरूप धारण केलें; पण रशियाशिवाय इतर देशांत कामगार–चळवळीचें नेतृत्व सोशल डेमोक्रॅटिक पक्षाच्या संधिसाधू पुढा-ऱ्यांकडे होतें. युद्धानंतर नव्यानें स्थापन झालेले कम्युनिस्ट पक्ष अद्याप देशाच्या राजकारणांत प्रभावी बनले नव्हते. यामुळें रशियाखेरीज इतर ठिकाणीं समाजवादी क्रांति यशस्वी होऊं शकली नाहीं. याचबरोबर युरोपांत आणि चीन, हिंदुस्थान, ईजिप्त व मोरोक्को वगैरे परतंत्र वासाहतिक देशांत राष्ट्रीय स्वातंत्र्याकरितां जोरदार आंदोलनें सुरू झालीं.

रशियन क्रांति बुडविण्यासाठीं चर्चिलप्रभृति साम्राज्यवाद्यांनीं जंग जंग पछाडले ! अनेक भांडवली राष्ट्रांनीं आपलीं सैन्यें सोव्हिएट प्रदेशांत घुसविलीं. पण पॅरिस–कम्यूनप्रमाणें रशियन क्रांति अयशस्वी करण्यांत त्यांना यश येणार नव्हतें. भांडवलशाहीची ताकद कमी झाली होती; साम्राज्यांतील परतंत्र देशांतील स्वातंत्र्याच्या चळवळी त्यांच्या सत्तेला शह देत होत्या; त्यांच्याच देशांतील कामगार-वर्ग पहिल्या कामगार-राज्याविरुद्ध चाललेलें आक्रमण हटविण्यासाठीं सज्ज झाला होता आणि सोव्हिएट–जनता आणि मार्क्सवादी बोल्शेविक पक्ष यांनीं लेनिनच्या नेतृत्वाखालीं शत्रूंशीं पांच वर्षें लढून परकीय आक्रमण परतवून लावलें.

पहिली समाजवादी क्रांति यशस्वी झाली. पहिलें कामगार राज्य चिरस्थायी झालें. १८४८ साला-प्रमाणें साम्यवाद (कम्युनिझम्) हा यापुढें अशरीरी 'बागुलबोवा' राहिला नव्हता. सोळा कोटी जनता आणि जगाचा एकषष्ठांश प्रदेश हें भव्य रूप धारण करून तो साकार बनला होता.

* * * *

## ५) १९१८ ते १९४५

**दोन समाजव्यवस्था**

सतरा सालच्या सोव्हिएट--क्रांतीनंतर नवा कालखंड सुरू होतो; कारण, जग आतां एकसंध राहिलें नव्हतें. भांडवली साम्राज्यवादी आणि समाजवादी असे त्याचे दोन भाग पडले.

भोंवतालीं भांडवली राष्ट्रांचें कडें पडलें असलें तरी भांडवलशाही अंतिम अवस्थेंत असल्याकारणानें कामगार-सत्तेला एका देशांतहि समाजवादी घडी बसविणें शक्य आहे असें प्रतिपादन करून आणि हें प्रत्यक्ष अंमलांत आणून लेनिन आणि स्तालिन यांनीं मार्क्सवादी चळवळीच्या विकासांत मोठी भर







टाकली. हें शक्य नाहीं, इतर देशांवर स्वारी करून त्यांवर कामगार-क्रांति लादल्याखेरीज क्रांति टिकणार नाहीं आणि शेतकरी-वर्ग क्रांतिकारक नाहीं, अश्या तऱ्हेच्या ट्रॉट्स्कीपंथीय अपप्रवृत्ती-विरुद्ध झगडून लेनिन व स्तालिन यांनीं हें कार्य तडीस नेलें. लेनिननंतर स्तालिननें समाजवादी व्यवस्थेच्या विकासाविषयीं मार्क्सवादी विचारांत तात्त्विक भर टाकली आणि पंचवार्षिक स्तालिन–योजना व सामायिक शेती यांच्या द्वारा समाजवादी अर्थव्यवस्था प्रत्यक्षांत उभी करून राष्ट्रीय स्वयंनिर्णय आणि समानता यांवर आधारलेलें सामर्थ्यशाली सोव्हिएट-संघराज्य उदयास आणलें.

दुसरीकडे भांडवली जग सोव्हिएट क्रांतीनें दिलेल्या हादऱ्यांतून स्वतःला सांवरण्याचा प्रयत्न करीत होतें. रशियन क्रांतीनंतर देशोदेशींच्या सोशल डेमोक्रॅटिक पक्षांना मार्क्सवादाचा बुरखा फेंकून देणें भाग पडलें. लोकशाही समाजवाद आणण्याच्या मिषानें भांडवल-दारांशीं सहकार्य करून त्यांनीं भांडवली जगास सांवरण्यास मदत केली. जर्मनींतील समाजवादी पक्षानें अमेरिकन आर्थिक मदतीच्या जोरावर जर्मन मक्तेदारीचें पुनरुज्जीवन करण्याच्या कामीं हातभार लावला. याप्रमाणें जर्मन कामगार-चळवळींचे आणि लोकशाहीचे भावी मारेकरी निर्माण झाले. ब्रिटनमधील मजूर-पक्षानें पार्लमेंटांतील विरोधी भांडवली पक्षाची भूमिका स्वीकारून भांडवलाचे पाईक होण्यांत धन्यता मानली. इतर देशांतील समाजवादी पक्षांनीं सामान्यतः असेंच क्रांतिविरोधक धोरण स्वीकारून आपलें भांडवलधार्जिणें स्वरूप व्यक्त केलें. "लोकशाही समाजवादा"चा उद्घोष करणाऱ्या या संधिसाधूंच्या हातीं समाजवाद तर पडला नाहींच पण उलट उरलीसुरली लोकशाही सुद्धां नष्ट झाली व फॅसिस्ट हुकूमशाही डोक्यावर बसली!

## तिसरी (कम्युनिस्ट) इंटरनॅशनल

पहिल्या महायुद्धानंतर जुन्या सोशल डेमोक्रॅटिक पक्षांतील क्रांतिकारक मार्क्सवाद्यांनीं नवे मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष स्थापले. सोशल डेमोक्रॅटिक पक्षांनीं समाजवादी क्रांतीचे पाय महायुद्धांत आणि महायुद्धानंतर मागें ओढून कामगारवर्गाशीं द्रोह केला; म्हणून या भांडवल–धार्जिण्या 'समाजवादा'-हून मार्क्सवादाचा कामगारवर्गीय क्रांतिकारक निराळेपणा स्पष्टपणें जाहीर करण्यासाठीं रशियन बोल्शेविक पक्षानें कम्युनिस्ट पक्ष हें नांव धारण करून पुढाकार घेतला होता. ज्या कारणामुळें मार्क्सनें १८४८ सालीं जाहिरनाम्याचें नांव कम्यु-निस्ट–जाहीरनामा असें ठेवलें, त्याच कारणासाठीं लेनिनच्या बोल्शेविक पक्षानें १९१७ सालीं सोशल डेमोक्रॅटिक हें नांव टाकून दिलें. सोशल डेमोक्रॅटिक पक्षाच्या क्रांतिविरोधी धोरणाशीं झगडून या मार्क्स-वादी कम्युनिस्ट पक्षांनीं मार्क्सवादाची परंपरा पुढें नेली.

रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालीं या पक्षांनीं तिसरी (कम्युनिस्ट) इंटरनॅशनल ही नवी आंतर्राष्ट्रीय कामगार–संघटना १९१९सालीं स्थापन केली. अनेक देशांत क्रांतिकारक मार्क्सवादी चळ-वळ नव्यानें सुरू होत होती, तिला मार्गदर्शन करून प्रत्येक देशांत तिचे पाय खंबीरपणें रोवण्याचें कार्य तिसऱ्या इंटरनॅशनलनें पार पाडलें. पुढें देशाच्या राजकारणांत या पक्षांचा प्रभाव पडूं लागला, प्रत्येक देशाच्या विविध परिस्थितीनुसार त्यांच्या कार्यांत विविधता येऊं लागली व स्वतःची जबाब-दारी पार पाडण्यास ते समर्थ झाले; तेव्हां अंगीकृत कार्य संपल्यानें कम्युनिस्ट इंटरनॅशनल १९४३ सालीं बरखास्त झाली. सुधारणावादी संधिसाधू प्रवृत्तींशीं दोन हात करून, कामगार-चळवळीला मार्क्सवादाच्या लढाऊ नेतृत्वाखालीं आणून, कामगार-क्रांतीचा मोर्चा पुढें नेणें, वासाह-तिक परतंत्र राष्ट्रांत स्वातंत्र्य-चळवळीच्या आघाडी-वर राहून साम्राज्यविरोधी लढ्याला धार आणणें आणि सोव्हिएट–समाजवादाला चिरडूं पाहणाऱ्या साम्राज्यवादी राजकारणास विरोध करणें हें या काळांत मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षांनीं केलेलें मुख्य कार्य.

केवळ युरोपांत नव्हे, तर पूर्वेकडील देशांतहि मार्क्सवाद पसरला. मक्तेदार भांडवलशाहीच्या काळांत या वासाहतिक देशांत कांहीं अंशीं कारखा-नदारी वाढणें अपरिहार्य होतें. कारखानदारीबरो-बरच तिची चिता रचणारा कामगारवर्गहि निर्माण

झाला आणि या वर्गाच्या जागृतीबरोबरच मार्क्सवादहि आला. "जेथें वडी भांडवलदारी जाईल, तेथें तिच्या पाठोपाठ कम्युनिस्ट–जाहीरनाम्याची शिकवणहि जाते," (एंगल्स) याचा प्रत्यय आतां पूर्वेकडील देशांतहि आला. हिंदुस्थानांत "शेतकरी-कामकरी पक्ष" ('वर्कर्स् अँड पेझंट्स्'–पार्टी) या नांवानें मार्क्सवादी पक्ष स्थापन झाला आणि हिंदी कामगारांना संघटित आणि वर्गजागृत करून हिंदी राष्ट्रीय चळवळीला लढाऊ स्वरूप देण्यासाठीं प्रयत्न करूं लागला व पुढें त्याचें आजच्या कम्युनिस्ट पक्षांत रूपांतर झालें. चीनमध्यें १९२१ सालीं कम्युनिस्ट पक्ष स्थापन होऊन त्याच्या नेतृत्वाखालीं चिनी कामगार व शेतकरी राष्ट्रीय क्रांतींत सामील झाले. कोमिंटांग–कम्युनिस्ट एकजुटीच्या जोरावर चिनी क्रांति झपाट्यानें पुढें गेली; पण राष्ट्रीय ऐक्य साधून पुढें समाजक्रांति होणार असें दिसूं लागतांच भांडवलदारी कोमिंटांग–पक्षानें परकीय साम्राज्यवादी आणि चिनी सरंजामशहा यांचेशीं तडजोड करून कम्युनिस्ट पक्ष आणि कामगार–शेतकरी यांवर दडपशाहीचें शस्त्र उपसलें! कँटन शहरीं हजारों कामगारांची कत्तल झाली. पॅरिस–कम्यूनच्या इतिहासाची निराळ्या युगांत, निराळ्या देशांत आणि निराळ्या सामाजिक परिस्थितींत पुनरावृत्ति होऊन धनिक वर्गाचें खरें स्वरूप पुनः एकदां चव्हाट्यावर आलें. आज अमेरिकन साम्राज्यवाद्यांचे दास बनलेल्या कोमिंटांग–सत्ताधाऱ्यांना सशस्त्र विरोध करून चिनी जनता मार्क्सवादी कम्युनिस्ट–पक्षाच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रीय स्वातंत्र्य, लोकशाही आणि समाजक्रांति संपादन करीत आहे.

### सोव्हिएटविरोधी राजकारण–दुसरें महायुद्ध

महायुद्धानंतरच्या काळांत भांडवली जग आपलें आसन स्थिरावण्याची धडपड करीत होतें. भांडवली अर्थव्यवस्था कांहींशी सांवरते आणि "शांततामय सनदशीर" पद्धतीनें समाजवाद आणण्याची भाषा पुनः सुरू होते न होते, तोंच १९२९ सालापासून प्रचंड आर्थिक अरिष्टांच्या भोंवऱ्यांत सांपडून भांडवली जग भिरभिरूं लागलें. भांडवलशाहीचा आर्थिक पेंचप्रसंग यापुढें नित्याचाच होऊन बसला. वर्गलढा तीव्र होऊन कामगारक्रांतीचा सवाल पुनः पुढें आला, तेव्हां भांडवली राष्ट्रांनीं लोकशाहीची आभरणें फेंकून देऊन भांडवली हुकूमशाहीचें सत्य-स्वरूप प्रकट केलें. जर्मनींत समाजवादी पक्षानें कामगार–क्रांतीचा मार्ग झिडकारल्यामुळें इंग्रज अमेरिकन साम्राज्यवाद्यांच्या साहाय्यानें हिटलरी हुकूमशाहीनें सत्ता बळकावली. प्रथम मार्क्सवादी कम्युनिस्ट–पक्ष, नंतर समाजवादी पक्ष आणि त्यानंतर इतर सर्व लोकशाही प्रवृत्ती, या क्रमानें जर्मन लोकशाही चळवळ पद्धतशीरपणें चिरडून टाकण्यांत आली! आक्रमक जर्मन साम्राज्यवाद वाढीला लागला. इतर भांडवली देशांतहि हीच प्रवृत्ति वाढीस लागली. पण यामुळें साम्राज्यशाहीचे अंतर्विरोध सुटण्यास मदत न होतां ते वाढीस लागले. ते शमविण्याकरितां युद्धाची, वसाहती मिळविण्याची व जग जिंकण्याची भाषा सुरू झाली. जपानचें चीनवरील आक्रमण (१९३१), अबिसिनियावरील स्वारी (१९३५), स्पेनमधील यादवी (१९३७), याप्रमाणें साम्राज्यशाही जग दुसऱ्या महायुद्धाकडे वाट चालूं लागलें.

या सर्व काळांत जर्मनी आणि जपान यांना सोव्हिएटविरोधी युद्धास चिथावून, पहिलें समाजवादी राष्ट्र नष्ट करणें आणि या प्रकारें साम्राज्यशाहीचा बचाव करणें हें ब्रिटन, अमेरिकन आणि इतर साम्राज्यवाद्यांच्या राजकारणाचें मुख्य सूत्र होतें. जर्मनी, इटली व जपान यांच्या लढाईच्या तयारीकडे आणि आक्रमणाकडे बुद्ध्याच कानाडोळा करून त्यांना खुष करण्याच्या (अपीजमेंटच्या) धोरणरमागें ही एकच आकांक्षा होती. हें साम्राज्यवादी राजकारण उघडकीस आणून तें हाणून पाडणें हा या काळांत मार्क्सवादी चळवळीचा मुख्य कार्यक्रम होता. सोव्हिएट देश झपाट्यानें औद्योगिक प्रगति करून स्वसंरक्षणास सिद्ध झाला; राष्ट्रसंघांत शिरून साम्राज्यवाद्यांच्या आक्रमक धोरणाविरुद्ध त्यानें जोराचा आवाज उठविला आणि आक्रमणास तोंड देण्यासाठीं "सामुदायिक सुरक्षितते"चें (कलेक्टिव्ह सिक्युरिटीचें) धोरण पुढें मांडलें. कम्युनिस्ट–इंटरनॅशनलच्या मार्गदर्शनाखालीं देशोदेशींचे कम्युनिस्ट–पक्ष फॅसिस्ट हुकूमशाही, परकीय आक्रमण आणि महायुद्ध यांना बांध घालण्यासाठीं








सर्व लोकशाही पक्षांना एकत्र आणून संयुक्त लोकशाही आघाडी निर्माण करण्याकारितां निश्चयानें झटूं लागले. चीनमध्यें कम्युनिस्ट-पक्षानें स्वतःवरील दहा वर्षांची भीषण दडपशाही विसरून जपानी आक्रमणाविरुद्ध संयुक्त आघाडीच्या धोरणाचा जोरानें पुरस्कार केला आणि ती संयुक्त आघाडी अखेर प्रत्यक्षांत अवतरली.

फॅसिस्टविरोधी जागृति आणि संघटना जगाचा दुसऱ्या महायुद्धापासून बचाव करण्याइतक्या सामर्थ्यवान् ठरल्या नाहींत. फॅसिस्ट जर्मनीचें धोरण अधिकाधिक आक्रमक होऊं लागलें. म्युनिच–करार आणि झेक राष्ट्राचा बळी या घटनांनीं शरणागतीच्या राजकारणाची कमाल मर्यादा गांठली गेली आणि अखेर १९३९ सालीं साम्राज्याच्या फेरवांटणीसाठीं दुसरें महायुद्ध सुरू झालें. पण ज्यासाठीं इंग्रज, फ्रेंच व अमेरिकन साम्राज्यवादी जिवाचा आटापिटा करीत होते, ती गोष्ट घडून आली नाहीं. हें युद्ध सोव्हिएट–रशिया विरुद्ध न होतां जर्मनीनें इंग्लंड व फ्रान्स यांच्या-विरुद्ध युद्ध पुकारलें. युद्ध सुरू झाल्यावरहि जर्मनीनें आपला मोर्चा पूर्वेकडे वळवावा या हेतूनें इंग्रज व फ्रेंच साम्राज्यवाद्यांची खटपट चालूच राहिली. फिनलंड–रशिया युद्ध आणि मध्यपूर्वेतील राजकारण यांमध्यें या कारवाया दिसून आल्या पण ही आशा फलद्रूप झाली नाहीं. सर्व युरोप जिंकेपर्यंत सोव्हिएट–देशावर चाल करण्याची हिंमत हिटलरला झाली नाहीं. उलट 'आवाजी' युद्धाचा ('फोनी वॉर'चा!) काळ संपून पश्चिमेकडे जर्मन-चढाई सुरू होतांच फ्रान्स-हॉलंडसारखीं राष्ट्रें पत्त्यांच्या घरांप्रमाणें भराभर कोसळूं लागलीं; भांडवली मुत्सद्यांच्या आशा-अपेक्षा धुळीस मिळाल्या.

## फॅसिस्ट-विरोधी महायुद्धाच्या शेवटीं

जागतिक परिस्थिति झपाट्यानें पालटूं लागली. फॅसिस्ट–आक्रमणाच्या प्रहारामुळें जगांतील जनता जागृत होऊं लागली आणि फॅसिस्ट–हुकूमशाही-विरुद्ध लढण्यासाठीं कंबर कसूं लागली. यामुळें १९४१ सालीं जर्मनीनें रशियावर स्वारी केली तेव्हां ब्रिटन, अमेरिका आणि सोव्हिएट–यूनियन यांच्या फॅसिस्टविरोधी संयुक्त आघाडीचा मोर्चा प्रत्यक्षांत उभा राहिला. युद्धाचें साम्राज्यशाही स्वरूप पालटलें. लोकशाही आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यांसाठीं जागतिक जनता युद्धांत सामील झाल्यामुळें त्याला स्वातंत्र्यवादी लोकयुद्धाचें स्वरूप प्राप्त झालें. साम्राज्यवाद्यांचा डाव त्यांच्यावरच उलटला !

युद्धाच्या सुरुवातीप्रमाणें युद्धाचा शेवट होतां-नाहि साम्राज्यवाद्यांचे मनोरथ सिद्धीस गेले नाहींत. युद्धाचा मुख्य भार पडून अपरिमित हानि सोसावी लागल्यामुळें सोव्हिएट देश कमताकद होईल असें मनोराज्य चर्चिलप्रभृति निर्ढावलेले साम्राज्यवादी करीत होते आणि युद्ध चालू असतांनाच ते सोव्हि-एट–दोस्तांविरुद्ध त्या दिशेनें कारवायाहि करीत होते. पण विजयी सोव्हिएट देश कमताकद झाला नाहीं; युद्धाचे शेवटीं त्याचें लष्करी बळ आणि जगाच्या राजकारणांतील प्रतिष्ठा अनेक पटींनीं वाढली. युद्धकाळांत जर्मनीच्या अंमलाखालील युरोपांतील देशांत आणि जपानी आक्रमणाखालील पूर्वेकडील देशांत सामर्थ्यवान् गनिमी चळवळी फोंफावल्या. फॅसिस्टविरोधी लढ्याच्या अग्रभागीं राहिल्यामुळें मार्क्सवादी कम्युनिस्ट–पक्षांना त्यामध्यें मानाचें आणि महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें.

दुसरें महायुद्ध संपलें; जर्मन, जपानी आणि इटालियन या तीन साम्राज्यशाह्या कोसळल्या ! अमेरिका आणि ब्रिटन हींच काय तीं प्रमुख साम्राज्यशाही राष्ट्रें राहिलीं; त्यांतहि ब्रिटनचें सामर्थ्य बरेंच घटल्यामुळें ब्रिटनला वस्तुतः अमेरिकेवर अवलंबून रहावें लागत आहे. जागतिक साम्राज्य-शाही अधिक कमजोर झाली. उलट पूर्वयुरोपांतील देश साम्राज्यशाहीच्या चौकटींतून निसटून मार्क्स-वादी कम्युनिस्ट-पक्षाच्या नेतृत्वाखालीं समाज-वादाची वाट चालूं लागले. युरोपांतील इतर देशांत आणि इतरत्र मार्क्सवादी कम्युनिस्ट-पक्षाचें सामर्थ्य वाढलें. पूर्वेकडे उत्तरचीनमधील चौदा कोटी जनता मार्क्सवादी पुढारीपणाखालीं साम्राज्यशाही चौकटींतून निसटूं पाहत आहे. इंडोनेशिया आणि व्हिएत नाम (इंडोचायना) या देशांत लोकसत्ताक राज्यें उभीं राहिलीं आहेत. जगांतील कामगार-चळवळ अधिक जागृत झाली आहे. सात कोटी संघटित कामगार-वर्गाची जागतिक-कामगार-संघटना








स्थापन झाली आहे व या जागृतीचें दडपण सुधारणावादी कामगार-पुढाऱ्यांवर पडून त्यांनाहि या संघटनेंत सामील व्हावें लागलें आहे. याप्रमाणें कामगार-चळवळीचें व समाजवादी क्रांतीचें बळ अनेक पटींनीं वाढलें असून जागतिक राजकारणाचें पारडें निश्चितपणें त्यांच्या बाजूला झुकलें आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर मार्क्सवादी चळवळीनें नव्या कालखंडांत प्रवेश केला आहे.

* * *

## ६ दुसऱ्या महायुद्धानंतर (१९४५ पासून पुढें)

या महायुद्धानंतर साम्राज्यशाहीचा विस्तार अधिकच आकसल्यानें तिचा पेंचप्रसंग अधिक बिकट झाला आहे; यामुळें तिनें तावडतोब आक्रमक आणि हुकूमशाही स्वरूप धारण केलें आहे. अमेरिकन साम्राज्यशहा ग्रीस, तुर्कस्थान, चीन वगैरे देशांत उघड हस्तक्षेप करून त्यांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य हिरावून घेत आहेत. अमेरिकन डॉलरशहा मार्शल-योजनेचे पाश आवळून पश्चिम युरोपची अर्थव्यवस्था आपल्या गाड्याला जुंपीत आहेत. अमेरिकन लष्करशहा सोव्हिएटविरोधी युद्धाची घोषणा करून झपाट्यानें शस्त्रास्त्रें वाढवीत आहेत आणि सोव्हिएट देशाभोंवतीं लष्करी, नाविक आणि वैमानिक तळांचें जाळें गुंफीत आहेत. ब्रिटन, फ्रान्स वगैरे देशांचे सत्ताधारी तथाकथित "तिसऱ्या मार्गाच्या" आणि "लोकशाही समाजवादाच्या" बुरख्याखालीं अमेरिकन युद्धरथाला जुंपून घेत आहेत. अमेरिकन साम्राज्यशाहीची ताकद आज ॲटम बॉंब, लष्करी तळ व शस्त्रास्त्रांची सज्जता यांपेक्षां या "समाजवादी" मंडळींच्या साम्राज्यधार्जिण्या लांगूलचालनांतच आहे, यांत शंका नाहीं. पूर्वेकडील राष्ट्रांतील वरिष्ठ वर्ग ब्रिटिश व अमेरिकन यांची दुय्यम भागीदारी पत्करून नाममात्र राष्ट्रीय स्वातंत्र्य स्वीकारण्यास तयार झाला आहे आणि स्वदेशांतील राष्ट्रीय लोकशाही चळवळीशीं द्रोह करीत आहे.

उलट देशोदेशींचे मार्क्सवादी चिरकालीन शांतता, राष्ट्रीय स्वातंत्र्य, समाजवाद आणि जनतेची लोकशाही (भांडवली लोकशाही नव्हे) यासाठीं झगडत आहेत. मागसलेल्या देशांत सरंजामशाही मिरासदारी नष्ट करण्याचें कार्यहि तेच पार पाडीत आहेत. या सर्वांच्या अग्रभागीं समाजवादी सोव्हिएट देश उभा आहे. "जगांतील शांतताप्रेमी जनतेच्या नजरा मॉस्कोवर केंद्रित झाल्या आहेत" या स्तालिनच्या घोषणेंत आजच्या मार्क्सवादी चळवळीचा प्रभाव आणि तिचें महत्त्व प्रतिबिंबित झालीं आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं.

कम्युनिस्ट-जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यावर शंभर वर्षांनंतर आज जगांत दोन स्पष्ट तट एकमेकांसमोर उभे ठाकलेले दिसत आहेत. "तिसऱ्या मार्गाला" येथें जागा नाहीं, हें स्पष्टपणें दिसून येत आहे. कारण, समाजवादाची आणि लोकशाहीची जपमाळ घेणारे ॲटली, बेव्हिन, ब्लम, शूमान, शूमाकेर, सॅरागाट वगैरे "समाजवादी" व्यवहारांत कम्युनिझम्-विरोधाच्या नांवाखालीं अमेरिकन साम्राज्यवाद्यांचे हस्तक बनून दुसऱ्या देशांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि लोकशाही यांचा अपहार करीत आहेत, समाजवादी क्रांतीचे पाय मागें ओढीत आहेत आणि आपल्या देशाचें आर्थिक स्वातंत्र्यहि त्यांच्या चरणीं सुपूर्द करीत आहेत! वर्गलढा इतका तीव्र व जागतिक स्वरूपाचा झाला आहे म्हणूनच साम्यवादाविरुद्ध—कम्युनिझमविरुद्ध येवढी जोराची हाकाटी सुरू झाली आहे. म्हणूनच ट्रूमनपासून चँग-कै-शेकपर्यंत, ॲटलीपासून पोपपर्यंत, द गॉलपासून शूमाकेरपर्यंत सर्व प्रतिगामी शक्ति एकवटल्या आहेत. शंभर वर्षांपूर्वी साम्यवादाविरुद्ध प्रतिगामी शक्तींची अशीच अनिष्ट एकजूट झाली होती, याचा उल्लेख मार्क्सनें कम्युनिस्ट-जाहीरनाम्याच्या सुरुवातीस केला आहे; त्या वेळीं साम्यवादाचा बागुलबोवा दाखवून युरोपांतील सर्व प्रतिगामी शक्ती जनतेस भेडसावण्याचा असाच प्रयत्न करीत होत्या. पण आज जागतिक जनता जागी झाली आहे, कामगार-चळवळ संघटित आणि सामर्थ्यशाली झाली आहे, सर्व पुरोगामी शक्ती उत्तरोत्तर मार्क्सवादाच्या झेंड्याखालीं गोळा होत आहेत व मार्क्सवादाचें सामर्थ्य उत्तरोत्तर वाढत आहे.

आपला विनाशकाल समीप आला आहे याची या प्रतिगाम्यांना कल्पना आहे व आपलें मरण कशांत आहे हेंहि त्यांस माहीत आहे. म्हणूनच ते सर्व आज अमेरिकन साम्राज्यशाहीच्या आश्रयानें

एकत्र आले आहेत. यापुढील काळांत या प्रतिगामी शक्तींशीं अखेरचे लढे देण्याचें कार्य मार्क्सवादासमोर आहे. भांडवली सत्ता उलथून सर्वत्र समाजवाद स्थापन करावयाचा आहे; कम्युनिस्ट–जाहीरनाम्यांतील मार्क्सची शंभर वर्षांपूर्वीची भविष्यवाणी त्यांना खरी करून दाखवावयाची आहे.

प्रश्न असा आहे कीं, आजची मार्क्सवादी चळवळ हें कार्य तडीस नेऊं शकेल काय ?

गेल्या एका शतकांतील मार्क्सवादाचा विकास आणि मार्क्सवादी चळवळीचें वाढतें सामर्थ्य हीं पाहिलीं तर हें ऐतिहासिक महत्कार्य पुरें करण्यास मार्क्सवाद आज निःसंशय समर्थ आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. *

---

* हा लेख लिहितांना ' मॉडर्न क्वार्टर्ली ' या त्रैमासिकाच्या ' मार्क्सवाद–शताब्दी ' अंकाचा बराच उपयोग झाला —लेखक.

———

## प्राणिशास्त्र आणि मार्क्सवाद—

मार्क्सवादाचे आक्षेपक प्राणिशास्त्रांतील सिध्दांतांचा विपर्यास करून त्यांच्या आधारें मार्क्सवादाचें खंडन करण्याचा आव आणतात. डार्विनच्या उत्क्रांति–किंवा–विकासवादाच्या सिध्दांताप्रमाणें जे 'समर्थतम' तेच सृष्टीच्या चक्रांत टिकाव धरून राहतात; याउलट जे दुबळे असमर्थ असतील त्यांना निसर्ग निष्ठुरपणें नष्ट करून टाकतो. शेवटीं सामर्थ्यशाल्यांचाच टिकाव ( survival of the fittest ) लागूं देऊन सृष्टि आपली निवड ( natural selection ) करीत असते. ह्या सिध्दान्ताचा आधार घेऊन मार्क्सवादाचे आक्षेपक विचारतात—" मार्क्सवादाचा शेवटीं परिणाम काय ? गरीब दुबळ्यांना टिकवून ठेवणें हाच ना ! सृष्टीच्या कलहांत जे दुबळे व असमर्थ ठरले आहेत, त्यांना समाजवादाच्या कृत्रिम उपायांनीं जीवदान द्यावयाचें ! सृष्टि आपली निवड करीत असते त्या सिध्दान्ताला हरताळ फासायचा ! या गरीबांना संतति खूप होत असते. मार्क्सवादाच्या कृत्रिम उपायांनीं हे मूळचे असमर्थ असे गरीब–दुबळे लोक शिल्लक राहून समाजाला लोढण्यासारखे होऊन राहतील, खऱ्या सामर्थ्यशाली लोकांची उपेक्षा होऊन त्यांचा ऱ्हास होईल आणि शेवटीं मानवी समाज अधोगतीला जाईल ! "

या आक्षेपकांचे आक्षेप अगदींच स्वार्थमूलक, पोकळ व फोल आहेत. त्यांनीं आपले हे सिध्दांत आपल्या स्वतःच्या मुलाबाळांना लावून ते पडताळून पहावेत ! आपल्या स्वतःच्या नाजूक प्रकृतीच्या मूळच्या 'असमर्थ' ( unfit ) मुलांना सकस आहार, उबदार वस्त्रप्रावरण, आणि औषधपाणी देऊन ते टिकवून ठेवतातचना ! अशा ' असमर्थां 'च्या जिवंत रहाण्यानें वरिष्ठ वर्गाची अवनति होत आहे, असें या स्वार्थी आक्षेपकांना कां नाहीं वाटत ? डार्विनच्या सिध्दान्ताचा या आक्षेपकांनीं विपर्यास केला आहे. 'सामर्थ्यशालीच' तेवढे सृष्टीच्या चक्रांत टिकाव धरून रहातात असें म्हणतांना डार्विनचा ' सामर्थ्य '( fitness )चा अर्थ ' जे संतत्युत्पादन–क्षम तेच समर्थ ' (net fertility) असा होता. सामर्थ्याचे दुसरे अर्थ (उ. येन केन मार्गेण पैसा मिळवून गब्बर होणें) हे डार्विनला अभिप्रेत नव्हते. म्हणजे खरोखरीं डार्विनच्या अर्थानें म्हणायचें तर समाजांतील गरीब वर्गच आज श्रीमंतापेक्षां अधिक सामर्थ्यशाली आहे असें म्हटलें पाहिजे.—हिट्लरच्या ठिकाणीं आक्षेपकांचे वरील युक्तिवाद एकवटलेले दिसून येतात. एका दृष्टीनें मानवजातीविषयीं त्याचा अतिभौतिक ( metaphysical ) दृष्टिकोन होता. दुसऱ्या दृष्टीनें त्याला जे लोक ' असमर्थ ' वाटले, त्यांना खची करून किंवा ठार मारून जर्मन वंश शुध्द करण्याचा त्यानें प्रयत्न केला. त्याचा परिणाम मात्र असा झाला कीं जे खरेखुरे ' समर्थ '( fittest ) असे लक्षावधि जर्मन ते नष्ट झाले. जे शिल्लक राहिले त्यांना आतां टीचभर जागें( restricted lebensraum )त जीवन कंठावें लागत आहे !

—प्रो. जे. बी. एस्. हाल्डेन, F. R. S.



अनुक्रमणिका








डॉ. सैयद आबिद हुसैन  अनुवादकः श्री. श्रीपाद जोशी

# समाईक संस्कृतीचा पाया : समाईक भाषा

[ डॉ. सैयद आबिद हुसैन यांच्या मूळ उर्दू ग्रंथाचा अनुवाद ' हिंदुस्तानी राष्ट्रीयत्व आणि राष्ट्रीय संस्कृति ' या मराठी ग्रंथाच्या रूपानें पुण्याच्या 'सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाले' तर्फे लवकरच प्रकाशित होणार आहे. प्रस्तुत लेख हा त्या आगामी ग्रंथांतील एक प्रकरण आहे— डॉ. सै. आ. हुसैन यांनीं आपला मूळ ग्रंथ भारताच्या फाळणीपूर्वी लिहिला असून त्यांत त्यांनीं अखंड भारताचें आधुनिक एकराज्य होण्यांतच भारतीय इतिहासाची यथार्थ परिणति होणार आहे, या बौद्धिक निष्ठेच्या भूमिकेवरून आपले विचार मांडलेले आहेत. आज फाळणीनंतर हिंदुस्थानच्या नवीन संदर्भांतही डॉ. सै. आ. हुसैन यांनीं राष्ट्रभाषेविषयीं प्रकट केलेले विचार उद्‌बोधक वाटतील अशी अशा आहे.— —का. सं. ]

समाईक भाषेच्या प्रश्नाच्या बाबतींतील सर्वांत पहिला मुद्दा असा आहे कीं, आपण या भाषेचा उपयोग सर्व देशभर मामुली संभाषण आणि आपापसांतील सर्वसामान्य व्यवहार चालविण्याच्या दृष्टीनें करूं इच्छितों कीं, तिला सबंध देशाची शैक्षणिक, साहित्यिक, शास्त्रीय, कोर्टकचेऱ्यांची व सरकारी भाषा देखील बनवूं इच्छितों ! यांपैकीं पहिल्या मार्गाचा स्वीकार केल्यास हा प्रश्न फारच सोपा व सुटसुटीत होतो. परंतु समाईक भाषेचा अथवा राष्ट्रभाषेचा पुरस्कार करणाऱ्यांच्या डोळ्यांसमोर दुसरा मार्ग आहे व यामुळेंच सगळ्या अडचणी व गुंतागुंती निर्माण झाल्या आहेत. यामुळेंच प्रांतीय भाषा राष्ट्रभाषेशीं वैर करूं लागल्या आहेत आणि म्हणूनच हिंदी–उर्दूच्या झगड्यानें इतकें भयंकर रूप धारण केलें आहे.

## एक अव्यवहार्य धोरण

कोणत्याहि एका भाषेला– मग ती उर्दू असो वा हिंदी असो— साऱ्या हिंदुस्थानची साहित्यिक भाषा बनविण्याची नीति योग्यहि नाहीं अथवा व्यवहार्यहि नाहीं. ज्या प्रांतांजवळ त्यांच्या स्वतःच्या तामिळ, तेलगू, कन्नड, मल्याळम्, मराठी वगैरे उन्नत व प्राचीन आणि बंगाली, गुजराती, असामिया वगैरे आधुनिक भाषा आहेत त्यांच्यावर हिंदी अथवा उर्दू लादणं म्हणजे हिंदुस्थानांतील आम जनतेवर इंग्रजी भाषा लादण्यासारखेंच अनैसर्गिक व अन्यायाचें होईल. जेव्हां मद्रासमध्यें पहिल्या काँग्रेस मंत्रिमंडळानें हिंदुस्तानीला मान्यता देण्याचें ठरविलें तेव्हां त्यांनीं असें जाहीर केलें होतें कीं शाळेंतील फक्त खालच्या वर्गांतूनच या भाषेचें प्रारंभिक शिक्षण देण्यांत येईल व त्यायोगें प्रान्तीय भाषांच्या महत्त्वावर कोणत्याहि प्रकारचा अनिष्ट परिणाम होऊं दिला जाणार नाहीं. परंतु हें आश्वासन दिलें गेलें असतांहि कांहीं लोकांमध्यें खळबळ उडाली आणि त्यांनीं हिंदुस्तानीच्या विरुद्ध सत्याग्रह सुरू केला. या एका उदाहरणावरून आपल्याला कल्पना येईल कीं, इतर प्रान्तांवर दुसऱ्या प्रकारची राष्ट्रभाषा लादण्याच्या धोरणाला जनतेकडून किती कसून विरोध केला जाईल.

या धोरणाची आणखी एक भयंकर बाजू आहे. ती अशी कीं, त्यामुळें हिन्दी-उर्दूचा झगडा जास्त तीव्र होईल आणि ही गुंतागुंत कांहीं केल्या उलगडणार नाहीं. कारण जेव्हां राष्ट्रभाषेचा








प्रश्न हा सर्वसामान्य बोलण्यांतील व व्यवहारांतील भाषेचा प्रश्न न उरतां तो समाईक साहित्यिक भाषेचा प्रश्न होईल तेव्हां साहित्यिक हिंदीचे व साहित्यिक उर्दूचे पाठीराखे संयम व तडजोड, उपाय व चिंतन यांच्या मर्यादा उल्लंघून जाणारें तर्कशास्त्र व भावना यांच्या संयुक्त शक्तीच्या जोरावर आपापलें म्हणणें मांडूं लागतील.

उर्दूचे वकील असें म्हणतात कीं, "उर्दू भाषेने गरजेच्या पोटीं जन्म घेतला आहे, आणि ऐतिहासिक विकासवादाच्या सिद्धांताप्रमाणें ती नैसर्गिक क्रमानेंच लहानाची मोठी झाली आहे. ती कोठल्याहि एका जातीपुरती अथवा जमातीपुरती संकुचित नसून हिंदु व मुसलमान यांची अविभाज्य व समाईक पैतृक संपत्ति (वारसा) आहे. सुमारें वीस-पंचवीस वर्षांपूर्वीपर्यंत बिहार, संयुक्तप्रांत, पंजाब, काश्मीर, मध्यभारतांतील कांहीं प्रदेश आणि पुष्कळशीं देशी संस्थानें—या ठिकाणच्या शिक्षित हिंदूंची व मुसलमानांची साहित्यिक भाषा उर्दूच होती व ती त्यांनीं स्वेच्छेनें स्वीकारलेली होती. याशिवाय इतर प्रांतांतलि पुष्कळ ठिकाणीं उर्दू भाषा जाणणाऱ्या हिंदूंची व मुसलमानांची संख्या फार मोठी होती. आज देखील विरोधी शक्तींनीं उर्दूचें उच्चाटण करण्याचा प्रयत्न कंबर कसून लाविला असतांहि वर उल्लेखिलेल्या प्रांतांतील हिंदूंच्या मनांतून उर्दूची लोकप्रियता फारच थोडी कमी झाली आहे व मुसलमानांच्या मनांत ती खूपच वाढली आहे. सारांश उर्दू ही देशाच्या फार मोठ्या भागांत पहिल्यापासूनच समाईक भाषा म्हणून नांदत आहे आणि म्हणून उरलेल्या भागांत देखील ती समाईक भाषा बनणें शक्य आहे."

हिंदीचे पाठीराखे असें म्हणतात कीं "ज्या युगाच्या गरजा भागविण्यासाठीं उर्दूचा जन्म झाला होता तें युग आतां संपलेलें आहे. आतां हिंदुस्थानी राष्ट्रीयत्वाचें युग सुरू झालें आहे. म्हणून जी शुद्ध देशी असेल व जिच्यांत विदेशी शब्दांची भेसळ मुळींच नसेल अशा एका राष्ट्रभाषेची आतां जरूर आहे. ज्याप्रमाणें तुर्की भाषेनें स्वतःला अरबी शब्दांच्या तावडींतून सोडवून शुद्ध करून घेतलें आणि फारसी (इराणी) भाषाहि असाच प्रयत्न करीत आहे त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या राष्ट्रीय भावनेची अशी मागणी आहे कीं, हिंदुस्तानी भाषेंतील जितके अरबी-फारसी शब्द काढून टाकणें शक्य असेल तितके सर्व काढून टाकून त्यांच्या जागीं हिंदुस्थानच्या प्राचीन अभिजात (क्लासिकल) संस्कृत भाषेंतील शब्द घ्यावेत. ही मागणी पुरी करण्यासाठीं हिंदीनें अवतार घेतला आहे. संस्कृतचे शब्द हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व आर्यभाषांमध्यें फार मोठ्या प्रमाणांत व द्राविडी भाषांमध्येंहि पुष्कळ प्रमाणांत विद्यमान आहेत. यामुळें संस्कृतप्रचुर हिन्दी ही सगळ्या हिन्दुस्थानांतील शिक्षित हिंदूंमध्यें फार सुलभपणें लोकप्रिय होऊं शकेल. राहतां राहिले मुसलमान. तेव्हां त्यांनीं देखील राष्ट्रीय ऐक्याखातर या भाषेचा स्वीकार केला पाहिजे."

गंमत अशी कीं उर्दूला संयुक्त राष्ट्रभाषा बनविण्याची बाजू घेणारे लोक हे विशेषेंकरून शिक्षित मुसलमान आहेत आणि त्यांच्यापैकीं बहुतेकजण आजकाल संयुक्त राष्ट्रीयत्वाचे कट्टे दुष्मन् बनले आहेत. त्याचप्रमाणें हिंदीला समाईक भाषा बनविण्याचा प्रयत्न करणारे हे हिंदू आहेत व त्यांच्यापैकीं पुष्कळांची मातृभाषा उर्दू आहे. शिवाय राष्ट्रीय ऐक्याचें नांव काढतांच ज्यांच्या तळपायाची आग मस्तकाला जाते अशा मुसलमानांना हिंदूंनीं असें सांगावयाचें कीं जी उर्दू शेकडों वर्षांपासून हिंदूंची व मुसलमानांची समाईक भाषा म्हणून नांदत आली आहे तिच्यावर राष्ट्रीय ऐक्याखातर तिलांजलि देऊन तुम्हीं संस्कृतप्रचुर हिंदी शिकून घेतली पाहिजे हाहि एक विनोदाचाच प्रकार नव्हे काय ?

## राष्ट्रभाषेचें मर्यादित उद्दिष्ट

अशी ही हास्यास्पद स्थिति निर्माण होण्याचें कारण एवढेंच कीं, प्रत्येक पक्षाला असें वाटतें कीं सबंध हिंदुस्थानांत तावडतोब एक समाईक साहित्यिक भाषा चालू होणें आवश्यक आहे; आणि या धुंदींत वास्तविक घटनांच्या भरीव भूमीचा त्याग करून ते कल्पनेच्या हवेंत उडूं लागतात. अशा प्रकारची भाषा निर्माण होणें फायदेशीर व स्वागताई

आहे हें कोणी नाकारणार नाहीं. आणि जर चालू परिस्थिति नीट निवळली तर केव्हां ना केव्हां तरी ही भाषा निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु सध्यां अशा भाषेची फारशी आवश्यकताहि नाहीं व शक्यताहि नाहीं. आज एकच गोष्ट शक्य नि व्यवहार्य आहे. ती अशी कीं जी भाषा रोजच्या व्यवहारासाठीं म्हणून देशाच्या पुष्कळ भागांत थोड्याफार फरकांनीं वापरली जाते, उत्तर व मध्य भारतांतील सुमारें पंधरा कोटि लोक जी मातृभाषा म्हणून बोलतात आणि देशाच्या इतर भागांतील आणखी दहा कोटी लोक आवश्यकतेपुरती जी भाषा समजतात अशा त्या वास्तविक समाईक भाषेला म्हणजेच हिंदुस्तानीला एका विशिष्ट पातळीवर आणून राष्ट्रभाषा म्हणून मान्यता द्यावी आणि बिगरहिंदुस्तानी प्रांतांमध्यें देखील प्रत्येक व्यक्तीनें आपल्या मातृभाषेबरोबर ही राष्ट्रभाषाहि शिकून घ्यावी असा प्रयत्न करण्यांत यावा. जर रोजच्या व्यवहारापुरती आणि मामुली विचार लिहिण्या-बोलण्यापुरती सबंध देशांत एक सर्वसामान्य भाषा अस्तित्वांत आली आणि ती प्रत्येक व्यक्तीला आवश्यकतेनुसार लिहितां-वाचतां येऊं लागली तर या मर्यादित उद्दिष्टाची सफलता ही कांहीं लहान सहान गोष्ट ठरणार नाहीं. कारण मग हिंदुस्थानच्या ज्या चाळीस करोड रहिवाश्यांचीं मनें नाशिबानें स्थळकाळरूपी बळकट शक्तींच्या म्हणजेच भौगोलिक परिस्थिति व ऐतिहासिक घटना यांच्या द्वारें समान सांच्यांत ओतलेलीं आहेत, ज्यांच्या हृदयांत व डोक्यांत बाह्य नि वरवर दिसणाऱ्या विरोधाच्या बुडाशीं भावना व कल्पना यांचें मूलभूत ऐक्य नांदत आहे, ते सर्वजण-सूक्ष्म शास्त्रीय प्रश्न व सुकोमल साहित्यिक समस्या यांचा मुद्दा बाजूस ठेवला तरी निदान मानवी जीवनांतील सरळ, सोप्या व पदोपदीं प्रत्ययास येणाऱ्या गोष्टींच्या बाबतींत का होईना-एकमेकांशीं निःसंकोचपणें विचार-विनिमय करूं शकतील. समाईक भाषेमुळें त्यांच्या ठिकाणीं आपलें जीवन आणि आपली संस्कृति यांच्या मूलभूत एकत्वाविषयींची भावना निर्माण होईल आणि ही भावना ऐक्याच्या मूलभूत कल्पनांना जास्त विशाल व अधिक दृढ बनवील.

## इंग्रजीचें स्थान

साहित्यिक आणि शैक्षणिक हेतूंच्या पूर्ततेसाठीं उर्दू, साहित्यिक हिंदी आणि उन्नतिशील प्रांतीय भाषा यांना आपापल्या क्षेत्रांत विस्तार व विकास करण्याची समान संधि दिली गेली पाहिजे. आणि सबंध हिंदुस्थानच्या शास्त्रीय व साहित्यिक भाषेचें कार्य जसें आजपर्यंत चालत आलें आहे तसें सध्यां तरी निदान इंग्रजीकडून करून घेतलें गेलें पाहिजे. समाईक साहित्यिक भाषेच्या पदावर एक विदेशी भाषा विराजमान झालेली पाहून आमच्या स्वाभिमानावर जोराचा आघात होतो आणि त्यायोगें स्वातंत्र्याच्या आत्म्याच्या वाढीमध्यें एक मानसिक अडथळा निर्माण होतो यांत मुळींच शंका नाहीं. परंतु जोंपर्यंत एक कामचलाऊ भाषा या नात्यानें हिंदुस्तानी ही सर्व देशभर लोकप्रिय होत नाहीं आणि मग स्वाभाविक विकासाच्या मार्गानें समाईक साहित्यिक व शास्त्रीय भाषेचा दर्जा प्राप्त करून घेत नाहीं तोंपर्यंत इंग्रजीचा त्याग केल्यास व्यवहाराच्या दृष्टीनें बेसुमार अडचणी उभ्या राहतील; इतकेंच नव्हे तर आज हिंदुस्थानांतील उच्च बौद्धिक पातळीवरील लोकांमध्यें इंग्रजीच्या द्वारें विचारांचा जो थोडाफार समाईक-पणा निर्माण झालेला आहे तो नाहींसा होईल आणि मग राष्ट्रीय ऐक्याचें ध्येय अधिकच दूर जाईल. जर आपण क्षणभर राष्ट्रीयतेच्या मर्यादेंतून बाहेर पडून आंतरराष्ट्रीय दृष्टि-कोनांतून पाहूं लागलों तर आपल्याला असें दिसून येईल कीं, इंग्रजीची आवश्यकता आपण समजतों त्याहून अधिक आहे. या विसाव्या शतकांत इंग्रजीनें फक्त आंतरराष्ट्रीय व्यापारी भाषेचाच दर्जा प्राप्त केलेला आहे असें नसून फ्रेन्च भाषेच्या ऐवजीं जगाची राजकीय भाषा म्हणूनहि तिनें स्थान पटका-विलेलें आहे. आणि यापुढें शास्त्रीय भाषा म्हणून देखील तिचें महत्त्व जर्मन भाषेपेक्षांहि जास्त वाढेल अशीं चिन्हें दिसत आहेत. आज जगांतील पुष्कळसे देश आपल्या येथें इंग्रजीचा प्रचार जास्तींत जास्त व्हावा म्हणून धडपडत आहेत. अशा वेळीं हिंदुस्था-नांतील ज्या शिक्षित वर्गानें दुसरी मातृभाषाच म्हणून ज्या इंग्रजीचा स्वीकार केला आहे तो जर










निव्वळ वरवरच्या भावनाप्रधानतेमुळें त्या भाषेचा त्याग करील तर तें योग्य होणार नाहीं. अर्थात् आमच्या माध्यमिक व उच्च शिक्षणक्रमांत माध्यम म्हणून इंग्रजी वापरली जात असल्यामुळें तरुणांचें बौद्धिक स्वातंत्र्य व प्रगति यांच्या मार्गांत फार मोठा अडथळा निर्माण होत आहे आणि म्हणून तिच्या ऐवजीं त्या त्या ठिकाणच्या मातृ-भाषांतून शिक्षण देणें अत्यंत आवश्यक आहे. यांत मुळींच शंका नाहीं. परंतु या बाबतींत देखील अखेरचा निर्णय घेण्यापूर्वीं पुष्कळशा अडचणींचा विचार करून त्या दूर करणें जरूर आहे. इंग्रजी ही परदेशी भाषा आहे एवढ्याच कारणासाठीं अभावात्मक राष्ट्रीयतेच्या आहारीं जाऊन जर आपण आज तिला प्राप्त झालेल्या स्थानावरून एकदम काढून टाकण्याचा प्रयत्न केला तर आपल्या बौद्धिक जीवनाची घडी विस्कटून जाईल व त्यायोगें राष्ट्रियत्वाच्या चळवळीचें अतिशय नुकसान होईल.

## हिंदुस्तानी ही राष्ट्रीयत्वाला पोषक

अर्थात् यापुढें हिंदुस्तानीला समाईक कामकाजी भाषेच्या दर्जावरून उच्च पदाकडे घेऊन जाण्याचा आणि तिला अखिल भारताची समाईक साहित्यिक व शास्त्रीय भाषा बनविण्याचा प्रयत्न मात्र आपण अवश्य केला पाहिजे. हें घडून येण्यासाठीं ज्या प्रांतांत हिंदुस्तानी भाषा बोलली जाते त्या प्रांतांतील हिंदु-मुसलमानांनीं व विशेषतः संयुक्त राष्ट्रीयत्वाचा पुरस्कार करणाऱ्यांनीं साहित्यिक हिंदी व उर्दू या दोन्ही भाषा शिकून घेणें जरूर आहे. जेव्हां हे लोक दोन्ही भाषांतील शब्दभांडारें आत्मसात् करतील तेव्हां जरूरीप्रमाणें जास्तींत जास्त लोकांना आपलें म्हणणें समजाऊन देण्यासाठीं ते या दोन्ही भांडारांतील योग्य शब्द निवडून त्यांचा उपयोग करतील. अशा प्रकारें हळू हळू ध्यानांत न येईल अशा रीतीनें दोन्ही भाषा एकमेकींच्या जवळ येऊं लागतील आणि कधीं ना कधीं एक होतील अशी शक्यता आहे. आज ज्या लाखों हिंदूंचा उर्दूवर व थोड्याशा मुसलमानांचा साहित्यिक हिंदीवर अधिकार आहे त्यांना असें वाटलें पाहिजे कीं, आपण राष्ट्रीय ऐक्याचे संदेशवाहक आहोंत आणि आपलें नुसतें अस्तित्व देखील जातीय दुफळी नाहींशी करण्यास मदत करीत आहे. अशा लोकांची संख्या कमी होतां कामा नये. इतकेंच नव्हे तर दिवसेंदिवस ती वाढत गेली पाहिजे. ज्या हिंदूंच्या घरांत पिढ्यानुपिढ्या उर्दू ही मातृभाषा अथवा निदान साहित्यिक भाषा म्हणून नांदत आली आहे, ते वैमनस्याच्या विषारी वातावरणांत सांपडून स्वतः तर उर्दू लिहिणें वाचणें सोडून देत आहेतच पण शिवाय आपल्या मुलांबाळांनाहि प्रथमपासून उर्दू शिकवीतच नाहींत. ही गोष्ट हिंदुस्तानी राष्ट्रीयत्वाच्या भवितव्याच्या दृष्टीनें सर्वांत जास्त भयंकर आहे. आपण उर्दूचा त्याग करणें म्हणजे वस्तुतः हिंदुस्तानी राष्ट्रीयत्वाच्या ध्येयाचाच त्याग करणें आणि फुटीर वृत्तीला बळकटी आणणें होय हें या लोकांच्या लक्षांत ताबडतोब आलें पाहिजे.

## हिंदुस्तानीचें मूलभूत स्वरूप

सध्यां आपण कोणत्याहि एका देशी भाषेला सबंध हिंदुस्तानची साहीत्यिक व शास्त्रीय भाषा बनविण्याचा विचार सोडून दिला पाहिजे आणि आज 'हिंदुस्तानी' या नांवानें देशांतील फार मोठ्या विभागांत जी भाषा बोलली व समजली जाते त्या समाईक बोलचालीच्या भाषेलाच राष्ट्रभाषेचें स्थान देऊन तिचा प्रचार सर्व देशभर केला पाहिजे. एवढ्या निर्णयावर येऊन पोहोंचल्यानंतर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं जिला हिंदुस्तानी असें म्हणतात ती ही समाईक भाषा आहे तरी काय ? जोंपर्यंत ही भाषा फक्त बोलभाषा म्हणून आपोआप उगवलेल्या जंगलाप्रमाणें पसरत राहिली तोंपर्यंत तिच्या हद्दी ठरावेिणें आवश्यकहि नव्हतें आणि शक्यहि नव्हतें. परंतु आतां बुद्धिपूर्वक प्रयत्न करून सबंध देशभर तिचा प्रचार करावयाचा आहे आणि शाळांतून तिचें पध्दतशीर शिक्षण द्यावयाचें आहे. यामुळें एखाद्या बागेप्रमाणें तिच्या मर्यादा ठरवून तिला स्वच्छ व सुशोभित ठेवणें आपल्याला भाग आहे. हिंदुस्तानीच्या सद्यःस्थितीचा विचार केल्यास आपल्याला असें दिसून येईल कीं तिचीं रूपें वेगवेगळ्या प्रांतांत, वेगवेगळ्या वर्गांत, शहरांत व खेड्यांत एकमेकांहून पुष्कळच भिन्न

# समाईक संस्कृतीचा पाया : समाईक भाषा

आहेत आणि तिच्या हद्दी ठरविण्यापूर्वी कोणतें तरी एकरूप मूलभूत स्वरूप आहे असें धरून चालावें लागेल. जे लोक कोणत्याहि प्रकारचा अभिनिवेश मनांत न धरतां वस्तुस्थितीचें निरीक्षण करतात, ते एकमतानें असा निर्णय देतात कीं जी भाषा बिहारपासून पंजाबपर्यंतच्या खेड्यांतील व शहरांतील शिक्षित हिंदु व मुसलमान आपल्या नेहमींच्या अनौपचारिक बोलण्यामध्यें वापरतात, तीच समाईक भाषेची कसोटी होय. रेडियो व सिनेमावाल्यांनीं आणि ज्यांना हिंदुस्तानी या समाईक भाषेचा उपयोग करावा लागतो अशा इतर सर्व संस्थांनीं हाच दृष्टिकोन मान्य केलेला आहे.

हिंदी साहित्याच्या इतिहासांत जिला 'खडी बोली' या नांवानें संबोधिलें जातें ती हिंदी–आर्य भाषाच हिंदुस्तानीचें धड होय. या भाषेंत संस्कृत-मधून अगणित शब्द घेतले गेले आहेत. परंतु आम जनतेच्या प्रचारांत येऊन त्यांनीं आपलीं रूपें बदललीं आहेत. हिंदुधर्माशीं व तत्त्वज्ञानाशीं संबंध असलेले संस्कृत शब्द जसेच्या तसेच राहिले आहेत. पुष्कळसे अरबी, फारसी, इंग्रजी व इतर भाषांचे शब्द आपल्या मूळ अथवा बदललेल्या स्वरूपांत या भाषेंत विद्यमान आहेत. हे शब्द नेहमींच्या बोलण्याचालण्यांत इतके एकजीव होऊन गेले आहेत कीं ते मूळ कोणत्या भाषेंतील आहेत याची सर्वसामान्य लोकांना कल्पना देखील येत नाहीं. व्याकरण आणि शब्दभांडार या दोन्ही दृष्टींनीं पाहिल्यास हिंदुस्तानी ही सरळ व सोपी उर्दू आहे असें दिसून येईल. ज्या हिंदीमध्यें 'भाषा' उर्फ 'खडीबोली'चे शब्द त्यांच्या प्रचलित रूपांत वापरले जातात ती हिंदी हिंदुस्तानीला इतकी जवळची आहे कीं हिंदुस्तानी म्हणजे सरळ व सोपी हिंदी होय असें देखील म्हणतां येईल. परंतु जिच्या-मध्यें खडीबोलींतील शब्दांचीं प्रचलित रूपें सोडून देऊन त्यांचीं मूळ संस्कृत रूपें वापरलीं जातात अशा त्या कृत्रिम भाषेपासून म्हणजेच साहित्यिक हिंदी-पासून हिंदुस्तानी ही फार दूर आहे. प्राचीन क्लासि-कल भाषांपासून सध्यां प्रचलित असलेल्या युरोपियन भाषा जितक्या दूर आहेत तितकीच ही साहित्यिक हिंदी हिंदुस्तानीपासून दूर आहे.

हिंदुस्थानीच्या स्वरूपासंबंधीं हिंदीच्या व उर्दूच्या पाठीराख्यांमध्यें जे उथळ वादविवाद चालू असतात त्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण हिंदुस्तानी ही एक जिवंत भाषा आहे; तें एक निर्भेळ सत्य आहे. त्या सत्याचें ज्ञान तात्त्विक काथ्याकूट करून होणार नाहीं. त्याचा प्रत्यक्ष अनुभवच घेतला पाहिजे. शास्त्रीय प्रामाणिकपणा आणि प्रत्यक्ष प्रमाण यांच्या साहाय्यानें या भाषेची संपूर्ण तपासणी केली पाहिजे, तिचा शब्दकोश आणि व्याकरण हीं तयार केलीं पाहिजेत. या बाबतींत इतर देशांतून बोलचालीच्या भाषांचें स्वरूप निश्चित करतांना व पद्धतशीरपणें नवीन भाषा बनवितांना जे सिद्धांत गृहीत धरण्यांत आले होते तेच सिद्धांत पुढें ठेवून आपण हें सर्व कार्य केलें पाहिजे. मात्र या भाषेमध्यें इतका लव-चिकपणा असला पाहिजे कीं संस्कृत, अरबी, फारसी वगैरे भाषांतील नव्हे तर सर्व देशी व परदेशी भाषां-तीलहि जे जे नवीन शब्द सर्वसामान्य जनतेच्या तोंडीं बसतील, ते ते सर्व निःसंकोचपणें या भाषेंत येऊं शकतील. याचा अर्थ असा कीं हिंदुस्तानीचा जो शब्दकोश तयार करण्यांत येईल त्याचे दर वीस वर्षांनीं पुनर्निरीक्षण करून त्यांत नवीन नवीन लोक-प्रिय व लोकरूढ शब्द समाविष्ट करून घेतले पाहिजेत. हिंदुस्तानी बोलणाऱ्या प्रांतांत मातृभाषा म्हणून मुलां-च्या वयाच्या सहाव्या वर्षापासून चौदाव्या वर्षापर्यंत प्राथमिक शिक्षणाचें माध्यम म्हणून आणि बिगर–हिंदुस्तानी प्रांतांत प्राथमिक शिक्षणाच्या दुसऱ्या विभागांत म्हणजे वयाच्या दहाव्या वर्षापासून चौदाव्या वर्षापर्यंत दुय्यम भाषा म्हणून ही समाईक भाषा शिकविली गेली पाहिजे.

### लिपीचा प्रश्न

आतां असा प्रश्न उरतो कीं, देशाची समाईक भाषा जी हिंदुस्तानी ती कोणत्या लिपींत लिहिली जावी ? नागरी, उर्दू व रोमन लिप्यांचा पक्ष घेणारे लोक आपापल्या लिपीच्या मोठेपणासंबंधीं जे मुद्दे मांडतात ते महत्त्वाचे असतात आणि म्हणून या तीन लिप्यांची एकमेकींशीं तुलना करून कोणत्याहि एका लिपीच्या बाजूनें निकाल देणें फार अवघड आहे यांत शंका नाहीं. तरी देखील यांपासून जर कांहीं प्रत्यक्ष फायदा होण्याची आशा असती










तर हें अवघड काम पुरें करण्याचा आम्ही प्रयत्न केला असता. परंतु आज आपल्यामधील राष्ट्रीय भावना जातीय भावनांच्या मानानें फार दुबळी आहे आणि आंतरराष्ट्रीय भावना तर अद्यापि उत्पन्नहि झालेली नाहीं. अशा वेळीं ज्यांना हजारों वर्षांपासून नागरीविषयीं अथवा तिच्याशीं पुष्कळच साम्य असलेल्या इतर लिप्यांविषयीं आपलेपणा वाटत आला आहे, असे सबंध देशांतील हिंदु लोक निव्वळ राष्ट्रीयत्वाखातर आपल्या पूर्वपरिचित नागरी लिपीचा त्याग करून उर्दू लिपीचा स्वीकार करतील अथवा ज्या बहुसंख्य मुसलमानांना हजारों वर्षांपासून उर्दूबद्दल अथवा तिच्याशीं साम्य असलेल्या इतर लिप्यांबद्दल आपलेपणा वाटत आला आहे, ते लोक उर्दू लिपि सोडून देऊन नागरीमध्यें लिहूं लागतील अथवा हे दोघेहि आंतरराष्ट्रीयत्वाखातर आपापल्या लिप्या सोडून देऊन रोमन लिपीचा स्वीकार करतील, अशी आशा बाळगणें व्यर्थ आहे. आणि म्हणून हा प्रश्न सोडविण्याचा फक्त एकच व्यवहार्य मार्ग शिल्लक राहतो. तो म्हणजे हिंदुस्तानी भाषा लिहिण्यासाठीं उर्दू व नागरी या दोन्ही लिप्यांचा स्वीकार करणें हा होय. ज्या प्रांतांत हिंदुस्तानी ही मातृभाषा म्हणून प्रचलित आहे त्या ठिकाणीं प्रत्येक व्यक्तीनें दोन्ही लिप्या शिकून घ्याव्यात आणि इतर प्रांतांतून दोहोंपैकीं कोणती तरी एक लिपि शिकण्याची मुभा असावी.

## सांस्कृतिक मंडळाची आवश्यकता

हिंदुस्तानी भाषेच्या मर्यादा निश्चित करून व तिला एका विशिष्ट पातळीवर आणून राष्ट्रभाषा या नात्यानें सबंध देशभर लोकप्रिय बनविण्यासाठीं एका राष्ट्रीय संस्थेची आवश्यकता आहे. वस्तुतः ही संस्था म्हणजे एक विशाल सांस्कृतिक मंडळ अथवा नॅशनल ॲकॅडमी असली पाहिजे. संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगोपांगांत भारतीयांच्या भिन्न भिन्न जाती-जमातींमध्यें गोडी-गुलाबी, एकदिली व एकोपा निर्माण करणें, मोंगल साम्राज्याच्या काळांतील हिंदुस्तानी संस्कृतीच्या उरल्यासुरलेल्या भांडवलापैकीं जेवढा भाग वांचविण्याच्या योग्यतेचा असेल तेवढा राखून ठेवणें आणि त्यांत नावीन्याचा आत्मा ओतणें, तसेंच पाश्चात्य संस्कृतीचा जेवढा भाग हिंदुस्तानी संस्कृतींत खपून जाण्यासारखा असेल तेवढा आत्मसात् करून घेणें हें या संस्थेचें ध्येय असलें पाहिजे. हिंदुस्थानचें साहित्य व कला यांना सर्वांच्या बाबतींत समान असलेल्या जीवनांतील सखोल समस्या व विशाल ध्येयें यांचें प्रातिनिधित्व करावयास लावणें; अर्थशास्त्र, समाजशास्त्र, नीतिशास्त्र व व्यवहारशास्त्र यांना सर्वांच्या बाबतींत समान असलेल्या परिस्थितीप्रमाणें व कल्पनांप्रमाणें आकार देणें आणि तें सर्व करीत असतां इतर देशांचें अंधानुकरण न करतां डोळसपणें निवड करणें वगैरे गोष्टीहि या संस्थेनें कराव्यात.

ज्या ठिकाणीं सर्व धर्मांचीं व पंथांचीं मुलें एकत्र शिकत असतात अशा सरकारी शाळांसाठीं शिक्षणक्रम तयार करणें हें देखील या नॅशनल ॲकॅडमीचें काम असलें पाहिजे. हा शिक्षणक्रम असा असावा कीं ज्यायोगें समाईक हिंदुस्तानी संस्कृतींतील उत्कृष्ट तत्त्वांची आणि समाईक मानवी संस्कृतींतील उत्तमोत्तम गोष्टींची ओळख मुलांना होईल. या शिक्षणामुळें मुलांमध्यें नव्या युगाचा आत्माच अशी जी शास्त्रीय विवेचकबुद्धि आणि लोकशाहीची कल्पना हीं उत्पन्न होतील. सारांश जिच्यामध्यें जुन्या व नव्या समाईक संस्कृतींतील सर्व तत्त्वांचा संवादी संगम झालेला असेल अशा एका नवीन हिंदुस्तानी संस्कृतीचा परिघ आंखण्याचें कार्य या संस्थेनें केलें पाहिजे आणि मग हा परिघ अधिकाधिक विस्तृत करण्याची खटपटहि तिनेंच केली पाहिजे.

जर अशा प्रकारची संस्था ही सरकारतर्फे अथवा कोणत्याहि राजकीय पक्षातर्फे स्थापन न होतां विद्वान् व कलावान् लोकांचें एक खासगी मंडळ अशा स्वरूपांत असेल तरच ती स्वतंत्रपणें व शास्त्रीय प्रामाणिकपणें कार्य करूं शकेल. या संस्थेच्या कार्यकर्त्यांना एक मूलभूत सत्य मान्य असलें पाहिजे. तें हें कीं हिंदुस्थानांत संस्कृतींच्या वेगवेगळ्या वर्तुळांच्या बरोबरीनें एक समाईक वर्तुळहि विद्यमान आहे व या समाईक वर्तुळाला विशाल बनविणें राष्ट्राच्या सामुदायिक हिताच्या दृष्टीनें अपरिहार्य आहे. या संस्थेंत सर्व प्रकारच्या



अनुक्रमणिका






राजकीय विचारांच्या लोकांचा समावेश होऊं शकेल; मात्र त्यांनीं दोन अटी मान्य केल्या पाहिजेत. एक म्हणजे ते प्रत्यक्ष राजकारणांत भाग घेणारे नसले पाहिजेत आणि दुसरी अशी कीं मतें मिळविण्यासाठीं आम जनतेंतील गैरसमजांना व धार्मिक पक्षपातांना पाठिंबा देणारे नसले पाहिजेत.

परंतु ही नॅशनल ॲकॅडेमी सरकारच्या व राजकीय पक्षांच्या प्रभावापासून अलिप्त ठेवावयाची याचा अर्थ तिनें त्यांच्याशीं कसल्याहि प्रकारचा संबंधच ठेवावयाचा नाहीं असा मात्र नव्हे. तिनें त्यांचा विश्वास संपादन केला पाहिजे, त्यांच्याकडून बिनशर्त मदत घेतली पाहिजे आणि सांस्कृतिक व शैक्षणिक प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत त्यांना निःस्वार्थपणें सल्ला दिला पाहिजे. अर्थात् जेव्हां देशांतील एकूण वातावरण निवळेल, राजकीय प्रश्नांचा कांहीं तरी निश्चित निकाल लागेल, वेगवेगळ्या राजकीय पक्षांमध्यें कामचलाऊ तडजोड होऊन ते सर्वजण मिळून एक राष्ट्रीय सरकार बनवितील तेव्हांच या सर्व गोष्टी होऊं शकतील, हें उघड आहे. एरव्हीं आजच्या परिस्थितींत राष्ट्रामध्यें एकोपा घडवून आणण्याचा प्रयत्न करणारी कोणतीहि संस्था व्यवस्थितपणें काम करूं शकणार नाहीं.

## नॅशनल ॲकॅडेमी केव्हां यशस्वी होईल ?

आम्ही प्रस्तावनेंत असें म्हटलें होतें कीं जेव्हां सांस्कृतिक समन्वयाच्या द्वारें लोकांमध्यें एकमेकांविषयींचा विश्वास, एकदिली आणि एकोपा यांचें वातावरण उत्पन्न झालेलें असेल तेव्हांच देशांतील वेगवेगळ्या पक्षांत राजकीय समझोता होऊं शकेल. आणि आतां आम्ही असें म्हणत आहों कीं सांस्कृतिक समन्वय होण्यापूर्वी राजकीय तडजोड होणें जरूरीचें आहे. वरवर पाहतां असें दिसतें कीं, राजकीय प्रश्नाचा निकाल सांस्कृतिक समस्या सुटण्यावर अवलंबून आहे आणि सांस्कृतिक समस्या सुटणें राजकीय प्रश्नाच्या निकालावर अवलंबून आहे, व हेंच तर्कशुद्ध (Logical) आहे असें वाटतें. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. आज आपला देश ज्या राजकीय व सांस्कृतिक गुंतागुंतींत गुरफटलेला आहे ती गुंतागुंत दूर करण्याचा प्रयत्न करीत असतां आपल्याला या तीन स्थितींमधून जाणें भाग आहे—

(१) प्रथम देशांतील मोठ्या व महत्त्वाच्या राजकीय पक्षांकडून आपण हा सिद्धान्त मान्य करून घेतला पाहिजे कीं, हिंदुस्तानी संस्कृति ही एक प्रकारची संघ–संस्कृति (Federal Culture) असेल. याचा अर्थ असा कीं वेगवेगळ्या प्रांतांच्या व जमातींच्या संस्कृतींना आपापल्या क्षेत्रांत विकास करून घेण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य असेल. कोणत्या तरी एका प्रान्ताची अथवा जमातीची संस्कृति घेऊन ती राष्ट्रीय संस्कृति म्हणून सगळ्या देशावर लादण्याचा प्रयत्न केला जाणार नाहीं. वेगवेगळ्या संस्कृतींतील जीं तत्त्वें सर्व जमातींत व सर्व प्रांतांत पूर्वीपासून खरोखरींच समाईक स्वरूपांत चालत आलेलीं असतील अथवा जीं तत्त्वें आनंदानें स्वीकारण्यास सर्वजण तयार असतील त्या तत्त्वांना अथवा त्यांच्या समुदायालाच राष्ट्रीय संस्कृति अथवा हिंदुस्तानी संस्कृति असें नांव देण्यांत येईल. सारांश राष्ट्रीय संस्कृतीविषयीं निर्णय घेतांना कोणत्याहि प्रकारचा पक्षपात न करतां न्यायाचाच मार्ग स्वीकारण्यांत येईल आणि तिचा प्रचार व विकास करतांना जुलूम—जबरदस्तीची पद्धत न अवलंबितां समजावणीचा व पटवून देण्याचाच मार्ग अंगीकारिला जाईल.

(२) यामुळें वेगवेगळ्या जमातींमधील व विशेषतः हिंदुमुसलमानांमधील सांस्कृतिक झगडा मिटेल आणि परस्परांविषयींच्या शंकाकुशंका व अविश्वास हीं पुष्कळच कमी होतील. हिंदुस्थानच्या घटनात्मक प्रश्नाकडे लोक शुध्द राजकीय व आर्थिक धोरणांच्या दृष्टिकोनांतून पाहूं लागतील व या धोरणांमुळें त्यांना तात्पुरता का होईना राजकीय समेट व ऐक्य घडवून आणणें भाग पडेल.

(३) हें तात्पुरतें ऐक्य घडवून आणल्यानें असें एक वातावरण निर्माण होऊं शकेल कीं ज्या योगें वर सुचविलेली संस्था म्हणजे नॅशनल ॲकॅडेमी यशस्वीपणें चालूं शकेल व तिच्या द्वारें हळूंहळूं वास्तविक आणि मजबूत राष्ट्रीय ऐक्याचा पाया घातला जाईल.

---



अनुक्रमणिका







आचार्य **वि. प्र. लिमये**

# विनोबाकृत 'ईशावास्य-वृत्ति' : संपरीक्षण

मंत्र ४

* चौथ्या मंत्रांत 'अनेजत्– मनसो जवीयः', 'तिष्ठत् तत्– धावतोऽन्यानत्येति' हीं जीं परस्पर-विरुद्ध भासणारीं द्वंद्वें आहेत तीं ईशोपनिषदानें जिरविलीं असावींत असें दिसून येईल. पण ही वितर्क-सरणी सामान्य तर्कशास्त्राला कशी पटवा-वयाची ? तर्कशास्त्राच्या सांच्यांत ती कशी बसवा-वयाची ? त्यासाठीं पुढें विवर्तवादाची युक्ति विचार-कांनीं शोधून काढिली, असें श्रीशंकराचार्योंनीं प्रवर्तिलेल्या 'मायावादा'ला उद्देशून विनोबा लिहितात–(पृ. २२). 'माया' हा शब्द ऋग्वेदा-सारख्या प्राचीन वाङ्मयांत अनेकदां अनेक अर्थांनीं आलेला आहे. वेदांतील आधार म्हणून शंकराचार्य 'इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते' (ऋ., ६, ४७, १८,) हा मंत्र अवतरतात. परंतु माझ्या मतें पुढील दोन मंत्र जास्त सयुक्तिक व मायावादाच्या आधुनिक कल्पनेचे बीजभूत असे वाटतील:—

"यत् इन्द्र अहन् प्रथमऽजां अहीनां
आत् **मायिनां** आमिनाः प्र उत **मायाः**।
आत् सूर्यं जनयन् द्यां उषसं
तादीत्ना **शत्रुं न किल विवित्से** ॥"
(ऋ., १, ३२, ४.)

याच्याहीपेक्षां खालील मंत्र याबाबत जास्त स्पष्ट आहे:—

"**माया** इत् सा ते यानि युद्धानि आहुः
न अद्य **शत्रुं** ननु पुरा विवित्से ॥"
(ऋ., १०, ५४, २.)

"(मंत्रांतील) 'देव' शब्दानें शरीरांतील प्रकाशद्वारें–ज्ञानेंद्रियें समजावयाचीं आहेत. वस्तुतः देव म्हणजे ब्रह्मांडांतील 'दिव्य' शक्ति होत." इत्यादि विनोबा लिहितात. 'इति अधिदैवतं। अथ अध्यात्मं' अशीं दुहेरीं वर्णनें उपनिषदांतून नेहमीं येत असतात. याला धरूनच विनोबांनीं हें विवेचन केलें आहे. 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' ही मराठी म्हण हेंच दर्शवितें. '**इंद्र**' म्हणजे 'आत्मा' व त्याचीं साधनें म्हणजे '**इन्द्रियें**'. पुढील वाङ्मयांत '**इन्द्रिय**' शब्दाचा हा अर्थ संकुचित झाला आहे. परंतु 'इन्द्रसंबंधीं जें (सर्व) तें इन्द्रिय' असा अर्थ ऋग्वेदांत दिसून येतो– "इन्द्रियो रसः इन्द्रियं महिमानं, इं० वग्नुं, इं० श्लोकं, इं० सोमं, इन्द्रियं नाम, इं० पौंस्यं, इं० हवनं,... इ०" 'इन्द्र' शब्दाची व्युत्पत्ति 'इदं **द्रष्टा**' (ऐ. १, ३, १४) 'इदं **अदर्शं** इति' अशी विनोबांनीं सुचविली आहे. ऐतरेयांतील प्रस्तुत प्रकरणांत 'इन्द्र' शब्दाची 'इदं द्र' अशीहि व्युत्पत्ति असावी असें त्याच उपनिषदांतील पुढील वाक्यावरून दिसतें:— "स **एतमेव** सीमानं **विदार्य** एतया द्वारा प्रापद्यत सा एषा **विदृतिर्नाम** द्वाः तदेतन्नांदनं... (ऐ. १, ३, १२.). वरील दोन्ही व्युत्पत्त्या 'अर्थनित्यः परीक्षेत' या नियमाला धरून सुचविलेल्या दिसतात. खरी व्युत्पत्ति निराळीच असण्याचा संभव आहे. 'इंदु' शब्दाशीं 'इंद्रा'चें साम्य आहे. तसेंच 'इध्–इन्ध्' हा धातूहि या शब्दाच्या मुळाशीं असावा. बृ. उ., ४, २, २ पाहा:— "इन्धो

---

* आचार्य विनोबाकृत 'ईशावास्य–वृत्ति' या ग्रंथाच्या तिसऱ्या मंत्राअखेरपर्यंतच्या भागावरील संपरीक्षण 'नवभारत'च्या ऑगस्टच्या अंकांत आलें आहे. या लेखानें तें पूर्ण झालें आहे. —का. सं.



अनुक्रमणिका

ह वै नाम एषः योऽयं दक्षिणेऽक्षन् पुरुषः तं वै एतं **इन्धं** सन्तं **इन्द्र** : इत्याचक्षते परोक्षेणैव परोक्ष-प्रियाः इव हि देवाः प्रत्यक्षद्विषः ।''

'तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति' याच्या अर्था-बाबत अनेक घोंटाळे आहेत. कारण, त्यांतील 'अपः' पदाचा अर्थ अनिश्चित आहे. प्रस्तुत मंत्रांत 'त्याच्या-च म्हणजे आत्म्याच्याच सत्तेवर (तस्मिन्) सर्वत्र गतिसंचार करणारें प्राणतत्त्व (मातरिश्वा) काम (अपः) करते (दधाति), आत्म्याच्या सत्तेवांचून लटकें पडतें' असा त्यांतल्या त्यांत सरळ अर्थ विनोबांनीं काढला आहे. परंतु अथर्ववेद(११,५,१३)

"अग्नौ सूर्ये चन्द्रमसि
**मातरिश्वन्** ब्रह्मचारी
**अप्सु** समिधं आ **दधाति** ॥"

या मंत्रांतील 'मातरिश्वन्' (सप्तमी) 'दधाति' या दोन शब्दांच्या साहचर्यानें आलेला 'अप्सु' शब्द पाहिला म्हणजे 'अपः' याचा अर्थ 'कर्म' कर-ण्याकडे प्रवृत्ति होणार नाहीं.

### मंत्र ६

'मंडूकप्लुति' न्यायानें आपण पांचवा मंत्र गाळून एकदम सहाव्यावर येऊं. पांचव्या मंत्राबाबत एवढेंच सुचवावयाचें कीं, 'तदु सर्वस्य अस्य बाह्यतः' यांतील 'अस्य' हें वृत्ताच्या दृष्टीनें गाळून टाकावयास हवें.—मंत्राच्या अर्थांत 'निरंतर' हा शब्द मुळांत नसतांना जादा घातल्यासारखा भासतो. 'निरंतर' शब्द कां आवश्यक आहे याचा खुलासा याच ठिकाणीं व्हावयास हवा होता; परंतु येथें न करतां तो पुढील मंत्राच्या टिप्पणींत केला आहे:— "मागच्याहि आणि त्याहि मंत्रांत दर्शनावर संतोष न मानतां अनुदर्शनाची अपेक्षा केली आहे. अनुदर्शन म्हणजे सतत दर्शन. विशिष्ट पवित्र क्षणांत वीज चमकल्या-सारखें 'प्रातिभ-दर्शन' झालें तरी तें पुरेसें नाहीं. तें एक आश्वासन मात्र आहे. सूर्यप्रकाशासारखें सतत दर्शन पाहिजे. तरच संसारक्षय होईल". ही सूक्ष्म अर्थच्छटा लक्षांत घेण्यासारखी आहे. उपनि-षदांत 'अनुविन्देत्' 'अनुवित्तः' यांतील 'अनु' उपसर्गाचा उपयोग 'सातत्य' दाखविण्याकडे होतो, हेंहि स्पष्ट होईल. तसेंच गीतेंतहि पुढील ठिकाणीं 'अनु' उपसर्ग 'सातत्य'-बोधक घातला असल्याचें आढळून येईलः—

"तस्मात् सर्वेषु कालेषु
**मामनुस्मर** युध्य च ॥-" गी. ८, ७.
"कविं पुराणं अनुशासितारं
अणोरणीयांस**मनुस्मरेद्** यः ॥"- गी. ८, ९.
"ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म
व्याहरन् **मामनुस्मरन्** ॥"-गी. ८, १३.

तसेंच,

"अनन्यचेताः सततं
यो मां स्मरति नित्यशः ॥"-गी. ८, १३.

या श्लोकांत 'स्मरति' अनुपसृष्ट असला तरी 'अनु'ची उणीव अर्थदृष्ट्या 'सततं' आणि 'नित्यशः' या दोन शब्दांनीं चांगलीच भरून काढली आहे. बुद्धधर्मानें **'अनुस्सति'** (**अनुस्मृति**) म्हणजे 'सतत **अनुसंधान**' राख-ण्यास आज्ञापिलें आहे. या मंत्रावरील टिप्पणींत (१) विचारदृष्टीनें (२) उपासनादृष्टीनें व (३) आचारदृष्टीनें केलेलें त्रिविध वर्णन विनोबांच्या सूक्ष्मग्राही बुध्दीची व साम्यदर्शनक्षमतेची साक्ष पटवितें. तसेंच 'आत्मन्' शब्दाच्या अर्थाचें विवेचनहि चांगलें वठलें आहे. या मंत्रांत 'आत्मन्येव' याऐवजीं 'आत्मन्नेव' असा पाठभेद आहे. अर्थांत कांहींच फरक नाहीं. कारण 'आत्मन्' ही वैदिक सप्तमी विकल्पानें येते. या मूळरूपात्मक 'सप्तमी'बरोबर कित्येकदां 'अन्तः' हा शब्द वैदिक वाङ्मयांत येतो. उपनिषदांतहि हा प्रकार क्वचित् येतोः—

"तस्मात् पराङ् पश्यति
नान्तरात्मन् ।" —कठ,४,१

'मनुष्य बाहेर पाहतो, आपल्या आंत पाहत नाहीं' (आत्मन्- आत्मनि अन्तः न पश्यति). परंतु हा प्रकार असा आहे, हें पुष्कळाच्या लक्षांत आलेलें नाहीं. (पाहाः शांकरभाष्य- **तस्मात् पराङ्** पराग्रूपान् अनात्मभूतान् शब्दादीन् **पश्यति** उपलभते उपलब्धा **नान्तरात्मन्** नान्तरात्मान-मित्यर्थः)

'ततो न विजुगुप्सते' याचा अर्थ करतांना 'यः'ला अनुरूप असें 'सः' हें पद अध्याहृत घ्यावें लागतें. 'ततः' म्हणजे 'तस्मात्' हें पद



अनुक्रमणिका





'यः'चें प्रतियोगी मानलें म्हणजे अर्थ निराळा होतो. 'लोकः' हा 'विजुगुप्सते' याचा अध्याहृत कर्ता घ्यावा लागेल. 'एवंगुणविशिष्ट माणसाला लोक कंटाळत नाहींत' 'यस्मान्नोद्विजते लोकः' ही कसोटी, 'लोकान्नोद्विजते च यः' ह्यापेक्षां कठिण आहे.

'आत्मन्' शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल विनोबांनीं फारच विद्वत्ताप्रचुर प्रवचन केलें आहे. त्यांच्या मतें 'आत्' या पूर्ववैदिक धातूचें 'मन्' प्रत्यय लावून झालेलें 'आत्मन्' हें शब्दरूप आहे. ज्ञानेश्वरींतील 'आतला' यांत 'आत्' हा धातु आहे, असें म्हटलें आहे; तामीळ आदि द्राविड भाषांतहि तो अपभ्रंशानें प्रकटला आहे असें त्यांचें म्हणणें. पण त्यांना निर्णायक प्रमाण देतां आलेलें नाहीं. वेदांमध्यें 'आत्मना'च्या ऐवजीं 'त्मना', 'आत्मानं' ऐवजीं 'त्मनं', 'त्मने', 'त्मनि' किंवा 'त्मन्' अशीं रूपें सर्रास येतात. त्यांवरून 'त्मन्' किंवा 'आत्मन्' असें एका अर्थाचे दोन शब्द असावेत असें दिसतें. साहजिकच 'आ' हा उपसर्ग ठरतो. त्यामुळें 'आत्' धातूची कल्पना ढांसळते. जर्मन पंडित ऋग्वेदकोशकार ग्रासमन यानें 'वा' हा धातु सुचविला आहे. वा + त्मन् = वात्मन् = आत्मन् ( व् चा लोप होऊन ) म्हणजे मुळांत आत्मन् = वात = प्राण, असा त्यानें कल्पिलेला आहे. ऑटो, ॲथेम वगैरे लॅटिन व जर्मन शब्द 'आत्मन्'शीं संबध्द दिसतात. तथापि या सर्वांचें मूळ काय असावें, हें अद्याप निश्चयानें कोणासच सांगतां आलेलें नाहीं.

### मंत्र ८

'शुक्रं' 'अकायं' यांवर टिप्पणी लिहितांना विनोबा लिहितातः— "म्यानांतून तलवार खेंचावी त्याप्रमाणें देहांत गुंडाळलेल्या आत्मतत्त्वाला सूक्ष्म बुध्दीनें आणि धैर्यानें खेंचून काढलें म्हणजे त्याचें अमर तेज प्रकट होत असतें" (कठ, ६, १७.) ज्या वेळीं आपण एकाद्या मंत्राचें भाषांतर करून तो उतारा म्हणून देतो, त्या वेळीं तें जसेंच्या तसें दिलें पाहिजे. त्यांतील उपमांत आपल्या मनचाच बदल करतां कामा नये. 'मुञ्जादिव इषीकां' 'मुञ्ज गवतांतून ज्याप्रमाणें आंतली बारीक काडी निराळी काढावी अगर सोडवावी त्याप्रमाणें'—ही उपमा गाळून तीऐवजीं तलवार-म्यान' ही उपमा घालणें हें अप्रशस्त होय.

वैदिक संस्कृतांतला 'परिभूः' याचा अर्थ स्पष्ट होण्याकरतां ऋग्वेदांतील दोन उदाहरणें देतोंः—

"अग्ने यं यज्ञं अध्वरं
विश्वतः परिभूः असि।" (१, १, ४.)
"अग्ने नेमिः अरान् इव
देवान् त्वं परिभूः असि।" (५, १३, ५)

रथचक्राच्या 'अर–नेमि' उपमेनें व 'परि' या उपसर्गानें अर्थ अतिशयच स्पष्ट झाला आहे हें दिसून येईल.

'कविर्मनीषी' यांतील 'मनीषी' शब्दाचा अर्थ 'मनसः ईष्टे इति मनीषी'— 'जो मनावर सत्ता चालवूं शकतो....' इत्यादि विनोबांनीं केला आहे. ही तऱ्हा जुनीच आहे. 'मनसः ईषिता सर्वज्ञः ईश्वरः इत्यर्थः' असें शांकरभाष्य आहे. 'हृदा मनीषा मनसाऽभिक्लृप्तः' (कठ. ६, ९) या वरील भाष्यांत आचार्य लिहितात- "**हृदा** हृत्स्थया बुद्ध्या। **मनीषा मनसः** संकल्पादिरूपस्य **ईष्टे** नियन्तृत्वेन इति **मनीट्** तया **मनीषा** अविकल्पयित्र्या बुध्द्या। **मनसा** मननरूपेण सम्यग्दर्शनेन ..." परंतु ऋग्वेदाकडे नजर टाकल्यास आपणांस 'षिन्' प्रत्यय अनेक धातूंना लावून नामें केल्याचें दिसून येईल. उदा०:– मनीषिन्, ऋजीषिन्, पुरीषिन्, प्रहोषिन्, यक्षिन्, मृक्षिन्...' इत्यादि. विचार करणारा, जाणता, विद्वान् यांखेरीज 'मनीषिन्'चा अर्थ दुसरा कोणताहि नाहीं. मनुष्याप्रमाणें, 'मनीषी' हा शब्द वेदांमध्यें सोम, मरुत् इत्यादि देवतांना लावलेला आढळून येतोः—

"धियो **मनोता** प्रथमो **मनीषी**"
—ऋ., ९, ९१, १.

"एषः **विश्वविद्** पवते **मनीषी**"
—ऋ., ९, ९७, ५६.

"समुद्रियः अप्सरसः **मनीषिणं**
आसीनाः अन्तः अभि सोमं अक्षरन्॥"
—ऋ., ९, ७८, ३.

"वाशीमन्तः ऋष्टिमंतः **मनीषिणः**
स्वायुधाः मरुतः याथन शुभं।"
—ऋ. ५, ५७, २.










# विनोबाकृत ‘ईशावास्य–वृत्ति’ : संपरीक्षण

## मंत्र ९ ते १४

या सहा मंत्रांत ‘विद्या–अविद्या’, ‘संभूति–विनाश’ यांसंबंधीं विवेचन करणारीं दोन त्रिकें आहेत. शंकराचार्यांनीं ‘विद्या’ या शब्दाचा गौण अर्थ घेऊन ‘विद्या–अविद्ये’च्या साहचर्याची उपपत्ति लावून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. लोकमान्य टिळकांनीं ह्या मंत्रांचा ‘ज्ञानकर्मसमुच्चय-वादा’च्या सिद्ध्यर्थ उपयोग केला आहे. प्रस्तुत प्रकरणांत विनोबांनीं या पक्षाचें उत्तम खंडन केलें आहे. अरविंद घोसांनीं ‘ईशोपनिषद्’ व ‘दिव्य जीवन’ या आपल्या ग्रंथांत ‘विद्येनें घोरतर अंधकारांत शिरावें लागतें’ याचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे. “कल्पनाशक्ति कितीहि ताणली तरी आत्मज्ञानाला ‘गाढ अंधार’— आणि तोहि अविद्येहून जणूं अधिकच– कसें म्हणतां येईल, हें लक्षांत येत नाहीं” असा आक्षेप विनोबांनीं उपस्थित केला आहे व त्याचा परिहार त्यांनीं निराळे, समर्पक अर्थ सुचवून केला आहे. “अविद्या आणि विद्या, नेणीव आणि जाणीव, हीं दोन्ही एकाच वस्तूचीं निवृत्त (निगेटिव्ह) व प्रवृत्त (पॉझिटिव्ह) अंगें आहेत. तदनुरूप त्यांचीं फळेंहि निवृत्त आणि प्रवृत्त स्वरूपाचीं दाखविलीं आहेत. ‘अविद्या म्हणजे, इष्ट अर्थानें, अनधिकृत अनंत ज्ञानें न जोडणें’ व ‘विद्या म्हणजे, इष्ट अर्थानें, अधिकृत विशिष्ट ज्ञानें जोडणें’–या अर्थांनीं हे शब्द ईशावास्याचे पारिभाषिक आहेत....... ‘संभूति–असंभूति किंवा विनाश’ या जोडींतील ‘विनाश’ शब्द ‘अविद्ये’चेहि दोन भाग सुचवितो (१) व्यर्थ भाराभर ज्ञान न जोडणें आणि (२) जुनें जोडलेलें विसरणें.”

“अविद्येपासून अपेक्षित लाभ (१) बुध्दीवर भार नसणें, (२) प्राणशक्तिसंचय व (३) नम्रता हे होत. विद्येपासून अपेक्षित लाभ बौध्दिक दिशादर्शन हा होय. विद्या-अविद्या एकमेकींच्या साहाय्यावांचून अकिंचित्कर आहेत.” “विद्याहीन अविद्या आणि अविद्याहीन विद्या नुसत्या अकिंचित्करच नव्हेत, पण अनर्थकारीहि ठरणाऱ्या आहेत. म्हणून एकेकीचा आश्रय घेणें हा अंधार म्हटला.”

“पण ह्यांपैकीं कोणता अंधार घोरतर हें सांगणें कठिणच आहे. ‘भूय इव’ मधील ‘इव’ शब्दानें हें सुचविलें आहे. तथापि केवळ अविद्या एकपरी पुरवली, पण केवळ विद्या नको, असेंच येथें म्हटल्यासारखें आहे. कारण, विद्याहीन अविद्येंतून ज्ञानशून्य जडता निघाली तर अविद्याहीन विद्येंतून प्राणहीनता आणि शिवाय अहंकारहि निघणार! हा परिणाम अधिक भयानक म्हणावासा वाटला.”

हें विवेचन इतकें स्वतंत्र व नावीन्यपूर्ण आहे कीं, त्यांतला मुख्य भाग उतरून वाचकांपुढें ठेवण्याचा मोह आंवरतां आला नाहीं. तथापि विनोबांनाहि ‘भूय इव’ कां, याचें कोडें चांगलें उलगडून दाखवितां आलें नाहीं हें त्यांच्या ‘...असें येथें **म्हटल्यासारखें** आहे’ व ‘हा परिणाम अधिक भयानक **म्हणावासा** वाटला’ या उद्गारांवरून दिसून येतें.

“‘ये नः तत् विचचक्षिरे’ या मंत्रांत आत्म-तत्त्वाला–ब्रह्माला ‘तत्’ म्हटलें आहे. ‘तत्त्वमसि’ या महावाक्यांतील आदिपद हेंच. ‘तत्’ म्हणजे ‘पैल वस्तु’, सर्व द्वंद्वांपलीकडचें. तेंच जाणावयाचें आहे, तेंच गांठावयाचें आहे, त्यांतच ‘त्वं’चा लय करावयाचा आहे.” या विवेचनाला थोडी पुष्टि व बृहदारण्यकांतील आधार पुढीलप्रमाणें देतां येईल— “कतम एको देव इति प्राण इति स ब्रह्म त्यत् इति आचक्षते।”–बृ. ३, ९, ९.

‘संभूति–विनाश’ या त्रिकांतील ‘संभूति’ म्हणजे ‘सद्वृत्तींचा विकास’ आणि ‘विनाश’ म्हणजे ‘असद्वृत्तींचा निरोध’ असा अर्थ करून विनोबा यासंबंधीं लिहितातः— “येथील ‘संभूति’ आणि ‘असंभूति’ ह्या शब्दांच्या अर्थासंबंधीं एकमत नाहीं. आणि ह्यापुढेंहि तें होईल अशी फारशी आशा करतां येत नाहीं. येथें केलेल्या अर्थनिश्चिती-संबंधीं इतकेंच म्हणावयाचें कीं, ती करतांना वैदिक वाङ्मयाची घेतां आली तितकी साक्ष घेतली आहे.”

“विधायक विकासदृष्टीच्या अभावीं केवळ निरोधरूप निषेधक साधना अंगावर उलटते. अशुभ-वृत्तींचा निरोध म्हणतां म्हणतां त्याच वृत्ती दृढावूं लागतात. हा निरोधांतलि गाढ अंधार! उलट पक्षीं







निरोधशून्य केवळ विकासाच्या कल्पनेनें जणूं ह्याहूनहि घोर अंधार निर्माण होऊं पाहतो. **गुणविकासाच्या नांवानें मनुष्य न कळत अनेकविध विषयपाशांनीं करकचून जखडला जातो.** दोन्ही बाजूंकडील अंधाराचा हा एक नमुना मात्र दर्शविला......तो ज्याचा त्यानेंच शोधून पाहिला पाहिजे. तो सर्व टाळण्यासाठींच आत्मज्ञान हवें.''

'ये नः तत् विचचक्षिरे' यावर टिप्पणी लिहितांना विनोबा म्हणतातः—"...उपनिषदांनींहि पूर्व-**गुरूंचा** हवाला दिला आहे. 'बिनु गुरु होय कि ग्यान ?' हाच ह्याचा निष्कर्ष.'' उपनिषदांनीं, गीतेनें व अलीकडच्या काळांत सर्व संतांनीं गुरूचा महिमा गाइला आहे. 'आचार्यवान् पुरुषो वेद', 'आचार्याद्धि विद्या विदिता साधिष्ठं प्रापयति', 'स **गुरु**मेवाभिगच्छेत्', 'आश्चर्यो ज्ञाता **कुशला**नुशिष्टः', '**उपदेक्ष्यन्ति** ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः', '**आचार्यो**पासनं' व 'गुरु बिन कौन बतावे वाट ?' इ० वचनें हेंच कंठरवानें सांगत आहेत. विनोबांनीं हा विषय जास्ती प्रपंचिला नाहीं, यावरून साधार शंका येते कीं त्यांचीहि श्रद्धा अशीच आहे काय ? का त्यांनीं आजपर्यंतचें रूढ मत अंगीकारल्यासारखें केलें आहे ? तें कांहींहि असो, स्वप्रयत्न हा खरा व स्वाधीन मार्ग होय, हें निर्विवाद आहे. 'देव' किंवा 'परमात्मा' आपल्या हृदयांतच असल्यामुळें 'मोहावरण' बाजूला झालें म्हणजे 'तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्'. गीतेनेंहि एका ठिकाणीं 'तत्स्वयं योगसंसिद्धः कालेन आत्मनि विन्दति' असें सांगून स्वप्रयत्नाची महती वर्णिली आहे.

'इति शुश्रुम'—'श्रुति, स्मृति आणि कृति'ही उपनिषदांची थोडक्यांत ज्ञानप्रक्रिया आहे—विनोबा. हाच भाव निरनिराळ्या तऱ्हेनें व्यक्त केला गेला आहेः—

"आत्मा वा अरे द्रष्टव्यः। श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः''—बृ. ४,५,६.

"यदेव विद्यया करोति श्रद्धया उपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति।''

—छां. १,१,१०.

"तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया !''

—गी., ४, ३४.

"आगमेन अनुमानेन ध्यानाभ्यासरसेन च
त्रिधा प्रकल्पयन् प्रज्ञां लभते योगमुत्तमम्॥''

—योगसूत्र—व्यासभाष्य.

## मंत्र १५

"तत्त्वं पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये'' याचा "हे विश्वपोषक प्रभो, मी सत्यधर्माचा उपासक, माझ्या दर्शनासाठीं तें तूं उघडें कर'' असा अर्थ विनोबांनीं केला आहे. विनोबांच्या काय किंवा श्रीशंकराचार्यांच्या काय 'सत्यधर्माय दृष्टये' या पदांचा अर्थ बरोबर लक्षांत आलेला दिसत नाहीं. शंकराचार्य लिहितात :—"सत्यधर्माय (१) तव सत्यस्य उपासनात् सत्यं धर्मो यस्य मम सो ऽहं सत्यधर्मा तस्मै मह्यम्। (२) अथवा यथाभूतस्य धर्मस्य अनुष्ठात्रे **दृष्टये** तव सत्यात्मनः उपलब्धये।''. यावरून अर्थ करण्याची अडचण त्यांना जाणवलेली दिसते. 'सत्यधर्मः' हा समास 'सत्यं एव धर्मः सत्यधर्मः'' असा सोडविला पाहिजे. 'सत्यं' आणि 'धर्म' यांची एकरूपता बृहदारण्यकांत (१, ४, १४) वर्णिली आहे :—

"यो वै स धर्मः सत्यं वै तत् तस्मात् सत्यं वदन्तं आहुः धर्मं वदति इति धर्मं वा वदन्तं आहुः सत्यं वदति इति।''. पाश्चात्य वैयाकरण ज्याला 'विभक्तींचें परस्पराकर्षण' म्हणतात किंवा आपल्याकडील वैयाकरण 'क्रियाग्रहणं कर्तव्यमिति कर्मणः सम्प्रदान संज्ञा' (पातंजल महाभाष्य) असा ज्याचा उलगडा करतात तशा प्रकारची 'सत्यधर्माय दृष्टये' ही वैदिक भाषेची लकब आहे. याचा अर्थ 'सत्यधर्मं द्रष्टुं' किंवा 'सत्यधर्मस्य दृष्टये' असा आहे. ऋग्वेदांत 'तवे', 'तवै' इत्यादि 'तुमर्थी'चा उपयोग या दृष्टीनें हवा तितका केलेला आढळतो. उदाहरणार्थ :—

(१) "अग्ने **हव्याय वोळहवे**'' (१,४५,६)

(२) "एष स्तोमो **महे उग्राय वाहे**'' (७, २४, ५)

(३) उशन् उशतः आ वह। पितॄन् **हविषे अत्तवे**॥ (१०, १६, १२)

(४) "इन्द्रस्य वायोः **सख्याय कर्तवे**।"
(९, ८६, २०)

(५) "यातं **पाराय गन्तवे**" (१, ४६,७)

(६) इन्द्रो **दीर्घाय चक्षसे**। आ सूर्यं रोहयद्
दिवि॥ (१, ७, ३,)

(७) "**विश्वस्मै चक्षसे** अरं"
(७, ६६, १४)

(८) आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन।
**महे रणाय चक्षसे**" (१०, ९, १,)

(९) "अधा **यज्ञाय तुर्वणे** व्यानशुः"
(८, १२, १९)

(१०) "पुरा **जत्रुभ्यः आतृदः**" (८,१,१२)
('चतुर्थी' ऐवजीं 'पंचमी.')

(११) "**महे शुल्काय** वरुणस्य **नु त्विषे**"
(७,८२,६.)

(१२) "**अघाय** भूम हरिवः **परादै**" (७,१९,७)

(१३) "अधाकृणोः पृथिवीं **सन्दृशे दिवे**"
(२,१३,५)

(१४) "त्राध्वं **कर्तात् अवपदः** यजत्राः"
('चतुर्थी' ऐवजीं 'पंचमी') (२,२९,६)

(१५) "यंसीं अकृण्वन् **तमसे विपृचे**" (४,१३,३)

(१६) "गोबन्धवः सुजातासः **इषे भुजे**"
(८,२०,८)

(१७) "नि मातरा नयति **रेतसे भुजे**",
(१, १५५, ३)

(१८) "न **दूताय प्रह्ये** तस्थे एषा
तथा राष्ट्रं गुपितं क्षत्रियस्य।"
(१०, १०९, ३)

परंतु अर्थाच्या दृष्टीनें 'दृष्ट्ये' याचा अर्थ 'तुमर्था'सारखा असला तरी हा प्रयोग 'तुमर्थे सेसेनसे असे०' इत्यादि पाणिनिसूत्रांत (३, ४, ९) बसत नाहीं. 'दृशये' असा तुमर्थी प्रयोग फक्त एका ठिकाणीं ऋग्वेदांत आढळतो:--

"तौ अस्मभ्यं **दृशये सूर्याय**
पुनर्दातां असुं अद्य इह भद्रं।"
(१०, १४, १२)

'सत्यधर्माय दृष्टये' यासारखा हुबेहूब प्रयोग शतपथ-ब्राह्मणांत (१, ८, १, १) आढळल्याचें मॅक्डोनेल या पंडितानें आपल्या 'वैदिक व्याकरणां'त नमूद केलें आहे:--

"यथा इदं **पाणिभ्यां अवनेजनाय** आहरन्ति एवं" (हात धुण्याकरितां अगर स्वच्छ करण्याकरितां)

"हिरण्मयेन पात्रेण"-- ऋग्वेदांत 'हिरण्य' शब्द नाना रूपें धारण केलेला दिसतो. 'हिरण', 'हरि', 'हिरि', 'हरित्', 'हिरणिन्', 'हिरण्यय', 'हिरण्ययु' इत्यादि. लॅटिन 'ऑरम' या शब्दाशीं याचें साम्य भाषाशास्त्रज्ञ मानतात. माझ्या मतानें 'हिरण्य' शब्दाचा एक अर्थ 'लोखंड' हा आहे व इंग्रजी 'आयर्न' या शब्दांत मूळ 'हिरण्य'च आहे. जुन्या इंग्रजींत सांपडणारा 'इरेन' हा शब्द इतर समान भाषांत सांपडत नाहीं. 'अयस्' हा 'लोखंड'--वाचक शब्द जुन्या इंग्रजीच्या दुसऱ्या एका स्वरूपांत 'इसेर्न', 'इसेन' असा, डच्मध्यें 'इझेर' असा व जर्मनमध्यें 'आयसेन' अशा स्वरूपांत आढळतो. ऋग्वेदांत 'हिरण्य' जोडून झालेले शब्द अतीच अति आहेत. 'हिरण्या'चें काय नाहीं! वज्र, रथ, मणि, कलश, कर्ण, केश, गर्भ, चक्र; जिह्वा, त्वच्, दंत, निर्णिज्, नेमि, पक्ष, पर्ण, पाणि, पिण्ड, पेशस्, प्रउग, बाहु, रूप, वन्धुर, वर्ण, वर्तनि, वाशी, शम्या, शिप्र, शृंग, संदृक्, स्तूप, हस्त, अक्ष, अभीशु, श्मश्रु,... सर्व कांहीं आहे. या विस्तृत उपयोगावरूनहि त्याचा अर्थ 'सोनें' नसून 'लोखंड किंवा पोलाद' असावा अशी कल्पना धांवते. यास्काचार्यांनीं हा शब्द अनेक रीतींनीं निर्वचिला आहे:--

१ ह्रियते आयम्यमानं (दुर्ग-- शिल्पिभिः कटक-रुचक-स्वस्तिकादिभावेन विस्तीर्यमाणं)
२ हितरमणं भवति (दुर्ग-- दुर्भिक्षादिषु)
३ ह्रियते जनाज्जनं (विनिमयाचें साधन)
४ हृदयरमणं भवति (दुर्ग -- तेन हि गृहीतेन सूपकोऽपि रमते किमुत मनुष्यः)
५ हर्यतेर्वा स्यात् प्रेप्साकर्मणः

'अर्थनित्यः परीक्षेत' हें तत्त्व प्रत्यक्षांत कसें अंमलांत आणीत, तें वरील उदाहरणांवरून समजून येतें. यांपैकीं कोणतेंहि निर्वचन बरोबर नसो, 'सुवर्णा'-संबंधीं इतक्या प्राचीनकालीं काय कल्पना होत्या तें चांगलें ध्यानांत येतें.



अनुक्रमणिका






'पूषन्' ही देवता ऋग्वेदांत 'हरवलेली वस्तु' सांपडवून देणारी आहे. तेव्हां 'हरवलेलें' आत्मतत्त्व अगर 'सत्यधर्म' पुनः पाहण्याकरितां त्याची प्रार्थना या मंत्रांत केली आहे, हें युक्तच होय.

"आ पूषन्... आ अज नष्टं यथा पशुं"
—ऋ. १, २३, १३.

"पूषा... अपगूळ्हं गुहा हितं अविन्दत्"
— ऋ. १, २३, १४.

"अप त्यं परिपन्थिनं
मुषीवाणं हुरश्चितं
दूरं अधि स्रुतेः अज॥"
—ऋ. १,४२,३.

"आ ते स्वस्तिं ईमहे
**आरे अघां उपावसु**" —ऋ. ६,५६,६.

"पूषेव धीजवनोऽसि सोम" —ऋ. ९,८८,३.

"सोऽस्मान् **अभयतमेन** नेषत्
**अप्रयुच्छन्** पुरः एतु प्रजानन्"
—ऋ. १०, १७, ५.

१५३ व्या टिप्पणींतील पुढील 'समस्या' चांगली मांडून दाखविली आहे:—

"दर्शनासाठीं सत्य आत्मा बनतें,
प्रार्थनेसाठीं सत्य ईश्वर बनतें,
आचरणासाठीं सत्य धर्म बनतें."

## मंत्र १६

ऋग्वेद १०, २६, ५ मध्यें 'पूषन्', 'ऋषि' असें म्हटलें आहेः—

"**ऋषिः** सः यः **मनुर्हितः**
विप्रस्य यावयत्सखः।"

'ऋषि' शब्दाची व्युत्पत्ति चिन्त्य आहे. पाणिनि धातुपाठांत (६.७) 'ऋषी गतौ' असें सांगतो. तै. आ. (२.९) मध्यें ('तद् यद् एनान् तपस्यमानान् ब्रह्म स्वयंभु अभ्यानर्षत् तद् ऋषीणां ऋषित्वं इति विज्ञायते') 'ऋष्' हींच 'ऋषि' शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे. यास्काचार्यांनीं तिचा वैकल्पिक उल्लेख निरुक्तांत (२.११)त केला आहे. 'विप्र' शब्दांत 'विप्' हा धातु आहे. त्याचाच पुढें 'वेप्' (कंप येणें) हा धातु बनला. अंगांत येऊन सर्वांगाला थरकांप सुटणें ही कल्पना 'ऋषि किंवा 'विप्र' या शब्दांच्या बुडाशीं आहे. अष्ट सात्त्विक भावांत 'वेपथु' आपणांस माहीत आहे. त्याच्याशीं याचें साम्य दिसतें. तात्पर्य, कवि, होता हा 'ऋषि' शब्दाचा मूळ अर्थ. त्याचा व्यापक व खोल अर्थ पुढील काळांत झाला व क्रांतदर्शी (कवि) हा अर्थ 'ऋषि' शब्दाला चिकटला. 'अर्थनित्यः परीक्षेत' या न्यायानें 'ऋषिर्दर्शनात्। स्तोमान् ददर्श इति औपमन्यवः' ही व्युत्पत्ति निरुक्तकारांनीं (निरुक्त २.११) मान्य केली, व तींच रूढविली.

"**साक्षात्कृत**धर्माणः **ऋषयः** बभूवुः। ते अवरेभ्यः असाक्षात्कृतधर्मभ्यः उपदेशेन मंत्रान् **संप्रादुः**। उपदेशाय ग्लायन्तः अवरे बिल्मग्रहणाय इमं ग्रंथं समाम्नासिषुः।" (निरुक्त १-२०) यांतील '**धर्मा**'ला उद्देशून '**ऋषिसंप्रदायो** धर्मः' असें पतंजलि आपल्या महाभाष्यांत म्हणतो.

'पूषन् एकर्षे' यांतील 'ऋषि'चें 'निरीक्षण करणारा' असें भाषांतर करून विनोबांनीं 'ऋषिर्दर्शनात्' या परंपरागत व्युत्पत्तीवर मान्यतेचा शिक्का ठोकला आहे. परंतु प्रारंभीं दिलेलें तै. आ. व पाणिनि यांचेंच मत ग्राह्य मानावें असें मला वाटतें. 'ऋष्' या धातूचा इंग्रजी 'रश्' या धातूशीं संबंध मॅक्डोनल्डनें आपल्या वैदिक व्याकरणांत दाखवून दिला आहे, तोहि विचारणीय आहे. या 'रश्' धातूचे 'री' आणि 'फुस्' असे आणखी दोन तुकडे ऑक्सफर्ड इंग्रजी कोशानें पाडले आहेत. 'ऋष्' या धातूंत सुद्धां मूळ धातु 'ऋ' हा मानतां येईल. नदीच्या मुळाप्रमाणें 'ऋषी'चें कुळ यापेक्षां खोलांत शिरून न पाहिलेलें बरें.

'प्राजापत्य' याचा अर्थ प्रजापतीचा मुलगा असा होईल, 'सर्वांचें प्रजावत् पालन करणारा' असा होणार नाहीं. खुद्द 'प्रजापति' या ऋग्वेदांतील देवतेची कल्पना पुढील दोनतीन मंत्रांवरून येईल:—

(१) "**प्रजापते** न त्वदेतान्यन्यो
विश्वा जातानि परि ता बभूव।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु
वयं स्याम पतयो रयीणाम्॥"
—ऋ. १०, १२१, १०.

(२) "आ नः प्रजां जनयतु **प्रजापतिः**
आजरसाय समनक्तु अर्यमा।

अदुर्मंगलीः पतिलोकमा विश
शं नो भव द्विपदे शं चतुष्पदे ॥ ''
— ऋ. १०, ८५, ४३

( ३ ) '' दिवो धर्ता भुवनस्य **प्रजापतिः**
विशंगं द्रापिं प्रति मुञ्चते कविः ।
विचक्षुणः प्रथयन् आपृणन्
उरु अजीजनत् सविता सुम्नं उक्थ्यं ॥ ''
—– ऋ. ४, ५३, २.

( १६० ) व्या टिप्पणींत विनोबा लिहितातः—–

'' ' प्राजापत्य ' शब्द ' राज्य'–विरोधी उभा केला आहे. ईश्वरी राज्याचें स्वरूप त्यानें दर्शविलें जातें. अर्थात् तो **धर्म**वाचक शब्द आहे. तोच येथें **धर्मी**ला लावला आहे.'' पण इतकी भानगड किंवा धडपड कशाकरितां केली आहे, तें समजणें कठिण आहे. ' रिपब्लिक'ची कल्पना वेदांमध्यें आहे हें ध्वनित करण्याकरितां हा खटाटोप आहे, असें दिसतें. निरनिराळ्या राज्यपद्धतींकरितां आपणांस ' मंत्रपुष्पां'तील ' साम्राज्यं, भौज्यं, स्वाराज्यं, वैराज्यं, पारमेष्ठ्यं, राज्यं, माहाराजाधिपत्यं ' इकडे धांव घेतां येईल अगर छां. २, २४ कडे जातां येईलः—'लोकद्वारं अपावृणु पश्येम त्वा वयं ( १ ) राज्याय ( २ ) वैराज्याय ( ३ ) स्वाराज्याय ( ४ ) साम्राज्याय । '

१६६व्या टिप्पणींत ' पुरुष ' शब्दाच्या भिन्न-भिन्न व्युत्पत्तींची चर्चा करून शेवटीं '' ' पुरः ईष्टे ' म्हणजे देहावर सत्ता चालवितो, राज्य करतो म्हणून 'पुरुष' असें निर्वचन येथें सुचविलें जात आहे, अथवा सुचवावें, असें मला वाटतें '' असें विनोबा लिहितात. परंतु हें निर्वचन बरोबर आहे असें वाटत नाहीं. 'मनीषिन् ' याच्या निर्वचनाबाबत मागें जो प्रकार वर्णिला, तसाच ' पुरुष ' या शब्दाबाबतहि आढळतो. ' मन् 'पासून ज्याप्रमाणें ' मनुष ' हा शब्द, त्याचप्रमाणें ' पृ (पुर्) ' यापासून ' पुरुष ' शब्द. ( सर्व देहास ) भरणारा, भरून उरणारा तो ' पुरुष '. ( स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठत् दशांगुलं ) हें ' पुरुष '–सूक्तांतील ' पुरुष '–वर्णन चिन्त्य आहे. '**पूर्यते**' इति पुरं (शरीरं), '**पूरयति**' इति पुरुषः, अशी ' पुर ' व ' पुरुष ' या दोन शब्दांची सरळ व्युत्पत्ति दिसते. या दृष्टीनें ' तेन एष पूर्णः ' ही तै. उ. तील ( २, ५ ) व्युत्पत्ति वरच्याला जास्त जवळ येते. धातूंना ' उष ' प्रत्यय लावून झालेले किती तरी शब्द वेदांत आढळतात ! त्यांपैकीं कांहीं पुढें देतोः—( १ ) पुरुष किंवा पूरुष ( २ ) मनुष ( ३ ) अरुष (४) तरुष ( ५ ) अङ्कुष ( ६ ) नहुष. निरुक्तांत ( २, ३ ) पुढीलप्रमाणें व्युत्पत्ति दिली आहेः— पुरुषः ( १ ) पुरिषादः ( २ ) पुरिशयः ( ३ ) **पूरयतर्वा**. पूरयति अन्तः इति अन्तरपुरुषमभिप्रेत्य. तिसऱ्या व वर मला स्वतःला मान्य असलेल्या व्युत्पत्तीला आधार म्हणून यास्काचार्यांनीं श्वेताश्वतर उपनिषदांतील ( ३, ९ ) मंत्र दिला आहेः—

'' यस्मात्परं नापरमस्ति किंचिद्
यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति किंचिद् ।
वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकः
**तेन इदं पूर्णं पुरुषेण सर्वम्** ''॥

निघण्टुकारांनीं ( २, ३ ) ' मनुष्यनामां 'मध्यें इतरांबरोबर '' ( १ ) मनुष्याः... ( ९ ) नहुषः... ( २० ) **पूरवः** '' यांचें परिगणन केलें आहे, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. ' पुरः कुषन् ' या ' उणादिसूत्रा'नें पाणिनीनें ' पुरुष ' शब्दाची व्युत्पत्ति साधली आहे. ' पुर् अग्रगमने ' पुरुषः ।

१६८ वी टिप्पणी : ' सोऽहम् ' हा जप कीं अनुभव ? या प्रश्नाचें उत्तर '' मनुष्य ' साधक ' आहे का ' सिद्ध ' आहे ? '' यावर अवलंबून आहे. साधनाला इतकें महत्त्व आहे कीं ' साध्य आणि साधन ' यांत उपनिषदांत ऐक्य कल्पिलें आहेः—

'' **तपसा** ब्रह्म विजिज्ञासस्व **तपो ब्रह्मेति** ''
( तै. उ. ३, ३. )

हाच भाव ' स्थितप्रज्ञ ' प्रकरणाच्या प्रस्तावनेंत श्रीशंकराचार्यांनीं सुंदर भाषेंत व्यक्त केला आहेः–

'' सर्वत्रैव हि अध्यात्मशास्त्रे कृतार्थलक्षणानि यानि तान्येव साधनानि उपदिशन्ते यत्नसाध्यत्वात्, यानि यत्नसाध्यानि साधनानि लक्षणानि च भवन्ति तानि । ''

### मंत्र १७

' शरीरांतील तीं तीं तत्त्वें त्यांच्या त्यांच्या मूळ



अनुक्रमणिका






देवतांत लीन होवोत!' (टिप्पणी १७३ पाहा.) बृहदारण्यकांतील पुढील उतारा (३, २, १३) वरील सिद्धान्त पटवून देईल :—

"याज्ञवल्क्य इति होवाच यत्रास्य पुरुषस्य मृतस्य (१) अग्निं वागप्येति (२) वातं प्राणः (३) चक्षुरादित्यं (४) मनश्चन्द्रं (५) दिशः श्रोत्रं (६) पृथिवीं शरीरं (७) आकाशं आत्मा (८) ओषधीर्लोमानि (९) वनस्पतीन् केशाः (१०) अप्सु लोहितं च रेतश्च निधीयते क्वायं तदा पुरुषो भवति.... कर्म हैव... पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन।" हा जो 'अप्यया'चा क्रम दिला आहे, तोच क्रम 'उत्पत्ती'चा पुरुषसूक्तांत (ऋ, १०, ९०) थोड्या फरकानें दिलेला आढळून येईल :—

(ऋचा १३ व १४)

"चंद्रमाः मनसः जातः
"सूर्यः चक्षोः अजायत
"द्यौः शीर्ष्णः समवर्तत
"अन्तरिक्षं नाभ्याः आसीत्
"भूमिः पद्भ्याम्
"दिशः श्रोत्रात्
"इन्द्रश्च अग्निश्च मुखात्
"वायुः प्राणात् अजायत।"

'आनिलं' ऋग्वेदांत नाहीं. अनलहि नाहीं. 'अन्' म्हणजे श्वासोच्छ्‌वास करणें. हा धातु 'अप्' 'प्र' व 'सम्' या उपसर्गांसह अगर या उपसर्गांविना आलेला आढळतो.

'वायूशिवाय श्वासोच्छ्‌वास करणारे एकलें एक ब्रह्म होतें'—"आनीत् अवातं स्वधया तदेकं" (ऋ.१०,१२९,२). हा धातु लॅटिन 'ॲनिमा', 'अनिमस' यांत समान आढळतो.

१७५ व्या टिप्पणींत विनोबा म्हणतात:—

"संस्कृतामध्यें 'गमन', 'अशन' इत्यादि क्रिया-वाचक नामें बनवितांना जो 'अन' प्रत्यय जोडला जातो तो ह्या 'अन्' धातूचेंच रूप आहे, असें मी समजतों. अशा ह्या मूलभूत व व्यापक धातूवरून 'अनिल' शब्द चैतन्याचा वाचक बनला..." 'अन' आदि अनेक प्रत्ययांचें मूळ शोधणें हें जरा धाडसाचेंच काम आहे. 'अन' प्रत्यय लावून ज्याप्रमाणें 'क्रिया'-नामें अगर 'कर्तृ'-नामें होतात, त्याप्रमाणें व अगदीं थेट तशीच, इतर 'अना', 'अनि', 'अस्' इत्यादि. प्रत्यय लावूनहि होतात:—

(१) 'अन'–'क्रिया' वाचक : भोजन, सादन, करण, हवन, भुवन, वृजन.

'कर्तृ'वाचक : करण, मादन, संगमन, तुरण.

(२) 'अना'—जरणा, योषणा, वधना

(३) 'अनि'––'क्रिया'वाचक व 'कर्तृ'वाचक : अरणि, वर्तनि, चर्षणि, रुरुक्षणि.

(४) 'अस्'––'क्रिया'वाचक व 'कर्तृ'वाचक: अपस, रक्षस्.

(५) 'आ'––'क्रिया'वाचक : निंदा, जिगीषा, गमया, अश्वया.

(६) 'इ'–क्रिया'वाचक व 'कर्तृ'-वाचक : कृषि, आजि, चक्रि, शुचि, पाणि, आक्षि, अस्थि, दधि.

(७) 'इस्'––'क्रिया' वाचक: अर्चिस्, ज्योतिस्, आमिष्, बर्हिष्.

वरीलप्रमाणेंच 'उ, उन, उस्, ऊ, क, त, ति, तु, तृ, त्नु, त्र, थ, न, ना, नि, नु, म, मन्, मि, मी, यु, र, रि, रु, व, वन्, स, स्नु,...' इत्यादि प्रत्यय लावून 'क्रिया'-नामें व 'कर्तृ' नामें सिद्ध होतात. तात्पर्य, 'अन' प्रत्ययासंबंधींचें विनोबांचें वचन अथवा नवीनसा वाटणारा शोध भाषाशास्त्र व व्याकरणशास्त्र यांना धरून नाहीं.

१७६ व्या टिप्पणींत 'अमृतम्'चें विवेचन करतांना विनोबा लिहितात:–– "मरणरहितता हें चैतन्याचें लक्षणच आहे. सर्व मरून जें उरतें तेंच चैतन्य." चैतन्य तत्त्व 'अमृत' आहे व शरीर 'भस्मान्त' म्हणजे मर्त्य आहे याला उपोद्‌बलक अशीं वचनें छांदोग्यांतून देतां येण्यासारखीं आहेत:— 'जीवापेतं वाव किल इदं म्रियते न जीवो म्रियते' (छां. ६, ११, ३) व "मघवन् मर्त्यं वा इदं शरीरं आत्तं मृत्युना तदस्य अमृतस्य अशरीरस्य आत्मनोऽधिष्ठानम्" (छां. ८, १२, १)

१७७ वी, १७८ वी व १७९ वी-या टिप्पण्यांत 'अथेदं भस्मान्तं शरीरं' यावर सुंदर विवेचन केलें आहे. 'शरीराचें भस्म होणार' हा भाव ज्ञानदेवांनीं 'विपायें आगीं पडे। तरी भस्म होऊनि उडे॥'

असा व्यक्त केला आहे. आपण शरीराला 'भस्म' किंवा 'विभूति' लावतों त्याचा हेतु माझ्या मतें 'शरीराचें भस्म होणार' याचें सतत स्मरण ठेवण्याचा असावा. शरीर ज्याप्रमाणें मरणार, तसेंच जीर्णहि होणार याचीहि जाणीव श्रुतिमाउली आपणांस अनेक ठिकाणीं करून देते:—

"**पलिक्नी:** इत युवतयो भवन्ति"
(पलिक्नी-(पलित)- केस पांढरे झालेली)
—ऋ. ५, २, ४.

"मिनाति श्रियं **जरिमा** तनूनां"
— ऋ. १, १७९, १.

'अंगार' आणि 'भस्म' यांचा एकत्र उल्लेख छां. ५, २४, १ या ठिकाणीं आला आहे:—

"स य इदमविद्वान् अग्निहोत्रं जुहोति यथा **अंगारान्** अपोह्य **भस्मनि** जुहुयात् तादृक् तत् स्यात्।". साहचर्यानें 'भस्मा'लाच आपण 'अंगारा' म्हणतों व शरीरावर 'अंगारा' अथवा 'निखारा' ठेवण्याच्या तयारीऐवजीं आपण 'भस्म'च लावून समाधान मानतों. 'भस्मन्' शब्दांत 'भस्' धातु आहे. 'भस्' (खाणें) यावरून 'भस्मन्' (१) अग्नीनें आपल्या दांतांनीं खाणें म्ह. जाळून टाकणें व (२) वाऱ्यानें खाऊन टाकणें म्हणजे उडवून लावणें असे दोन अर्थ ऋग्वेदांत आढळून येतात:—

"अग्निर्ह नाम धायि दन् अपस्तमः
सं यो वना युवते **भस्मना** दता।"
(१०, ११५, २)

"क्रीळन् नः रश्मे आ भुवः ॥
सं **भस्मना** वायुना वेविदानः।
(५, १९, ५)

१८३ वी टिप्पणी: "संकल्परहित भाव तीच साधना" हेंच गीताहि पदोपदीं सांगत आहे. 'यस्य सर्वे समारम्भाः काम**संकल्प**वर्जिताः" (४,१९), 'न ह्यसंन्यस्त**संकल्पो** योगी भवति कश्चन' (गी. ६, २), 'सर्व संकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते' (गी., ६, ४) व 'संकल्पप्रभवान् कामान् त्यक्त्वा सर्वानशेषतः' (गी., ६,२४).

१८९ वी टिप्पणी: 'क्रतो स्मर कृतं स्मर' या चरणाची द्विरुक्ति ईश्वरस्मरणाचें अन्तकाळीं अगत्य दर्शविण्यासाठीं आहे. हें कारण सबळ म्हणून मानावें, पाहिजे तर; परंतु खरें कारण २१३ व्या टिप्पणींत दिलें आहे. ही द्विरुक्ति उपनिषत्समाप्तिदर्शकच आहे. पुढील प्रार्थनेचा मंत्र हा मागाहून जोडलेला स्पष्ट दिसतो व तो ऋग्वेदांतून (१,१८९,१) जसाचा तसा घेतला आहे.

## मंत्र १८

'रयि' (पुल्लिंगी) हा शब्द 'रा=देणें' या धातूपासून बनलेला आहे. हा इतर भाषांतूनहि आढळतो. जर्मन '**रिश्शुम्**,' इंग्रजी '**रिच्**'- व लॅटिन '**रेस्**' यांचा मूळ अर्थ 'संपत्ति' 'मालमत्ता' इत्यादि आहे. अग्नीला ऋग्वेदांत 'रयिपतिः रयीणां' असें म्हटलें आहे. 'रयी'ची कल्पना साधारणतः त्या शब्दाला लावलेल्या पुढील विशेषणांवरून येण्यासारखी आहे:— "अश्वावत्, गोमत्, दमूनस्, दिव्य, द्युमत्, पार्थिव, पुत्रिन्, प्रजावत्, यशस्, वसुमत्, वीरवत्, शतिन्,सभावत्, सुक्षत्र, सुपेशस्"...'रयी'पासून निघालेलीं कांहीं नामें पुढें दिलीं आहेत:—

"रायिदा,रयिंतम, रयिवत, रयिविद्, रयिवृध्, रयिस्थान" इ. "आमच्या कुणबाऊ मराठींतील 'लई' (म्हणजे पुष्कळ, फार) ह्या शब्दाला वैदिक 'रयी'चा आधार आहे" ही 'लई'ची व्युत्पत्ति चिन्त्य आहे. 'रयि' व 'लई' या दोन टोंकांमधले दुवे दाखविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कुलकर्णी यांनीं आपल्या कोशांत 'अपभ्रंश- लई- अतिशय इत्यर्थे लोकोक्तौ (हेमचंद्र)' येवढाच उल्लेख केला आहे, हेमचंद्राच्यामागें जाण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. "**रेवा** म्हणचे **नर्म**दा आनंद देणारी आनंदमयी". 'रेवा तु नर्मदा' असें अमरकोश म्हणतो. क्षीरस्वामीनें 'रेवृ प्लवगतौ' अशी व्युत्पत्ति दिली आहे, तीच विनोबांच्या व्युत्पत्तीपेक्षां अधिक ग्राह्य वाटते. 'रि=वाहणें, वाहविणें' या ऋग्वेदांतील धातूचा त्याला आधार आहे. उ:० — "यो हत्वाऽहिं **अरि**णात् सप्त सिन्धून्" (ऋ. २, १२,३). तात्पर्य, 'रयि, शब्दाचा मूळ अर्थ धन असला तरी 'आध्यात्मिक संपत्ति' असाहि व्यापक अर्थ करतां येईल, हा भाव विनोबांनीं १९९व्या








टिप्पणींत फारच जोरदार व समर्पक रीतीनें व्यक्त केला आहे.

" ' रै ' शब्द जणूं धनविरोधी म्हणून उभा केला आहे. जीवनाचें साध्य रै आहे, धन नव्हे, असें सुचवावयाचें आहे. योग्य मार्गानें संपादिल्यास धनहि आनंदाचें एक साधन होऊं शकेल. पण अकर्मण्यतेनें आणि लुटारू वृत्तीनें धन संपादणें म्हणजे सामाजिक आणि आध्यात्मिक आनंदाचा पायाच उखडून टाकणें होय. असलें धन म्हणजे धन नव्हे, तें निधन आहे. " तुकारामाचा ' जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करी ' हा अभंग, गांधींची ' विश्वस्त (ट्रस्टी)–कल्पना, अरविंदांनीं आपल्या ' माताजी ' या पुस्तकांत व्यक्त केलेली ' चांगल्या माणसांनीं सार्वजनिक कल्याणाकरितां धनशक्तीचा वापर करावा ही मतप्रणाली ' या सर्वांचा निष्कर्ष वरीलप्रमाणेंच आहे.

२०२व्या टिप्पणींत विनोबा लिहितातः— " ' अस्मान् ' ही सामुदायिक प्रार्थना आहे. मागल्या दोन मंत्रांतील एकवचनी प्रयोग येथें एकदम बहुवचनांत पालटतो, तो ध्यान खेंचून घेणारा आहे....... ' एकमेकां साह्य करूं । अवघें धरूं सुपंथ ' असा हा सामुदायिक साधनेचा सुपंथ आहे. " यांत ध्यान खेंचून घेण्यासारखें कांहीं आहे, असें मला वाटत नाहीं. कारण हा अठरावा मंत्र ऋग्वेदांतून जशाचा तसा उचलून मागील प्रकरणाला ठिगळासारखा जोडला आहे. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांतील १८९ व्या सूक्तांतील हा पहिला मंत्र आहे. या सूक्तांत पुढें सर्वत्र बहुवचनीच प्रयोग आहे:—

(२) " अग्ने त्वं पारय नव्यः **अस्मान्** "
(३) " अग्ने त्वं **अस्मत्** युयोधि अमीवाः "
(४) " पाहि **नः** अग्ने पायुभिरजस्रैः "
(५) " मा **नः** अग्ने अवसृजः अघाय "
(८) " **अवोचाम** निवचनानि अस्मिन्
मानस्य सूनुः सहसाने अग्नौ ।
**वयं** सहस्रं ऋषिभिः सनेम
**विद्याम** इषं वृजनं जीरदानुम् ॥

२०५ व्या टिप्पणींत ' युयोधि अस्मत् जुहुराणं एनः ' यांतील ' युयोधि ' पदाचा विचार केला आहे. " ' यु ' म्हणजे दूर करणें, ह्या धातूचें हें रूप मानलें जातें. पण ' युध् ' म्हणजे लढणें ह्या धातूचेंहि असें रूप होण्याला वैदिक व्याकरणाची अडचण राहणार नाहीं. म्हणून दोन्ही अर्थ एकत्रित करून ' पिटाळून लावणें ' असा ह्याचा अर्थ करणें योग्य आहे. साधकानें पापाशीं निरंतर ईश्वरस्मरणपूर्वक लढत राहिलें पाहिजे हें ह्या प्रार्थनेचें तात्पर्य आहे. ' तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च । ' —गी., ८,७.

' रात्रिदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग,
अंतर्बाह्य जग आणि मन ॥—तुकाराम "

हें सर्व विवेचन व्याकरणदृष्ट्या साफ चुकीचें आहे. तात्पर्यार्थाबद्दल मतभेद नाहीं, परंतु शब्दार्थाबद्दल खास आहे. ऋग्वेदांत ' युध् ' धातूचीं ' द्वित्व ' झालेलीं फक्त पुढील रूपें आहेत :— " युयोध, युयुधुः, युयुधाते, यवीयुध्, अयुयुत्सन्, युयुत्सन् " यांत ' युयोधि ' असें रूप कोठेंच नाहीं. म्हणून ' युयोधि ' हें ' यु ' धातूचेंच (पृथक् कृ) रूप मानलें पाहिजे; त्याशिवाय गत्यंतर नाहीं.

ऋग्वेदांतील वरील ऋचेशिवाय पुढील तीन ऋचांत ' युयोधि ' हें रूप आलें आहे—

(१) " स बोधि सूरिर्मघवा
वसुपते वसुदावन्
**युयोधि** अस्मद् द्वेषांसि ॥ "
(२, ६, ४.)

(२) " स त्वमस्मदप द्विषो
**युयोधि** जातवेदः
अदेवीरग्ने अरातीः ॥ "
(८, ११, ३.)

(३) " अग्ने त्वं अस्मत् **युयोधि** अमीवाः "
(१, १८९, ३.)

## मूळपाठ

शेवटीं ' मूळपाठां 'तील कांहीं लेखनप्रमाद दाखवून व कांहीं सुधारणा सूचवून हें कल्पनेबाहेर लांबलेलें परीक्षण पुरें करतों:—

मं. १ (१) " ईशा वास्यं " (पाठभेद)
(२) " भुञ्जीथा " (विसर्ग नको)
मं. २ (३) " लोका " ( ,, )

मं. ४ (४) "जवीयो" ("जवीयः" ऐवजीं)

मं. ६ (५) "आत्मन्नेव" (पा. भे.)

मं. ६ (६) "वि चिकित्सति" ( ,, )

मं. ७ (७) "शोक" (विसर्ग नको)

मं. ८ (८) "याथातथ्यतः" हें पद मागें सुचविल्याप्रमाणें गाळूनच टाकावें; ठेवावयाचें असल्यास (कंसांत घालून) 'याथातथ्यतो' असें लिहावें.

मं. ९ व १२ (९) "तमो" ('तमः' ऐवजीं)

मं. १३ (१०) "संभवाद्" ('संभवात्' ऐवजीं)

मं. १६ (११) "एकर्षे" ('एक-ऋषे' ऐवजीं पदें पाडून वाचन करण्याचें कारण नाहीं.)

(१२) 'तत् ते पश्यामि' 'याथातथ्यतो' प्रमाणें गाळूनच टाकावें; ठेवावयाचेंच असल्यास कंसांत घालावें.

* * *

प्रारंभीं सुचविल्याप्रमाणें केवळ दोषदर्शन किंवा पांडित्यप्रदर्शन हा या लेखामागील हेतु नसून कोणत्याहि पुस्तकाचें कसून परीक्षण व्हावें व त्या ग्रंथाच्या अध्ययनास मदत व्हावी, हाच हेतु आहे. शेवटीं पुनः एकदां विनोबांना धन्यवाद देऊन व उपनिषदांवरील वाङ्मयांत त्यांनीं अशीच भर टाकावी अशी विनंति करून लेखणी आंवरती घेतों.

---

## मद्रास प्रांतांत संपूर्ण मद्यपानबंदी

२ ऑक्टोबर १९४८ हा दिवस मद्रास प्रांतांत एक अत्यंत संस्मरणीय दिवस म्हणून गणला जाईल. त्या दिवसापर्यंत मद्रासमधील एकंदर २४ जिल्ह्यांपैकीं १६ जिल्ह्यांतून कायद्यानें मद्यपानबंदी होती. ऑक्टोबर २पासून राहिलेल्या आठहि जिल्ह्यांतून कायद्यानें दारूबंदी झाली असून सबंध मद्रास प्रांत कायद्यानें निवृत्तमद्य झाला आहे. या दारूबंदीमुळें मद्रास प्रांताचें १७ कोटी रुपयांचें उत्पन्न कमी झालें असून त्यामुळें व इतर कारणांमुळें येणारी तूट सरकार विक्रीकर व करमणुकीचा कर यांत वाढ करून भरून काढणार आहे. दारूबंदीमुळें येणारी तूट भरून काढावयास मध्यवर्ती सरकार कांहींहि आर्थिक मदत करूं शकणार नाहीं असें जाहीर झालें आहे. मद्रासच्या पांच कोट लोकसंख्येपैकीं शेंकडा १० ते १२ लोकांना दारू पिण्याची संवय असावी. कायद्यानें झालेल्या मद्यपानबंदीमुळें दारूबाज लोक 'भूमिगत' गुप्त साधनांचा अवलंब करून बेकायदा दारू काढून गुत्ते चालविण्याचा संभव आहे. ते शोधून काढून कायद्याची अंमल-बजावणी करण्याकरतां अधिक पोलिसी बंदोबस्त व त्याकरतां अधिक खर्चहि करावा लागेल. सोळा जिल्ह्यां-तून मद्यपानबंदी सुरू असतांना बेकायदा दारू काढण्याचीं दरमहा सरासरी ५००० व चोरून दारू पिण्याचीं दरमहा सरासरी १०० अशीं प्रकरणें उघडकीस आलीं आहेत. यावरून मद्यपानबंदी खऱ्या अर्थी यशस्वी व्हावयास लोकमत अधिक जागृत व शहाणें होणें व त्यायोगें दारूबाजांचा हृदयपालट होणें जरूर आहे हें उघड आहे.–दारूबंदीच्या कायद्याबरोबर मद्रास सरकारनें दूधदुभतें, गूळ–कारखाने व इतर विधायक घरगुती धंदे यांसारखे कार्यक्रम जनतेपुढें ठेवले आहेत. दारूवर होणारा पैशाचा अपव्यय वांचला असून लोकांनीं सुमारें ७० कोट रुपयांची बचत केली असल्याचें बचत–योजनां (Savings Schemes)–वरून दिसून आलें आहे. या मद्यपानबंदीबद्दल सरकारला विशेष कोणाकडून दुवा मिळाला असेल तर खेड्यांपाड्यांतून, तेथील घर-धनिणींकडून. घरधन्यांना आणि जवानांना आतां दारू बंद झाल्यामुळें खेड्यांतील कुटुंबांतून अधिकाधिक गृहसौख्य व समाधान नांदतांना दिसून येत आहेत.



अनुक्रमणिका






श्री. वा. मु. लिमये

# वसाहतीचें स्वराज्यच पत्करावें काय ?

"May I say a word about that goal of Dominion Status as it has commonly been described, or as I prefer to describe it, a free and equal partnership in the British Commonwealth? It is not, as is so often implied, when Dominion Status is contrasted with full independence, an inferior or dependent Status. The status in the Commonwealth of the Dominions—or of this country for that matter,—for our Status is the same, though not perhaps our stature—is, indeed, superior to that of nations that perforce stand alone "—L. S. Amery, 14th Aug 40.

"We hope that the new independent India may choose to be a member of the British Commonwealth. We hope, in any event, that you will remain in close and friendly association with our people. But these are matters for your own free choice."—Paragraph 24 of Cabinet Mission's Proposals.

## तेव्हां आणि आतां

लाहोरच्या सुविख्यात अधिवेशनांत राष्ट्रसभेनें आपलें ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य ( Complete Independence ) असल्याचें जाहीर केलें. हप्त्याहप्त्यानें हिंदुस्थानला स्वयंशासनाचे अधिकार बहाल करावयाचे असें आपलें धोरण ब्रिटिश सरकारनें १९१९ च्या घटनाकायद्याच्या प्रास्ताविक उद्देशकथना (Preamble) मध्यें नमूद केलें होतें. १९३५ च्या घटनाकायद्यांत हा भाग गाळला होता. ८ ऑगस्ट १९४० ला लॉर्ड लिन्लिथगो यांनीं जें महत्त्वपूर्ण निवेदन केलें त्यांत वेस्टमिन्स्टरच्या प्रकारचें वसाहतीचें स्वराज्य हिंदुस्थानला मिळेल असें म्हटलें होतें. वर उद्धृत केलेले ॲमेरींचे उद्गार त्या निवेदनास अनुलक्षून आहेत व वसाहतराज्याच्या वैशिष्ट्याचा त्यांत उल्लेख आलेला आहे. ॲमेरींचे वरील उद्गार उद्धृत करून डॉ. पट्टाभि सीतारामय्यांनीं आपल्या Sixty years of Congress या पुस्तिकेंत वसाहतीचा दर्जा हिंदुस्थानवर लादला जाणार असल्यानें ॲमेरींच्या उद्गारांतील आशयांत कांहीं तथ्य नाहीं असें सार्थपणें म्हटलें आहे. आतां मात्र परिस्थिति पालटली आहे. त्रिमंत्रि-योजनेचा २४ वा परिच्छेद आतां अशी परिस्थिति राहिलेली नाहीं हें दर्शविण्यासाठीं दिला आहे. त्रिमंत्रि योजना सोडून देणें भाग पडलें असलें, तरी वसाहतींत राहावें कीं वसाहत सोडून जावें हें ठरविण्याचा आपला अधिकार अबाधित राहिला आहे व Indian Independence Act चा अंमल सुरू झाल्यावर सत्तासंक्रमणाचा तह ब्रिटिशांशीं करण्याची कांहीं आवश्यकता उरलेली नाहीं. त्यामुळें आपणांला मिळणाऱ्या स्वातंत्र्यावर तहामध्यें घातल्या जाणाऱ्या शर्तीमुळें आक्रमण होऊन प्रत्यक्षांत आपली अवस्था ईजिप्तप्रमाणें होईल अशी जी भीति उद्भवली होती ती आतां राहिलेली नाहीं. अर्थात् आपण स्वातंत्र्य पुकारून ब्रिटनशीं तह करण्याचें ठरविलें तर त्या तहाचें स्वरूप आपल्याला मोठें फायदेशीर असें राहील असें समजणें मात्र चुकीचें आहे. फाळणीमुळें नैसर्गिक अशा संरक्षक सरहद्दींना आपण मुकलों व अफाट दर्याला साजेल असें आरमारहि आपल्याजवळ नाहीं. हिंदी आरमाराचा विकास झालेला नसल्याचें कारण म्हणजे ज्या राष्ट्राचें आप-

णांवर वर्चस्व होतें तें राष्ट्र ' समुद्रस्वामिनी ' असें मानलें जात होतें. आतां आपण संरक्षणाच्या दृष्टीनें पेंचांत सांपडलेले आहोंत; उत्पादनोपयोगी वस्तूंची ( Capital goodsची ) आपणांजवळ मोठी वाण आहे व आपली गंगाजळी ब्रिटिशांच्या हातांत आहे. ह्या गोष्टी विचारांत घेतल्या कीं, स्वतंत्र झाल्यावर कायद्याच्या दृष्टीनें आपली अवस्था कोणत्याहि रीतीची असली, तरी दुबळा पक्ष अशी आपली अवस्था असल्यानें ब्रिटनशीं करावयाच्या तहांत आपणांला कमावण्यापेक्षां गमावण्याचीच पाळी येण्याचा संभव आहे.

### वसाहतींना स्वतंत्र राज्यांचा दर्जा

ब्रिटन आपणांवर वसाहतीचें स्वराज्य लादूं पाहत होतें तेव्हांची गोष्ट निराळी होती व आतांची गोष्ट निराळी आहे. वसाहतींत राहणें न राहणें हा आपल्या खुषीचा प्रश्न आहे. घटनाशास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें तर आज आपणांस जो वसाहतीचा दर्जा प्राप्त झाला आहे, त्या दर्जाचीं अशीं कांहीं वैशिष्ट्यें आहेत. वसाहतींचा फुटून निघण्याचा अधिकार हा इतर ठिकाणीं (पाकिस्तान सोडून) वादविषय बनलेला आहे. आपणांला तो अधिकार मिळालेला आहे. कॅनडाची राज्यघटना ब्रिटिश पार्लमेंटच्या कायद्या-वांचून बदलली जाणार नाहीं व ऑस्ट्रेलियाला आपल्या घटनेच्या पहिल्या आठ कलमांत ब्रिटिश पार्लमेंटच्या अनुमतीवांचून फरक करतां येतील किंवा नाहीं याविषयीं घटनापंडितांत तीव्र मतभेद आहेत. आपली राज्यघटना बनविण्याचे व बदल-ण्याचे आपणाला संपूर्ण अधिकार आहेत. तेव्हां वसाहत म्हणूनहि आपलें स्वातंत्र्य या देशांपेक्षां अधिक आहे व वेस्टमिन्स्टरच्या स्वराज्याहून श्रेष्ठ आहे.

पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं आपल्या आत्म-चरित्रांत वसाहतीचें स्वराज्य व स्वातंत्र्य यांमधील फरक नवी राज्यव्यवहारपद्धति (New administra-tion) व नवी शासनसंस्था (New state) अशा शब्दांत वर्णन केला आहे. त्या वेळच्या व आजच्या परिस्थितींत फेर आहे. वसाहतींना आज स्वतंत्र राज्यांचा दर्जा (statehood) प्राप्त झाला आहे असें राज्यनीतिविशारद मानतात. स्वतंत्र रीत्या करार-मदार करण्याचे अधिकार त्यांना असल्यामुळें आज त्यांना आंतरराष्ट्रीय व्यक्तिमत्त्व प्राप्त झालें आहे. ब्रिटिश वसाहतींचे मिळून एक असें Composite state ही कल्पना आज कोणीच पुरस्कारीत नाहीं.

### वसाहतीची लवचिक (Flexible) कल्पना

हिंदुस्थान हें एक प्रजासत्ताक राष्ट्र होणार अस-ल्यानें वसाहतीचा दर्जा पत्करणें विसंगत ठरणार नाहीं काय ? हा नेहमींच विचारला जाणारा प्रश्न आहे. कारण वसाहती या राजमुकुटावरील निष्ठेनें जोडल्या गेलेल्या (united by a common alle-giance to the Crown) अशा आहेत. सदर प्रश्ना-विषयीं घटनाशास्त्रदृष्ट्या एक महत्त्वाचा असा मुद्दा प्रस्तुत लेखकानें The Times of India मध्यें State vs Republic नांवाच्या पत्रांत उपस्थित केला होता. तें पत्र पहिलें (Leading letter) छापलेलें असल्यानें पुष्कळांच्या पाहण्यांत आलें असेल. आजचीं कांहीं देशी संस्थानें व संस्थानसंघराज्यें भार-तीय संघराज्याचीं घटक म्हणून राहणार आहेत; अशा रीतीनें भारतीय संघराज्याच्या कांहीं घटकांचे प्रमुख म्हणून राजे व राजप्रमुख शिल्लक राहणार आहेत. यांचें अस्तित्व जर संघराज्याच्या प्रजासत्ताक स्वरूपाला विसंगत असें मानलें जात नाहीं, तर राज-मुकुटाच्या अस्तित्वानें तरी या स्वरूपाला बाध कां यावा ? वसाहतीची कल्पना लवचिक (flexible) असल्यानें प्रजासत्ताक राष्ट्रहि वसाहतींच्या संघां-(Br. Commonwealth of Nations)-मध्यें पचून जाणें शक्य आहे. श्री. गोपाळस्वामी अय्यंगार यांनीं आपल्या एका भाषणांत A. B. Keith यांचें एक वाक्य सांगितलें होतें. त्याचा आशय असा होता कीं, ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें जर प्रजासत्ताक राष्ट्र पचूं शकणार नसेल तर कॉमनवेल्थ टिकणार नाहीं. आयर्लंडच्या पावलावर पाऊल आपण आपल्या नव्या राज्यघटनेंत टाकलेंच आहे. गव्हर्नर-जनरल आपल्या नव्या राज्यघटनेंत नाहीं व राजनिष्ठेची शपथ पण नाहीं. आयर्लंडप्रमाणेंच आपण राजमुकु-टाशीं नाममात्र संबंध (nominal link with the Crown) ठेवण्यास काय हरकत आहे ? व्यक्ति म्हणून राजाचा वसाहतींशीं संबंध तो काय येणार ? खरें म्हणजे राजाचें महत्त्व संस्था म्हणूनच आहे.



अनुक्रमणिका

इंग्लंडचा आणि वसाहतींचा राजा एकच असला तरी त्याला बहुव्यक्तिमत्त्व ( Plural Personality ) असल्यानें हिंदुस्थानाविषयीं त्याचा दर्जा हिंदुस्थानचा राजा ( The Crown of India ) असा राहील. असें असल्यामुळें स्वतंत्र राष्ट्र म्हणून आपल्या दर्जास बाध येत नाहीं.

### वसाहतीलाहि स्वतंत्र धोरण आंखतां येईल

वसाहतींचें स्वराज्य पत्करल्यास आपण अँग्लो-अमेरिकन गटाच्या आहारीं जाऊं व मग जागतिक युद्धांत आपण तटस्थ राहूं शकणार नाहीं असें म्हटलें जातें. आज आपला दर्जा वसाहतीचा असला तरी यूनोंत आपण स्वतंत्र धोरण आंखीत आहोंच कीं नाहीं ? इंग्लंड युद्धांत पडलें कीं, वसाहती कांहीं आपोआप (ipso facto) युध्यमान राष्ट्रें ( belligerent nations ) होत नाहींत. वसाहतींना स्वतंत्र-रीत्या युद्ध पुकारावें लागतें. आयर्लंड गेल्या युद्धांत तटस्थ होतें. आपण वाटल्यास तटस्थ राहूं शकतों. 'अणुगोल' व 'कॉस्मिक रेज'नीं खेळल्या जावयाच्या युद्धांत कुणाला तटस्थता राखतां येईल, याचा विचार करतां दोन उत्तरें सुचतात. एक तर हीं अस्त्रें ज्याजवळ आहेत तें राष्ट्र व दुसरें म्हणजे अशीं शस्त्रास्त्रें नसलेलें व प्रत्यक्ष रणक्षेत्रापासून या अस्त्रांचा उपद्रव होणार नाहीं इतक्या दूर अंतरावर असलेलें. तटस्थता ही नुसती मर्जीची गोष्ट नाहीं याचें विस्मरण होऊं देतां कामा नये.

दक्षिण आफ्रिका व ऑस्ट्रेलिया या वसाहती आहेत व त्या वर्णभेदाचें राजकारण करतात, तेव्हां वसाहतींत राहण्यांत काय स्वारस्य, हा एक लोकप्रिय आक्षेप आहे. परंतु वसाहतींत राहूनहि आपण ' शठं प्रति शाठ्यं 'चें धोरण ठेवूं शकतों. १९३५च्या कायद्यांत सुद्धां 'शठं प्रति शाठ्यं'–( Reciprocity )-ची तरतूद आहे. आपणांस जेव्हां वसाहतीचा दर्जा मिळून आंतरराष्ट्रीय दर्जा मिळाला नव्हता तेव्हां वरील तरतूद 'मोठा विनोद' ( a huge joke ) या नांवानें उपहासाविषय बनविणें रास्त झालें असतें. आज मात्र आपल्या नव्या राज्यघटनेंत अशी तरतूद करतां येणें शक्य आहे व ती उपयोजितां येणें पण शक्य आहे.

आज आपण, राजनिष्ठेची शपथ गाळणें, गव्हर्नर–जनरलची जागा रद्द करणें या गोष्टींबरोबर परराष्ट्रांतील आपल्या वकिलांच्या विश्वासपत्रां-(Credentials)वर संघराज्याच्या अध्यक्षाचीच सही असावी असें ठरवावें. प्रस्तुत लेखकानें The Sunday News of India मध्यें " Our Draft constitutions: Additions, Alterations and Modifications, नांवाचा एक लेख लिहून आपल्या घटनेच्या ४१ व्या कलमाला चीनच्या राज्यघटनेचें ३६ वें कलम जोडून खालीलप्रमाणें तरतूद करावी असें सुचविलें होतें. "There shall be a President of India. The President, being the head of the State shall represent the Indian Union in foreign relations." 'शठं प्रति शाठ्यं'ची तरतूद पण करावी. वाटल्यास प्रजासत्ताक ( Republic ) हा शब्द सुद्धां गाळावा. परंतु वसाहतसंघ सोडून इंग्लंडशीं तह करूं नये. We, the People of India (आम्ही हिंदुस्थानचे प्रजाजन ) हे आपल्या घटनेच्या उद्देशकथनांतील शब्द जनतेचा सार्वभौम दर्जा सुचवितातच. वाटल्यास सार्वभौम असल्याचें एकादें कलम घटनेंत घालावें.

### दहा वर्षें ब्रिटनशीं संबंध तोडूं नयेत

समजा, आजच्या सरकारनें वसाहतीचा दर्जाच पत्करला तर निवडणुकींत प्रतिपक्ष त्यांच्यावर हल्ला करतील व आजच्या सरकारला धूळ चारतील. तेव्हां काय करावें, हा प्रश्न पण विचारांत घ्यावयास हवा. प्रथमतः असें म्हणणें भाग आहे कीं निवडणूक जिंकण्यापेक्षां राष्ट्रहिताची दृष्टि बाळगणें हेंच जास्त श्रेयस्कर आहे. आणि घटनात्मक तरतूद करून १० वर्षेंपर्यंत ब्रिटनशीं असलेले घटनात्मक संबंध तोडतां येणार नाहींत व ही मुदत संपल्यावर आपोआप ते तुटतील असें कलम घटनेंत घालतां येणार आहेच. अमेरिकन राज्यघटनेंत १८०८ सालपर्यंत पहिल्या आर्टिकलच्या ९ व्या कलमाच्या पहिल्या व चवथ्या वाक्यभागा–( clause )मध्यें, कोणताहि फरक करतां येणार नाहीं अशी एक तरतूद होती हें मी वाचकांच्या नजरेस आणूं इच्छितों. तेव्हां सर्व दृष्टींनीं विचार करतां पुढीलप्रमाणें एक कलम करून व तें घटनेंत घालून ब्रिटनशीं असलेले संबंध तोडूं नयेत असें मला वाटतें.

[ पान २०८ पहा ]










# स्वप्नांनो! स्वप्नांनो!

जाति : भृङ्गावर्तनी

स्वप्नांनो ! स्वप्नांनो !
केव्हांची तुमच्यास्तव
हृदयाची वेस खुली-

सोंसाटत वाऱ्यापरि
गर्जत कधिं जलदांसम
लाजत-मुरकत अथवा
नवतीच्या कलिकांपरि
अन्तरिं निःशङ्क रिघा !
-तडितेहुन उज्ज्वल अन्
कोमल सखि-वचनापरि
घुमवा हो चिर-सुन्दर
तुमचे ललकार तिथें !
स्तम्भावर स्फटिकांच्या
पसरा छत नीलांचें !
नजरेच्या किमयेनें
काञ्चनमय भूवरती
रेखा मधु रङ्गावलि
अनुपम लावण्याच्या !
ओता अवघें वैभव
दावा निज चतुराई-
आणि रचा हृदयीं मम
अद्भुत नव मयनगरी
-मधुर सुवासिक तुमचे
दरवळतां श्वास तिथें
निश्वसुं द्या ओशाळुन
उद्धत पुष्पाकांना !

-विसरुनिया 'मी-पण' मग
होइन मी अन्तर्मुख
विहरत अन् राहिन त्या
मय-नगरीमाधिं सन्तत-
पाहुनि तेथिल वैभव
होइल मज सुख अभिनव
श्री अनुपम तेथिल अन्
निवविल माझे डोळे !

स्वप्नांनो ! सखयांनो !
लाभेलच आणि तिथें
मजलागीं तुमची नित
प्रेमळ सुखकर सोबत-
राहिल कां कांहीं मग-
हर्षाला अन्तपार ?
होतिल दृढबंध खुले
स्फुरतिल जय-मंत्र नवे
गातिल निःशङ्क गळे
ऐलतिरीं-पैलतिरीं
खालीं-वर, चौबाजुंस
स्थूलांतुन, सूक्ष्मांतुन
सुन्दरता, प्रेमळता,
अभिनवता, सुखमयता,
विक्रम, वैभव यांचे
पिकतिल निमिषांत मळे !

जगतांतिल सुज्ञ परी
म्हणतिल मज उपहांसुन
"हा वेडा ! स्वप्नाळू !"
आणिक व्यवहाराचे
पाठहि बघातिल द्याया.
काय परी सखयांनो !

मजला त्यांचा केवा ?
त्यांचा तो सूज्ञपणा
होवो लखलाभ तयां !
त्यांचे ते व्यवहारहि
देवो त्यां सुख सन्तत !
प्रियतर त्याहुन शतदां
मज माझी मयनगरी.

—या तर या स्वप्नांनो !
रम्य रचा हृदयीं मम
अद्भुत नव मयनगरी.
या, या प्रिय सखयांनो,
केव्हांचि तुमच्यास्तव
हृदयाची वेस खुली !

—कृष्ण बलवन्त निकुम्ब

---

## वसाहतीचें स्वराज्यच पत्करावें काय ?

( पान २०६ वरून पुढें चालू )

खालीं दिलेलें कलम लेखकानें आपल्या Additions, Alterations and Modifications या लेखांत मुद्दाम तयार करून घातलें होतें—

" Notwithstanding anything contained in this constitution, it will not be competent for the federal legislatures to pass a Bill amending India's position vis-a-vis the British Commonwealth of Nations until a period of ten years bas elapsed since the promulgation of this constitution, and after the termination of the said period India shall cease to be a member of the British Commonwealth, and the continuance of this status after the expiration of this period shall be treated as if it is constitutional amendment and will have to satisfy all the formalities mentioned in article 304 of this constitution. India's continuation of the membership of the British Commonwealth of Nations does not abridge or curtail India's right to adopt the most stringent measures of reciprocity known to International Law in dealing with the sister states of the Commonwealth."

---

डॉ. माधव सदाशिव केळकर

# आरोग्यशास्त्राचीं मूलतत्त्वें

आधुनिक शास्त्रीय शोधांच्या पूर्वी शरीरांतील घडामोडींची नीट कल्पना नसल्यामुळें, मिताहार व व्यायामानें शक्य तितकी प्रकृति संभाळावी इतकीच आरोग्यशास्त्राची मर्यादा असून, कांहीं रोग झाला म्हणजे तो बरा करण्यासाठीं मुख्यतः औषधांवर भर असे. शरीरशास्त्राच्या अज्ञानामुळें रोगांचीं कारणें व स्वरूप यांचीहि नीट कल्पना नव्हती; यामुळें पुष्कळ रोगांवर औषधानीं गुण न येऊन अनेक रोग असाध्य समजले गेले. पण आधुनिक शोधांमुळें शरीरांतील सर्व इंद्रियांच्या कार्यासंबंधीं बरीच माहिती झाल्यामुळें, तिच्या आधारें आरोग्यरक्षण बरेंच सोपें झालें आहे; आणि अन्न, पाणी व व्यायाम यांत होणाऱ्या चुकांमुळें अनेक इंद्रियांचें काम कमी होऊन, प्रकृति अशक्त होणें हाच सर्व रोगांचा मूळ पाया आहे हें समजल्यामुळें, या चुका सुधारल्यानें सर्व कार्यें सुरळित होऊन, प्रकृति सशक्त होते व सर्व रोग बरे होतात असेंहि अनुभवानें सिद्ध झालें आहे. तरीहि औषधें तयार करून विकणें या धंद्याची भलतीच वाढ झाल्यामुळें, खरें आरोग्यशास्त्र व त्यावर आधारलेली उपचारपद्धति यांचा प्रसार होणें अति कठिण झालें आहे. लोकांना खरें आरोग्य हवें असें ते म्हणतात, पण त्यासाठीं एक तास नियमानें व्यायाम करण्याचीहि पुष्कळांची तयारी नसते, मग साधें व थोडें अन्न खाऊन राहण्यास कोण तयार होईल! परंतु निसर्गाच्या नियमांप्रमाणें औषधांची आधुनिक वाढच त्या पद्धतीची अशास्त्रीयता दाखवून तिच्या ऱ्हासास कारण होईल व आज ना उद्यां नवीन पिढीस आरोग्यशास्त्राचें महत्त्व कळून, ते नियम रोजच्या जीवनांत पाळले जातील अशी आशा वाटते.

**शरीराच्या मुख्य गरजाः–**

(१) **प्राणवायु**—शरीरांतील प्रत्येक इंद्रिय सूक्ष्मपणें जिवंत पेशींचें बनलेलें आहे व त्यांचें जीवन व कार्य त्यांना मिळणाऱ्या प्राणवायु व अन्न यांवर अवलंबून आहे. म्हणून श्वासाच्या द्वारें शरीरांत जितका प्राणवायु जाईल त्या प्रमाणांत सर्व इंद्रियांकडून काम होतें. यामुळें कोणाचेंहि वजन वाढवितांना दीर्घश्वसनानें छातीचा घेर व हालचाल वाढवून शरीरास अधिक प्राणवायु मिळेल अशी काळजी घेतली पाहिजे व त्याबरोबर हातां-पायांना पुरेसा व्यायाम देऊन, त्यांची शक्ति वाढवली पाहिजे. जंतुशास्त्राचा एक शोध असा आहे कीं, शरीराची 'व्हायटॅलिटी' ऊर्फ जोम चांगला असला तर शरीरांत कोणत्याही जंतूंची वाढ होत नाहीं. पण हा जोम ऊर्फ प्रतिकारशक्ति कशावर अवलंबून आहे हें जंतुशास्त्रांत किंवा शरीरशास्त्रांत सांगितलें नाहीं. थोडा विचार केला तर असें दिसतें कीं ही शक्ति खऱ्या आरोग्यावर अवलंबून आहे व हें आरोग्य अन्न, पाणी व व्यायाम यांच्या योग्य प्रमाणावर अवलंबून आहे. शरीराची काम करण्याची शक्ति प्राणवायूच्या प्रमाणांत असल्यामुळें प्रतिकारशक्तीहि त्याच प्रमाणांत असते.

थंड देशांत शारीरिक हालचाल करून अंगांत उष्णता ठेवावी लागते व त्यामुळें साहजिक दीर्घ श्वसन होऊन, लहानपणापासून छातीचा घेर व हालचाल अधिक होते. हिंदुस्थानांतील उष्ण हवेमुळें लहानपणापासून शारीरिक श्रम कमी करण्याकडे कल असतो. यामुळें छातीची वाढ कमी होऊन, मुलांचें वजन व शक्ति नीट वाढत नाहीं. म्हणून हिंडत्याफिरत्या मुलांकडून दीर्घ श्वसनाचे

व्यायाम करवून, हातांपायांचे व्यायामहि पुरेसे करवून घेणें फार महत्त्वाचें आहे.

**(२) पाणीः**–शरीरांतील सर्व पेशींना प्राणवायु व अन्न मिळण्यासाठीं रक्ताभिसरण नीट झालें पाहिजे हें उघड आहे. पण हें रक्ताभिसरण कसें होतें हें साधारण माणसाच्या लक्षांत येत नाहीं. म्हणून पुढील गोष्टी ध्यानांत ठेवून, १-२ तासांच्या अंतरानें १ ते १॥ पाव पाणी प्यालें पाहिजे. हृदयांतून धमन्यांत रक्त जातें; त्यांतून तें सूक्ष्म-वाहिन्यांत जातें व दुसऱ्या वाहिन्यांतून हृदयांत परत येऊन, फुप्फुसांत जातें. तेथें रक्तांतील कार्बन-डायऑक्साइड वायु बाहेर जाऊन, प्राणवायु शोषला जातो व तें रक्त पुनः हृदयांत येऊन धमन्यांत जातें. हें रक्तवाहिन्यांतील रक्ताभिसरण झालें. पण प्रत्येक इंद्रियांतील सूक्ष्म पेशींस प्राणवायु व अन्न मिळण्यासाठीं सूक्ष्म वाहिन्यांतून रक्तांतील कांहीं पाणी बाहेर झिरपून, सर्व पेशींच्या सभोंवर फिरतें व त्या वेळीं पेशी त्यांतील प्राणवायु व अन्न घेऊन, आपलें कार्य करतात. त्यापासून जे पदार्थ होतात ते या पाण्यांत येतात व हें पाणी निराळ्या वाहिन्यांतून हृदयांत परत येतें. यास रक्तांतील पाण्याचें अभिसरण म्हणतात व प्रत्येक इंद्रियाच्या कार्याच्या दृष्टीनें हें अभिसरण महत्त्वाचें आहे हृदयाचें कार्य व श्वास चालूं राहण्यासाठीं धमन्यांतील अभिसरण चालूं राहणें अवश्य आहे. यामुळें तें चालूं राहून, रक्तांतील जितकें पाणी बाहेर जाऊं शकेल, तितकेंच पाणी सूक्ष्म वाहिन्यांतून बाहेर झिरपतें शिवाय दर श्वासास हवेच्या सुकेपणाच्या व उष्णतेच्या प्रमाणांत कांहीं पाणी हवेंत शोषलें जातें, आणि त्याच प्रमाणांत कांहीं पाणी कातडींतून हवेंत शोषलें जातें. तसेंच पेशींनीं टाकलेला कांहीं मळ व शरीरास नको असलेले क्षार मूत्रावाटें बाहेर टाकण्यासाठीं कांहीं पाणी बाहेर जातें. याप्रमाणें रोज सुमारें ३ ते ३॥ शेर पाणी शरीरांतून बाहेर जात असतें व म्हणून तितकें पाणी दिवसांतून ५–६ वेळां मिळून पिणें आरोग्यासाठीं जरूर असतें. दिवसभरांत पुरेसे शारीरिक श्रम झाले म्हणजे तहान लागून वरचेवर पाणी पिण्यांत येतें. पण लहानपणीं मुलांना १–१॥ तासांनीं पाणी दिल्याशिवाय पुरेसें पाणी पिण्याची संवय लागत नाहीं. यामुळें खाण्याच्या वेळीं लाळ न सुटून, अर्धवट चावलेलें अन्न पाण्याबरोबर किंवा पातळ कालवणाबरोबर गिळण्याची संवय लागते. म्हणून मुलांचें आरोग्य राहून, नीट वाढ होण्यासाठीं पहिल्या वर्षापासून वरचेवर थोडें पाणी पिण्याची संवय लावली पाहिजे. तसेंच प्राथमिक व दुय्यम शाळांतून सर्व मुलांना निदान ३ वेळां पाणी पिण्यास सांगितलें पाहिजे. आजपर्यंत आरोग्याकडे पूर्ण दुर्लक्ष झाल्यामुळें, पाणी कमी पडण्यामुळेंच मुलांची व मोठ्या माणसांचीहि प्रकृति अशक्त होत जाते ही महत्त्वाची गोष्ट कोणाच्या लक्षांत आली नाहीं; म्हणून प्राथमिक शाळांपासून कॉलेजांपर्यंत पाणी पिण्याची सोय नांवालाच केलेली असते. गेल्या ३०–३५ वर्षांपासून शारीर व आरोग्य-शास्त्र शाळांतून शिकविलें जातें व मुलांची शारीरिक तपासणी केली जाते. पण शरीराच्या रचनेवरून शरीराच्या गरजांचा विचार करून त्या नीट कशा भागवाव्यात याचा कोणी विचारच केला नाहीं. याच्या मुळाशीं अशी कल्पना असते कीं, खाण्याच्या बाबतींत शेंकडों वर्षांपासून पडलेली रूढि हितकारक आहे व तहान लागली म्हणजे प्रत्येकजण पाणी पितोच. अशा कल्पनांमुळेंच शारीरशास्त्राचे सर्व आधुनिक शोध पुस्तकांतच राहून, दर पिढीस मनुष्याचा ऱ्हास होत आहे. म्हणून या जुन्या कल्पना सोडून अन्न, पाणी व व्यायाम याबाबतींत लहानपणापासून योग्य संवयी लावल्या पाहिजेत.

**(३) शारीरिक श्रम**—आरोग्याच्या दृष्टीनें ही गोष्ट सर्वांत महत्त्वाची आहे. कारण शारीरिक श्रमाच्या प्रमाणांत शरीरांतील सर्व कार्यें चालतात. हात, पाय, पाठ, पोट इत्यादि भागांत असलेले स्नायू मिळून शरीरांतील बराच मोठा भाग असतो व त्यांना सशक्त ठेवण्यासाठींच इतर सर्व इंद्रियें आहेत. पुरेसे श्रम केल्यानें श्वसन अधिक होऊन, पुरेसा प्राणवायु मिळतो; तहान लागून पुरेसें पाणी पिण्यांत येतें; रक्तांत आलेलें अन्न पेशींच्या उपयोगीं पडून, नवीन अन्न शोषलें जातें; व पेशींनीं टाकलेले पदार्थ मळ-मूत्रावाटें बाहेर टाकले जातात. श्रमामुळेंच स्नायूंचे घटक वाढून, ते मोठे व सशक्त







होतात व त्याच प्रमाणांत इतर इंद्रियांची वाढ होते. म्हणून मुलांची योग्य वाढ होण्यासाठीं व मोठ्यांचें आरोग्य व शक्ति राहण्यासाठीं या गोष्टींत काळजी घेतली तरी पुरें होतें. यामुळेंच शेतकरी व कामकरी लोकांचें आरोग्य इतरांपेक्षां अधिक असतें व त्यामुळें ते दीर्घायु होतात. आधुनिक सुशिक्षित लोकांपैकीं जे थोडे लोक दीर्घायुषी झाले आहेत ते नियमित फिरण्याच्या संवयीमुळेंच झाले आहेत, व ज्यांनीं तिकडे दुर्लक्ष केलें ते अल्पायुषी झाले. म्हणून हिंडतें-फिरतें शरीर हें सूत्र लक्षांत ठेवून शक्य तितकें हातांपायांचें काम करीत असावें. म्हणजे प्रकृति बिघडण्याचा संभव कमी असतो.

आरोग्याच्या दृष्टीनें शारीरिक श्रमाचे तीन प्रकार होतातः--(१) धंद्यांतलि काम, (२) करमणुकी-साठीं मैदानी खेळ व (३) या दोहोंत न हालणाऱ्या स्नायूंस व्यायाम देण्यासाठीं घरचे व्यायाम. लहान मुलांस व विद्यार्थ्यांस पहिलें काम नसतें, म्हणून दुसऱ्या दोन्ही प्रकारच्या व्यायामांची त्यांस विशेष जरूर असते. विद्यार्थ्यांची मानसिक व बौद्धिक वाढ होण्या-साठीं शारीरिक आरोग्याची विशेष जरूर असते व त्यासाठीं शारीरिक श्रमाची गरज असते ही गोष्ट अलीकडे शिक्षणशास्त्रज्ञांच्या लक्षांत आल्यामुळें सर्व शाळांतून कवाईत करवली जाते. पण हे व्यायाम शरीरशास्त्राचा नीट विचार करून बसवले नसल्या-मुळें व त्यांचे जोडीस मुलांस पुरेसें पाणी पिण्याची संवय नसल्यामुळें सध्यां शाळांतून होणाऱ्या कवायती-मुळें मुलांचें आरोग्य व शक्ति वाढण्यास मदत होत नाहीं. म्हणून सर्व शिक्षणाधिकाऱ्यांनीं पुढील मह-त्त्वाचे व्यायाम रोजच्या कवायतींत घालून व शिवाय मुलांस इतर व्यायाम करण्यास सांगून त्यांचें आरोग्य, वजन व शक्ति योग्य प्रमाणांत आणण्याची काळजी घ्यावी.

**(४) आरोग्यासाठीं व्यायामः--** (१) दीर्घ-श्वसनः—दोन्ही हात समोर ताठ करून श्वास घेतांना हळूहळू बाजुला न्यावेत व श्वास सोडतांना समोर आणावेत. श्वास शक्य तितका अधिक घ्यावा व सोडतांना तोंडानें फुंकून शक्य तितकी हवा बाहेर सोडावी. असे ५–७ श्वास घ्यावेत. नंतर हात बाजुला खालीं सोडून श्वास घेतांना बाजूनें डोक्यावर न्यावेत व सोडतांना खालीं आणावेत. असें ५-७ श्वास घ्यावेत. (२) दोन्ही मुठी घट्ट दाबून, खांद्याजवळ आणून, दोन्ही दंडहि घट्ट दाबावेत व दीर्घ श्वसन चालू ठेवून मुठी व दंड शक्य तोंवर सारखे घट्ट दाबावेत, व स्नायू दुखूं लागले म्हणजे थोडा वेळ ढिले सोडून पुनः घट्ट दाबावेत. असें ३ ते ५ वेळां करावें. यामुळें थोड्या वेळांत हातांच्या स्नायूंस पूर्ण व्यायाम मिळून, त्यांची शक्ति वाढते. (३) गुडघे न वांकवतां, पुढें वांकून दोन्ही हातां-मध्यें डोकें ठेवून, तळहात पायाजवळ जमिनीस लावावेत. नंतर डोकें व पाठ शक्य तितकी मागें वांकवावी. असें ४–५ वेळां पुढें व मागें वांकावें. (४) डोकें व धड एकदा एका बाजूस व नंतर दुसऱ्या बाजूस वांकवावें. उजवीकडे वांकतांना डावी मूठ डाव्या काखेजवळ आणावी व काखेपासून कंबरे-पर्यंत ताण पडावा. डावीकडे वांकतांना उजवी मूठ उजव्या काखेंत आणावी व उजवीकडे ताण पडावा. (५) जमिनीवर निजून, दोन्ही पाय ताठ उचलावेत. व त्या वेळीं श्वास घ्यावा. नंतर पाय डोक्याच्या मागें जमिनीवर टेकवावेत व पुनः मागें आणून, ताठ खालीं न्यावेत व त्या वेळीं पुनः श्वास घ्यावा. हा व्यायाम शाळेंत करवणें शक्य होणार नाहीं, म्हणून घरीं करण्यास सांगावें. घरीं स्नानाचे आधीं वरील सर्व व्यायाम ५–७ मिनिटांत करून थंड पाण्यानें स्नान करण्याची सर्वांनीं संवय ठेवावी, म्हणजे आरोग्यास बरीच मदत होईल.

बाहेरील व्यायामांत पोहण्याचा व्यायाम विशेष आरोग्यकारक आहे व प्रत्येक शहरांत म्युनिसिपालि-ट्यांनीं पोहण्यासाठीं तलावांची किंवा पायऱ्याच्या विहिरींची सोय करणें लोकांच्या आरोग्याच्या दृष्टीनें फायदेशीर होईल. जेथें अशा सोयी असतील तेथें शिक्षकांनीं मुलांस पोहण्यास शिकवून, त्याची आवड लावली पाहिजे. शारीरिक श्रमाच्या आधीं व नंतर थोड्या वेळानें भरपूर पाणी प्यावें. मुलांना हातांच्या व्यायामासाठीं झोपाळ्याची सोय करून, तो व्यायाम करवावा.

**(५) अन्न—** या लहा[न्]शा लेखांत अन्नासंबंधीं विशेष चर्चा करणें शक्य नाहीं, म्हणून सूत्ररूपानें मुख्य तत्त्वांचा उल्लेख क[र]त आहें—







(१) शरीरघटकांत मुख्य द्रव्य 'प्रोटीन' असतें; रक्तांतील अन्नांतहि मुख्य भाग प्रोटीन असतो; पाचक रसांची मुख्य शक्ति प्रोटीन पचवण्याची असते. म्हणून शरीराचें मुख्य अन्न प्रोटीनयुक्त पदार्थ असले पाहिजेत. अंडीं, मांसे, दूध, तेलयुक्त दाणे, तीळ इत्यादि पदार्थ, कडधान्यें व डाळी, गहूं, मका, बाजरी, ज्वारी व तांदूळ—या क्रमानें प्रोटीनचें उतरतें प्रमाण असतें. प्रोटीन अधिक असलेले पदार्थ थोडे खाऊन, शक्ति राहते व त्यामुळें पोटहि हलकें राहून, पचन नीट होतें. म्हणून प्रोटीन अधिक असलेले पदार्थ रोजच्या अन्नांत विशेष असावेत.

(२) कच्चीं अंडीं पाण्याबरोबर रक्तांत जातात म्हणून मुलांस व अशक्त माणसास (तापांतहि) रोज ३–४ दिल्यानें शक्ति वाढते.

(३) धान्यांतील प्रोटीनपेक्षां प्राणिज प्रोटीन शरीरास अधिक मानवतें व तें लवकर पचून, आरोग्य राहतें. म्हणून अंडीं व दूध आरोग्यकारक अन्न आहे.

(४) एका वेळीं अधिक खाण्यापेक्षां ४–५ वेळां थोडें थोडें खाण्यानें तें अधिक पचतें व थोड्या खर्चांत आरोग्य व शक्ति राहते. एका वेळीं बरेच निरनिराळे पदार्थ खाण्याऐवजीं २–३ पदार्थ खाण्यानेंहि ते अधिक चांगले पचतात.

(५) धान्याहाराचे पदार्थ चावून खातां येतील असे शक्य तितके सुके असावेत. म्हणजे लाळेंत मिसळून जाईल तितकेंच अन्न खाण्यांत येतें. लाळ नीट सुटण्यासाठीं जेवणाचे आधीं अर्धा तास पाणी प्यावें व नंतर १–१॥ तासानें प्यावें.

(६) मेहनतीच्या प्रमाणांत शरीरांत साखरेचा उपयोग होतो. म्हणून गोड पदार्थ भात व कंद शक्य तों कमी खावेत व मुलांच्या दुधांत साखर घालूं नये.

(७) फळभाज्या व पालेभाज्या यांत अन्नांश फार थोडा असल्यामुळें त्या कमी खाव्यात. व्हिटॅमिन्स उर्फ जीवनसत्त्वें यांसाठीं लिंबू, संत्रीं, केळीं, आंवळे, मोड आलेलें धान्य, कोथिंबीर व पालेभाजी वांटून चटणी, असे पदार्थ खावेत. कांदा, मुळा, गाजर, कांकडी, इत्यादि पदार्थांची कोशिंबीर रोजच्या खाण्यांत असावी.

(८) मीठ, तिखट, मसाले व तळलेले पदार्थ कमी खावेत.

### (६) आरोग्याच्या दृष्टीनें लिव्हरचें महत्त्व—

पोटांत उजव्या बाजूस 'लिव्हर' (यकृत) नांवाचें मोठें इंद्रिय आहे. पचलेलें अन्न रक्तांत गेलें म्हणजे तें लिव्हरमध्यें तपासलें जाऊन, त्यांतील प्रोटीन, थोडी साखर व चरबी शरीराच्या गरजेप्रमाणें फिरत्या रक्तांत जातें. कांहीं साखर लिव्हरपेशींत सांठवली जाते व नको असलेले पदार्थ पित्ताच्या रूपानें आंतड्यांत टाकले जातात. प्रमाणाबाहेर साखर आल्यास लिव्हरमध्यें व इतर भागांत चरबीचें रूपांत ती सांठवली जाते; यामुळें लिव्हरमधील रक्तांतील पाण्याचें अभिसरण कमी होऊन पित्ताचे रूपानें नको असलेले पदार्थ टाकण्याचें काम कमी होतें, व शरीरांतील सर्व भागांत पेशींनीं टाकलेले पदार्थ व क्षार हळूहळू सांचूं लागतात. त्यामुळें रक्ताभिसरणास अधिक अडथळा होतो, व हळूहळू सर्व इंद्रियांचीं कार्यें कमी होऊं लागतात. हें शरीर अशक्त होण्याचें मूळ कारण व हाच सर्व रोगांचा मूळ पाया आहे. याचे जोडीस पाणी कमी पिणें व श्रम कमी करणें यांची भर पडली म्हणजे सूक्ष्म वाहिन्यांतून कमी पाणी बाहेर जातें व त्यामुळेंहि प्रत्येक इंद्रियांतील कांहीं पेशींना प्राणवायु व अन्न न मिळून त्यांचें कार्य कमी होतें, व शरीर अधिक अशक्त होत जातें.

(७) **रोगांचें मूळ स्वरूप**— सर्व निसर्गोपचारपद्धतींचें म्हणणें असें आहे कीं, सर्व रोगांचें मूळ कारण शरीरांतील पेशींनीं टाकलेला मळ सर्व भागांत सांचणें हें असल्यामुळें, मूळ रोग एकच; आणि या मळाचा त्रास असह्य झाला म्हणजे शरीर हा मळ बाहेर टाकूं लागतें; शरीराच्या या प्रतिकारास रोग म्हणून त्यांचीं लक्षणें दाबणें हें निसर्गाच्या उलट आहे. म्हणून लक्षणांस महत्त्व न देतां, सांचलेला मळ लवकर बाहेर जाण्यास मदत करणें हा सर्व रोग बरे करण्याचा उपाय आहे. शरीराची रचना जेव्हां नीट समजली नव्हती त्या वेळीं अशा मोघम शब्दांत रोगाच्या मूळ कारणाचा उल्लेख करणें योग्य होतें. पण शरीराची











# आरोग्यशास्त्राचीं मूलतत्त्वें

रचना समजल्यावर आरोग्यासाठीं काय केलें पाहिजे व कां केलें पाहिजे हें जसें समजतें, तसेंच अन्न, पाणी व व्यायाम या तीन गोष्टींत चुका झाल्यानें त्याचा आंतील इंद्रियावर काय परिणाम होतो हेंहि स्पष्टपणें समजतें. त्यामुळें योग्य उपचारांची दिशाहि समजते. पूर्वीं औषधोपचारांनीं बरे न झालेले कित्येक रोगी कटिस्नान, मातीच्या किंवा ओल्या पाण्याच्या पट्ट्या, साधें अन्न व पुरेसें पाणी अशा उपायांनीं बरे होत होते; तरीहि कोणत्याहि निसर्गोपचारपद्धतीनें सर्व रोग बरे होत नसल्यामुळें, तिला लोकमान्यता व सरकारमान्यता मिळाली नाहीं. पण आतां रोगांचीं कारणें व स्वरूप स्पष्टपणें समजल्यामुळें आरोग्याच्या नियमांच्या आधारें सर्व रोगांवर ' शास्त्रीय ' उपचार करून आतांपर्यंत असाध्य समजलेले रोगहि बरे करणें शक्य व सोपें झालें आहे, आणि सध्यां चालू असलेली देशी व परदेशी औषधपद्धति कशी अशास्त्रीय आहे हें सिद्ध करणें शक्य झालें आहे. माझ्या पद्धतीनें गेल्या ३५ वर्षांत कित्येक क्षय व महारोगाचे रोगीहि बरे झाले असल्यामुळें ही पद्धति अनुभवाच्या कसोटीला उतरली आहे. तसेंच रोग बरा झाल्यावर आरोग्य राखण्यासाठीं काय केलें पाहिजे हेंहि या पद्धतींत समजत असल्यामुळें लोकांस आपलें आरोग्य थोड्या श्रमानें ठेवतां येतें. म्हणून ज्यांना खरें आरोग्य हवें असेल त्यांनीं खाण्यांत थोडा संयम करून पाणी पुरेसें पिऊन व घरचे व्यायाम करून स्वतः निरोगी राहावें व इतरांस उदाहरण घालून द्यावें.

## औषधांनीं रोग कां बरा होत नाहीं ?

वर म्हटल्याप्रमाणें अन्नांत साखर जास्त झाल्यामुळें, पाणी कमी प्याल्यामुळें व सर्व भागांस नीट व्यायाम न मिळाल्यामुळें (१) आधीं लिव्हरमध्यें साखर व चरबी सांचून शरीरांतील कांहीं मळ पित्ताच्या रूपानें टाकण्याचें काम कमी होऊन सर्व शरीरांत मळ सांचतो; (२) पाण्याचें अभिसरण कमी होऊन, बऱ्याच पेशींना वायु व अन्न मिळत नाहीं व त्यांचें कार्य कमी होतें व शरीर अशक्त होत जातें; (३) सांचलेल्या मळाचा मेंदूस त्रास होऊं लागून बरें वाटत नाहीं; (४) मळाच्या त्रासामुळें हृदयाची गतिहि बरीच वाढते व ती वाढल्यामुळें त्याची शक्ति कमी होतें आणि (५) छातीची हालचाल कमी होऊन शरीरांत प्राणवायुहि कमी येतो. अशा स्थितींत दमा, मधुमेह इत्यादि जे रोग होतात त्यावर कितीहि औषधें घेतलीं तरी त्याचा उपयोग न होण्याचें कारण औषधांनीं श्वास मोठा होऊन शरीरास वायु अधिक मिळत नाहीं. तहान लागत नाहीं म्हणून पाणी अधिक पिण्यांत येत नाहीं. त्यामुळें पाण्याचें अभिसरण वाढत नाहीं. मळाचा त्रास कमी होत नाहीं तोंपर्यंत हृदयाची गति कमी होत नाहीं व खाणें चालूच असल्यामुळें लिव्हरमध्यें सांचलेली साखर व चरबी कमी होण्यास संधिच मिळत नाहीं. औषधोपचाराची व्यर्थता प्राचीन काळापासून प्रत्यक्ष दिसत असून व आधुनिक शोधांनीं त्याचीं कारणें वरप्रमाणें स्पष्ट केलीं असतां पाश्चात्य पद्धतीच्या डॉक्टरांनीं आपलीच पद्धति शास्त्रीय म्हणून मुलांपासून मरणाऱ्या रोग्यांपर्यंत सर्वांस इंजेक्सनें देत सुटावें यांत त्यांच्या विचारशक्तीचा किती ऱ्हास झाला आहे तें दिसतें.

**जंतुशास्त्राचे सिद्धान्तः—** शरीर अशक्त होऊन प्रतिकार-शक्ति कमी झाल्याखेरीज शरीरांत कोणत्याहि जंतूंची वाढ होत नाहीं, व जंतुरोगाचीं लक्षणें कोणत्याहि भागांत जंतू असल्यामुळें होत नसून, त्यांनीं टाकलेल्या विषामुळें होत असतात असें जंतुशास्त्राचे दोन मुख्य सिद्धान्त आहेत. त्यांच्या आधारें जंतुरोगावर उपचार करायचा झाल्यास त्यांचे विषारी पदार्थ लवकर शरीराबाहेर जाण्यासाठीं पाणी भरपूर पिऊन मळमूत्रावाटें ते लवकर बाहेर जाण्यास मदत केली पाहिजे व शरीरांतील जंतू मारण्यासाठीं शरीराची शक्ति वाढवली पाहिजे. पण पाश्चात्य डॉक्टरांची विचारशक्तिच कमी झाल्यामुळें त्यांनीं शरीरशास्त्राच्या शोधांबरोबर हेहि शोध एकीकडे ठेवून, आपली सर्व शक्ति नवीं नवीं जंतुमारक औषधें तयार करण्यांत खर्च केली आहे. त्यामुळें वरील कारणामुळें इतर औषधांप्रमाणें या औषधांचाहि उपयोग होत नाहीं. म्हणून लोकांनीं रोगाचीं मूळ कारणें लक्षांत घेऊन तीं दूर करण्याचें पुढील उपाय करून आधीं आपलें आरोग्य व शक्ति सुधारावी व त्यांच्या जोडीस एकादे जंतुमारक औषध घेऊन जंतू लवकर मरतात, कीं काय तें पहावें.








**सर्व रोगांवर साधारण उपचारः—** अन्न, पाणी व व्यायाम यांत झालेल्या चुकांमुळें रोगाच्या सुरुवातीस सर्व इंद्रियांची काय स्थिति असते हें लक्षांत घेऊन, त्या स्थितींत शरीराच्या गरजा भागवणें व हळूहळू सर्व इंद्रियांचीं कार्यें वाढवून शरीराची शक्ति वाढवणें हीच शास्त्रशुद्ध उपचारपद्धति होय. हे उपचार दिसण्यांत साधे असले तरी वरील माहितीवरून तेच खरे परिमाणकारक होतील ही खात्री ठेवून हे उपचार करावेत, म्हणजे गुण आल्याशिवाय राहत नाहीं. शरिरांत सांचलेला मळ बाहेर जाण्यास तो फिरत्या रक्तांत यावा लागतो व त्यामुळें त्याचा मेंदूस व हृदयास थोडे दिवस त्रास होतो. पण मळ बाहेर गेल्या खेरीज रोग बरा होणें शक्य नाहीं हें लक्षांत ठेवून पूर्वीच्या चुकांचें प्रायश्चित्त म्हणून हा त्रास थोडे दिवस सहन करण्याची तयारी पाहिजे; म्हणजे ५-६ दिवसांनंतर मळाचें प्रमाण कमी होऊन, त्रास कमी होतो. शरीराच्या नेहमींच्या गरजा भागवण्यासाठीं वर सांगितल्याप्रमाणें दीर्घश्वसन, दर तासास १ ते १॥ पाव पाणी पिणें व हातपाय हालवून स्नायूंस व्यायाम देणें हें केलेंच पाहिजे. हिंडत्या फिरत्या रोग्यांनीं थंड पाण्यानें स्नान करण्यास हरकत नाहीं. रोग्याच्या स्थितीचा विचार करून रोजच्या वागण्यांत मुख्य बदल करायचा तो अन्नासंबंधीं असतो. तसेंच तापांत व हृदय अशक्त असल्यास रोग्यास पूर्ण निजवून ठेवून, सर्व उपचार करणें जरूर असतें. सांचलेला मळ कमी झाला म्हणजे तापहि जातो व हृदयाची वाढलेली गतिहि कमी होते. मोठ्या माणसाच्या हृदयाची स्वाभाविक गति मिनिटास ६० असते. मळाच्या त्रासानें ही ९० किंवा १०० चे वरहि जाते व त्यामुळें अशक्त झालेलें हृदय पूर्ण निजून राहण्यानें आपल्या शक्तीप्रमाणें विश्रांति घेऊन, हळू काम करतें. यामुळें कित्येक वेळां त्याची गति ५० किंवा ४० पर्यंतहि कमी येते. पण अशा वेळीं घाबरण्याचें मुळींच कारण नाहीं. सर्व उपचार नीट चालू ठेवले म्हणजे हृदयाची गति स्वाभाविक ६० वर येते.

**लंघनाचें महत्त्वः—** लिव्हरमध्यें साखर व चरबी सांचून त्याचें पित्त टाकण्याचें काम कमी होणें हें रोगाचें मूळ असल्यामुळें व पचलेलें अन्न शरीरांत जाण्याचा मार्ग लिव्हरमधून असल्यामुळें, सांचलेली साखर व चरबी उपयोगांत येऊन कमी होईपर्यंत रोग्यास कोणतेंहि अन्न देणें म्हणजे रोगास मदत करणें व इतर उपचारांचा फायदा न होऊं देणें होय. म्हणून प्रत्येक रोग्यास कांहीं दिवस लंघन देणें जरूर असतें. कित्येक रोग्यांस लंघन न देतां कच्चीं अंडीं व ताक देऊनहि बरें करतां येतें; पण त्यास जास्त काळ लागतो व तितके दिवस कडक पथ्य करणें पुष्कळांस जड जातें. म्हणून सुरुवातीस कांहीं दिवस पूर्ण लंघन देणें अधिक फायदेशीर होतें. लिव्हरकडून पित्ताच्या रूपानें मळ टाकण्याचें काम लवकर होण्यासाठीं लंघनांत दुसऱ्या दिवसापासून १-२ दिवसांआड १-१॥ चमचा सोनामुखीची भुकी द्यावी. तसेंच थोडें ओलें किंवा सुकें खोबरें खाण्यानेंहि भुकेचें सामाधान होऊन पित्त लवकर निघतें. लंघनांत तोंड कडवट होऊन, पाणी पिणेंहि नको वाटतें; म्हणून १-२ लिंबांचा रस पाण्यांत पिळून किंवा चाखून घेण्यास हरकत नाहीं. सांचलेली साखर कमी होण्यासाठीं मुख्यतः साखर बंद करणें व हातांपायांची हालचाल करणें जरूर असतें. निजून राहिलेल्या रोग्यानेंहि मधून मधून दीर्घ श्वसन व हातांपायांचे व्यायाम केले पाहिजेत. तसेंच त्यानें किंवा दुसऱ्यानें सर्व अंग चोळून, रगडून ओल्या फडक्यानें १-२ वेळां पुसणेंहि फायदेशीर असतें. विशेष अशक्त रोग्यास व जास्त दिवस ताप असल्यास तिसऱ्या दिवसापासून २ ते ४ कच्चीं अंडीं पाण्याबरोबर देण्यास हरकत नाहीं. अंडीं व खोबरें दिल्यामुळें पुष्कळ वेळां वजन कमी न होतां, लिव्हर व इतर इंद्रियांचीं कार्यें वाढून, प्रकृति निरोगी होते. म्हणून कोणींहि लंघनास भिण्याचें कारण नाहीं. मोठ्या व सुशिक्षित रोग्यांनीं सर्व गोष्टी समजून आपल्यास शक्य तितकें व शक्य त्या प्रकारचें लंघन करावें. रोग पूर्ण बरा होईपर्यंत एक मोठें लंघन करण्यापेक्षां कांहीं दिवस लंघन करून, त्यांत कमी झालेलें वजन साध्या अन्नावर भरून काढावें व नंतर पुनः लंघन करावें. याप्रमाणें प्रत्येक माणसानें आपलें शरीर निरोगी करणें व तसें ठेवणें आपल्या हातीं आहे हें लक्षांत ठेवून वर दिलेल्या आरोग्याच्या व उपचाराच्या तत्त्वांप्रमाणें वागून निरोगी व्हावें. म्हणजे थोड्याच काळांत थोड्या संयमानें व श्रमानें निरोगी व सशक्त

राहणें सोपें व कमी खर्चाचें आहे हें त्यास अनुभवानें कळून येईल. लंघनांत आपोआप शौचास होत नाहीं म्हणून रोज संध्याकाळीं २–३ पिंट पाण्याचा एनिमा घेऊन पोट साफ करावें म्हणजे रात्रीं झोंप बरी येते.

**माझा वर्फ लावण्याचा उपचार—**

पूर्वीं सांगितलेल्या कारणांमुळें सर्व रोगांत स्नायू व कातडी यांतील पाण्याचें अभिसरण कमी होतें व आंतील कांहीं इंद्रियांत अधिक रक्त जमतें. यामुळें कातडीचें जिवंतपणाचें तेज कमीं होतें. वरील मृत कातडीचें थर वाढतात व ती काळसर होते. यामुळें कातडीचे अनेक रोग होतात व कितीहि मलमें लावलीं तरी ते बरे होत नाहींत. कातडींतील अभिसरण वाढण्यासाठीं सर्व कातडीस तिसऱ्या प्रहरीं (मोठ्या माणसास) १–१॥ पौंड बर्फ हळूहळू चोळून लावण्याचा उपचार १९१३ पासून मीं सुरू केला व प्रत्येक रोग्यास त्यापासून तात्कालिक व कायमचा फायदा होतो असा माझा अनुभव आहे. तीव्र वेदना तात्काल बंद करण्यास, दम्याचा झटका थांबवण्यास, न्युमोनिआंत फुफ्फुसांत सांचलेलें रक्त कमी करण्यास, तापाचा जोर व ग्लानी कमी करण्यास, उन्हामुळें व श्रमामुळें आलेला थकवा जाण्यास, कातडीच्या सर्व रोगांत व मुलांच्या देवी, गोंवर व डांग्या खोकला या घातक समजलेल्या रोगांत बर्फासारखा दुसरा उपचार नाहीं. या बाह्य उपायावरोबर भरपूर पाणी पाजणें, पोट साफ होण्यासाठीं एनिमा व सोनामुखी देणें व गरज असल्यास शक्तीसाठीं कच्चीं अंडीं देणें हे उपाय मुख्य आहेतच. कांहीं दिवस सारखा ताप असल्यास दिवसांतून २ वेळां बर्फ लावण्यास हरकत नाहीं. लंघनांतहि रोज बर्फ लावण्यानें हुशारी वाटते व कातडींत सांचलेला मळ लवकर जाण्यास मदत होते. बर्फ मिळत नसेल तेथें थंड पाण्याच्या पिपांत बसणें, हात, पाय व पोट यांवर ओल्या पट्ट्या ठेवणें या उपायांनीं कातडींतील अभिसरण वाढवावें.

**शुद्ध पाण्याचा उपाय—**शरीरांत सांचलेला मळ व क्षार रक्तांतील पाण्यांत विरघळून फिरत्या रक्तांत येण्यासाठीं साध्या पाण्यापेक्षां वाफेचें शुद्ध पाणी (डिस्टिल्ड पाणी) पिण्यास देणें फार फायदेशीर असतें. पावसाळ्यांत पावसाचें पाणी जमवून पिणेंहि फायदा करतें. अलीकडे मोटारीसाठीं पुष्कळ ठिकाणीं डिस्टिल्ड पाण्याच्या बाटल्या मिळतात व असें पाणी करण्यास लागणारे डबे टीनवाले तयार करून देतात. कापडाच्या गिरण्यांतून अनेक ठिकाणीं वाफ थंड होऊन झालेलें पाणी नळ्यांतून बाहेर जातें व तेथील अधिकाऱ्यांकडून तें रोग्यांस पिण्यासाठीं मिळू शकतें. लहान मुलांत सांचलेल्या मळाचें प्रमाण कमी असतें, तरीहि त्यांच्या अशक्तपणामुळें देवी, गोंवर व डांग्या खोकला हे लागट जंतुरोग त्यांना लवकर होतात. मुलांच्या या व इतर रोगांतहि शुद्ध पाण्यानें आंतील विषारी पदार्थ लवकर बाहेर जाऊन ५–६ दिवसांत मुलें बरीं होतात. म्हणून मुलांच्या या रोगांत तरी त्यांना शुद्ध पाणी देणें व वर सांगितल्याप्रमाणें रोज बर्फ लावणें हे उपाय सर्व लोकांनीं प्रचारांत आणावेत.

**आरोग्यासाठीं लंघनः—** साधारणपणें एका वेळीं थोडें खाणें, दिवसांतून ५–६ वेळां साफ लघवी होईल इतकें पाणी पिणें, दीर्घ श्वसन व सकाळ संध्याकाळ फिरणें इतक्या उपायांनीं आरोग्य, वजन व शक्ति कायम राहते. पण नकळत होणाऱ्या चुकांमुळें किंवा अन्नपाण्यांतलि क्षार शरीरांत सांचल्यामुळें लिव्हरचें व इतर इंद्रियांचें काम कमी होऊन शरीरांत मळ व क्षार थोड्या प्रमाणांत सांचतो. हें प्रमाण वाढून कांहीं त्रासाचीं लक्षणें होण्याच्या आधींच आपल्या फुरसतीप्रमाणें विशेषतः उन्हाळ्यांत १–२ वर्षांनीं ५–६ दिवसांचें फक्त पाण्यावर लंघन करण्यानें प्रकृति इतकी साफ राहते कीं, ५–६ मैल चालणें किंवा १०–१५ मैल सायकलनें जाणें मुळींच श्रमाचें वाटत नाहीं, व सणावारी थोडें जास्त खाण्यानें पोट जड वाटत नाहीं. यामुळें इतर कांहीं रोग होण्याची भीति वाटत नाहीं. म्हणून लंघनाचा उपयोग फक्त रोग बरा करण्यासाठीं न करतां आरोग्य राखण्यासाठीं करणें, हा सर्व रोग कमी करण्याचा राजमार्ग आहे. लहान मुलांसहि पावसाळ्यांत पावसाचें पाणी देऊन, ३–४ दिवस २–३ अंडीं व थोडें खोबरें खाण्यास देऊन, त्यांचें लिव्हर अधिक कार्यक्षम करावें. म्हणजे त्यांची प्रकृति हवा, पाणी व खाणें यांत थोडा बदल झाल्यामुळें वरच्यावर बिघड-



अनुक्रमणिका

णार नाहीं, व त्यांची योग्य वाढ होणें सोपें होईल.

**मुलांची स्वाभाविक वाढः--** निरोगी मुलांचें पहिल्या वर्षाच्या शेवटीं १८ ते २० पौंड वजन व २८ ते ३० इंच उंची असते. पुढें दर वर्षी ४ ते ६ पौंड वजन आणि २—३ इंच उंची वाढते. म्हणून १८ ते २० वर्षांपर्यंत स्वाभाविक वजन समजण्यास वयाची चौपट करून २० मिळवावेत. उंची समजण्यास वयाची दुप्पट करून ३० मिळवावेत. १८ ते २२ पर्यंत उंची न वाढतां, खाण्याच्या व श्रमाच्या प्रमाणांत फक्त वजन वाढतें. मोठ्या माणसाचे उंचीच्या मानानें ५ फुटांस १०० पौंड व त्या वरील दर इंचास ४ ते ६ पौंड असें वजन असावें. उंच व बारीक माणसाचें वजन या मानानें वरेंच कमी असतें. पण माझ्या पद्धतीनें अन्न पाणी व व्यायाम यांत काळजी घेतली तर कमी असलेलें वजन वाढतें. तसेंच चरबी अथवा वात वाढल्यामुळें ज्यांचें वजन फार असतें, त्यांनीं शुद्ध पाण्यावर लंघन केल्यास व पुढेंहि नियमित अन्न; मिठाचे व मसाल्याचे पदार्थ कमी असें पथ्य करून, शुद्ध पाणी चालू ठेवल्यास, लंघनांत कमी, झालेलें वजन वाढत नाहीं. गेल्या वर्षी ३३८ पौंड वजन असलेल्या एका गृहस्थानें याप्रमाणें मधून मधून लंघन करून व शुद्ध पाणी चालू ठेवून, ९ महिन्यांत २२८ पर्यंत वजन आणलें, व वर्षांत २—३ वेळां लंघन करून व पावसाचें पाणी किंवा शुद्ध पाणी पिऊन तो आपलें वजन अधिक वाढू देत नाहीं.

**क्षय व महारोग** यांवर प्रतिबंधक उपाय म्हणजे आरोग्यशास्त्राचा प्रसार हाच होय. या रोगांचे जंतू योग्य वाढ न झालेल्या अशक्त मुलांचे पोटांत जाऊन, तेथून पोटांतील गांठींत जातात व मुलांची जेव्हां जेव्हां प्रकृति बिघडते तेव्हां त्यांची वाढ होते. याप्रमाणें कांहीं वर्षे वाढ झाल्यावर त्या रोगांचीं लक्षणें दिसूं लागतात. क्षयाचें पहिलें लक्षण वजन न वाढणें व दुसरें लक्षण लहानसहान रोगांनीं वजन कमी होऊन तें लवकर न वाढणें. म्हणून अशक्त, वाढ खुंटलेल्या, वजन कमी असणाऱ्या मुलांस पूर्वी सांगितलेले उपाय करून, त्यांचें वजन स्वाभाविक मर्यादेंत आणलें पाहिजे व पुढें त्यांची योग्य वाढ होईल अशी काळजी घेतली पाहिजे. विशेषतः मे महिन्याच्या सुटींत पूर्ण विश्रांति, थोडें लंघन व नंतर साधें अन्न-पाणी व व्यायाम यांवर प्रकृति सुधारून वजन वाढवावें व पुढेंहि तें नीट वाढेल अशी काळजी घ्यावी.

———

## नोव्हेंबरमध्यें दिसलेला धूमकेतु—

नोव्हेंबरमध्यें महाराष्ट्रांत व मद्रासमध्यें जो धूमकेतु दिसला, त्याबाबत खगोलशास्त्रज्ञांना मोठें कुतूहल उत्पन्न झालें आहे. नोव्हेंबर १२ च्या सुमारास आपल्या महान् दुर्बिणी लावून त्यांनीं जें अवलोकन केलें त्याविषयीं कांहीं उद्बोधक माहिती खालीं दिली आहे—

या धूमकेतूचा आकार सारखा बदलत आहे. हा धूमकेतु पृथ्वीपासून सुमारें 'अडीच प्रकाशवर्षे' अंतरावर आहे; म्हणजे दर सेकंदाला प्रकाशाची गति १,८६,००० मैल धरली तर या धूमकेतूच्या प्रकाशाला पृथ्वीपर्यंत पोहोंचायला २॥ वर्षें लागतील. दुर्बिणीशिवाय चन्द्र जेवढा मोठा आपल्या डोळ्याला दिसतो, तेवढा हा धूमकेतु दुर्बिणींतून दिसतो. त्यामधून निळसर, हिरवट, गुलाबी असा प्रकाश बाहेर पडतांना दिसतो. या धूमकेतूचा व्यास ३४ दशलक्ष मैल आहे. हा धूमकेतु सेकंदास १९५ मैल अशा वेगानें आकाशांत भ्रमण करीत आहे; म्हणजे पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरतांना ज्या वेगानें जात आहे, त्या वेगाच्या दसपट हा वेग आहे. हा धूमकेतु सूर्यमालेपैकींच एक असून, ठराविक अवधीनंतर दिसणारा असा आहे. हाच धूमकेतु बहुतेक पुन्हां २००३ सालीं डिसेंबरच्या आरंभीं दिसेल.

'हिंदु'वरून (१४–११–४८)



अनुक्रमणिका








प्रा. ना. अ. गोरे,

# ॐ नमः सिद्धम्

'नवभारत'च्या ऑगस्ट १९४८ च्या अंकांत पृष्ठ ७५ वर पूज्य आचार्य विनोबांच्या दिल्ली येथें २१-४-४८ रोजीं महावीर-जयन्तीनिमित्त केलेल्या भाषणांतील कांहीं भागाचा उतारा 'सेवक' वरून छापला आहे. तो उतारा असा आहे:—

" लहानपणीं आमचें शिक्षण सुरू झालें तेव्हांची मला आठवण आहे कीं, अ, आ, क, ख, आदि वर्ण शिकविण्यापूर्वी विद्यार्थ्यांना 'श्रीगणेशाय नमः', 'ॐ नमः सिद्धम्' हें शिकविलें जाई. मी महाराष्ट्रांतलि गोष्ट सांगत आहे. इथें कसें शिकविलें जातें तें मला ठाऊक नाहीं. त्यांत 'श्रीगणेशाय नमः' हें शिष्यांच्या धर्माला अनुलक्षून ठेविलें आहे. कारण, हिंदु धर्मांत पहिला नमस्कार गणेशाला केला जातो. 'ॐ नमः सिध्दम्' हें जैन धर्माला अनुलक्षून ठेविलें आहे. तो जैन गुरूंचा शिक्का आहे. परंतु जैन गुरु इतके नम्र होते कीं 'ॐ नमः सिद्धम्'ला त्यांनीं 'श्रीगणेशाय नमः'च्या नंतर स्थान दिलें. जैनांनीं आपल्यासाठीं स्वतंत्र अधिकारहि मागितले नाहींत. ते आपल्याला केवळ सुधारक मानीत होते. हीच त्यांची विशेषता."

## अर्हंतांना पहिलें अभिवादन

पूज्य विनोबांच्या संपूर्ण भाषणाचा वृत्तान्त मला पाहावयाला मिळालेला नाहीं. पण वरील उताऱ्यावरून विचार करतां असें गृहीत धरलेलें दिसतें कीं, जुन्या काळीं 'श्रीगणेशाय नमः। ॐ नमः सिद्धम्' अशीं जीं मुळाक्षरें शिकविण्याला प्रारंभ करावयाची पद्धति प्रचारांत होती, ती प्रथम जैन गुरूंनीं सुरू केली व त्या वेळीं त्यांचे आद्य शिष्य हिंदु होते. जैन हे गुरु होते असें मानण्याचें कारण, 'ॐ नमः सिद्धम्' हा जैन गुरूंचा शिक्का होता असें ते म्हणतात. पण या विधानाला त्यांनीं ऐतिहासिक आधार दिला असतां तर बरें झालें असतें. मींहि माझ्या अल्पमतीप्रमाणें जैन वाङ्मयाचा थोडाफार अभ्यास केला आहे. तथापि 'ॐ नमः सिद्धम्' हा जैन गुरूंचा शिक्का असल्याचें मला तरी आढळून आलें नाहीं. जैन धर्मीयांमध्यें पांच पूज्य व्यक्तींना किंवा व्यक्तींच्या गटाला (याला ते पंचपरमेष्ठी असें म्हणतात) नमस्कार करणें पुण्यप्रद व संकटपरिहारक मानलें जातें. ते नमस्कार खालील ठराविक शब्दांनीं करण्याची प्रथा रूढ आहे—

नमो अरिहंताणं  
नमो सिध्दाणं  
नमो आयरियाणं  
नमो उवज्झायाणं  
नमो लोए सव्व साहूणं

म्हणजे अर्हंतांना किंवा जैन तीर्थंकरांना नमस्कार असो, सिद्धांना नमस्कार असो, आचार्यांना किंवा धर्मगुरूंना नमस्कार असो, उपाध्यायांना नमस्कार असो, जगांतील सर्व साधूंना नमस्कार असो.

जर जैन गुरूंनीं 'श्रीगणेशाय नमः, ॐ नमः सिद्धम्' असें मुळाक्षरांच्या सुरुवातीला म्हणावयाचा प्रघात पाडला असतां तर अर्हंतांना प्रथम नमस्कार करावयाचें सोडून, दुसऱ्या क्रमाच्या सिद्धांना नमस्कार करण्याची प्रथा त्यांनीं प्रचारांत आणली असेल हें संभवनीय वाटत नाहीं. अर्हंतांपेक्षां सिद्ध म्हणजे पूर्णावस्थेला पोंचलेले जीव हे वरच्या पायरीवर आहेत असें जैन मानतात हें खरें; पण अर्हंतांच्या द्वारा सिद्धावस्थेला जाणें शक्य होत असल्यामुळें ते अर्हंतांना प्रथम अभिवादन करतात.








## ‘ सिद्धं नमः ’ हें बुद्धधर्मीय

दुसरें कारण असें कीं, दक्षिण हिंदुस्थानांतील जैन-मताचा अभ्यास ज्यांनीं केलेला आहे त्या श्री. बी. शेषगिरि राव यांच्या ‘ दाक्षिण हिन्दुस्थानांतील जैन-मताचा अभ्यास’ या पुस्तकांतील एका विधानावरू-नहि ‘ ॐ नमः सिद्धं ’शीं सारखवट असलेल्या ‘ सिद्धं नमः ’चा संबंध जैनांशीं न पोंचतां बुद्धधर्मी-यांशीं पोंचतो. ते म्हणतात, “ तेलुगु लोक आपल्या वर्णमालेच्या प्रारंभीं ‘ ॐ नमः शिवाय सिद्धं नमः ’ असे ठराविक शब्द म्हणतात. या ठराविक शब्दांतील उत्तर भाग ( सिद्धं नमः ) हा निश्चितपणें बुद्धधर्मी-यांचा आहे. त्यांचे शेजारी कलिंग देशांतील ओरिया लोक हे माझ्या माहितीप्रमाणें ‘ सिद्धिरस्तु ’ असे ठराविक शब्द ( वर्णमालेच्या प्रारंभीं ) म्हणतात. मला असें आढळतें, कीं जैनांनीं दिलेल्या दानाच्या विषयीं केलेल्या लेखाच्या शेवटीं (‘ सिद्धिरस्तु ’) हे ठराविक शब्द येतात. ”[1] याच पुस्तकाच्या ८० व्या पानावर[2] ‘ सिद्धं नमः ” हें बुद्धाचें आहे या मताचा त्यांनीं पुनरुच्चार केला आहे. त्याचबरोबर त्यांनीं आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ जर ऐतिहा-सिक वाङ्मयीन आधार दिले असते तर अधिक बरें झालें असतें.

## “सिद्धं” म्हणजे हिंदूंचीं मुळाक्षरें

या दोन कारणांवरून ‘ ॐ नमः सिद्धम् ’शीं जैन गुरूंचा संबंध असणें शक्य नाहीं असें म्हटलें असतां तें पटेल असें वाटतें. तथापि श्री. राव यांच्या मतावरून ‘ ॐ नमः सिद्धं ’शीं बुद्धधर्मीय गुरूंचा संबंध पोंचतो असें कुणाला वाटण्याचा संभव आहे. शिवाय आपल्या वर्णमालेच्या प्रारंभीं विद्यादाता म्हणून श्रीगणेशाला नमस्कार केल्यावर ‘ ॐ नमः सिद्धं ’ असें कां म्हटलें जात असे हा प्रश्न रहातोच. ॲलिस गेटी या विदुषीनें लिहिलेलें[3] ‘गणेश’ हें सुंदर पुस्तक वाचीत असतांना या प्रश्नाचें उत्तर सहजगत्या सांपडलें. या पुस्तकाच्या पा. ४ वर डॉ. प्रबोधचंद्र बागची या बंगाली विद्वानांनीं लेखिकेला धाडलेल्या पत्रांतला उतारा दिला आहे. त्यांत ते म्हणतात, कीं प्राचीन भारतवर्षांत फार पूर्वीपासून हिंदूंच्या मुळाक्षरांना ‘ सिद्धं ’ असें नांव होतें. ‘ ॐ नमः सिद्धं ’ मध्यें याच ‘ सिद्धं ’ ला नमस्कार केला आहे असें मला वाटतें. आतां ‘ श्रीगणेशाय नमः ’ यांत संस्कृत व्याकरणाच्या सर्वसामान्य नियमाप्रमाणें ज्याला नमस्कार करावयाचा त्या श्रीगणेशाची चतुर्थी विभक्ति केली आहे. त्याच नियमानें ‘ सिद्धं ’ची चतुर्थी कां नाहीं, असें कोणी म्हणेल. ‘ करोमि ’ या क्रियापदाचा इथें अध्याहार मानला तर ‘ सिद्धं ’ या द्वितीया विभक्तीची उपपत्ति लागूं शकेल. ‘ सिद्धं ’ या द्वितीयेची उपपत्ति निराळ्या तऱ्हेनें होण्यासारखी असेल तर संस्कृत वैयाकरणांनीं ती दाखवून दिल्यास बरें होईल.

वर श्री. बी. शेषगिरि राव यांच्या पुस्तकांतून दिलेल्या उताऱ्यांतहि, तेलुगु वर्णमालेच्या प्रारंभीं ‘ ॐ नमः शिवाय, सिद्धं नमः ’ असें म्हटलें जात असल्याचा जो उल्लेख आहे त्यांतहि ‘ शिवाय नमः ’

---

1. From “ Studies in South Indian Jainism ”, Madras, 1922. Part I—By M. S. Ramaswami Ayyangar. Part II—Andhra Karnata Jainism—By B. Seshagiri Rao.— “ The Telugu people use the formula ‘Om Namah S’ivaya Siddham Namah’ at the beginning of their ***varna mala***; the latter part is distinctly Buddhist. While their neighbours, the Oriyas of Kalinga, so far as I know, use the formula ‘ Siddhir Astu ’. This formula, I find, closes a Jain grant. ” —p. 64 of Part II.

2. “The formula, which expresses S’atavahana culture best is ‘ Siddham Namah ’ the formula that expresses Chalukya culture best is ‘ Om Namah S’ivaya Siddham Namah ’ or ‘ Om Namo Narayanaya ’. S’aivism and Narayanism are said to be particularly of South Indian origin, while Buddhism represented by ‘ Siddham Namah ’ is Mauryan and North Indian. ”—p. 80 of Part II.

3. ‘ Ganes’a ’ by Alice Getty, London, 1936. “ In ancient India, ‘ ***Siddham*** ’ was the name given to the Hindu alphabet for a long time ” P. 4.

अशी ' शिव ' शब्दाची चतुर्थी होत असतांना, 'नमः'च्या योगानें ' सिद्धं ' अशी द्वितीयाच झाली आहे हेंहि या ठिकाणीं लक्षांत घेणें जरूर आहे.

मुंबईच्या विल्सन कॉलेजांतील पंडित भार्गवशास्त्री जोशी, व्याकरणाचार्य, यांनीं 'ॐ नमः सिद्धं' ची उपपत्ति निराळ्या तऱ्हेनें सुचविली आहे. ' ॐ नमः सिध्दं 'चीं ' ॐ नमः ' आणि ' सिध्दं ' अशीं पदें पाडावीत असें ते सुचवितात. ' ॐ ' हें ब्रह्मवाचक अव्यय आहे. ब्रह्माला नमस्कार असा ' ॐ नमः 'चा अर्थ ; अव्यय असल्यानें ' ॐ 'ची चतुर्थी विभक्ति होण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. ' सिद्धं ' हें मांगल्यसूचक अव्यय मानावें असेंहि सुचवून ' सिद्धे शब्दार्थसंबन्धे ' याचेवर भाष्य करतांना ' सिद्ध ' शब्द माङ्गल्यसूचक असल्याचें महाभाष्यकार पतंजलि मुनींनीं मानलें असल्याचा ते दाखला देतात.

## " ओनामासीधं "

लहान मुलांना ' ॐ नमः सिद्धं ' शिकवितांना त्याचें ' ओनामासीधं ' असें सोपें रूप होत असे हें महाराष्ट्रांतल्या पुष्कळांना परिचयाचें आहे. संयुक्तप्रांतांत मोडीसारखी ' मोडिया ' लिपि शिकवितांना सुरुवातीला ' रामसती, सुरसती, ओनामासीधं ' म्हणजे रामसीता, सुरसरित् ( गंगा ), ॐ नमः सिद्धं—असें शिकवितात असें रुइया कॉलेजांतील प्रा. जैन म्हणाले. महाराष्ट्र व संयुक्त प्रांत या दोन्ही प्रांतांत ' ओनामासीधं ' हें एकच रूप पाहून मौज वाटते.

आतां शाळांतून शिक्षण देतांना लहान मुलांना मुळाक्षरें २५–३० वर्षांपूर्वी तीं ज्या तऱ्हेनें शिकवीत त्या तऱ्हेनें शिकविलीं जात नाहींत व वर्णमालेच्या आरंभीं ' श्रीगणेशाय नमः, ॐ नमः सिद्धं ' असे नमस्कारहि केले जात नाहींत हें खरें असलें तरी या साध्या विषयांतला खरा आशय पूर्णपणें शोधून काढण्याकडे विद्वानांनीं लक्ष दिलें पाहिजे. The Alphabet, a key to the history of mankind, by David Diringer हें जगांतील वर्णमालांचा उद्गम व विकास यांवरील संशोधनपूर्वक लिहिलेलें पुस्तक नुकतेंच पहाण्यांत आलें. त्यांत गुप्त–लिपीवरून सिद्धमातृकालिपीच्या द्वारा देवनागरी लिपि इ. स. सहाशेंच्या सुमारास निघाली अशा आशयाचें विधान आढळतें. त्या सिद्धमातृका लिपीच्या स्मरणार्थ ' ॐ नमः सिद्धं ' म्हणण्याची प्रथा पडली कीं काय याचाहि विद्वानांनीं विचार करावा.

पूज्य विनोबांनीं या विषयाचा प्रथम उल्लेख करून त्याकडे आपलें लक्ष वेधल्याबद्दल आपण त्यांचे आभार मानले पाहिजेत. 'ॐ नमः सिद्धं' हें मूळ जैनांचें असो वा बौद्धांचें अथवा हिंदूंचें. खऱ्या विद्वानाला 'श्रीगणेशाय नमः, ॐ नमः सिद्धम् ' येथें ' सिध्दं ' कां आलें व त्याची द्वितीया विभक्ति कां याचा प्रमाणासह उलगडा झाला तर आनंदच वाटेल. श्री. डॉ. प्रबोधचंद्र बागची यांच्या वर लिहिलेल्या मतानें कांहींसा उलगडा होतो पण द्वितीया विभक्तीचें समाधानकारक स्पष्टीकरण त्यांत नाहीं. ते सध्यां चीनला गेले आहेत. त्यांना मीं या बाबत धाडलेल्या पत्राचें उत्तर यावयाला कांहीं महिन्यांचा कालावधि लागणार असल्यानें मला उपलब्ध असलेली माहिती विद्वानांच्या विचारार्थ येथें मांडली आहे.

---

लहान मूल म्हणजे एक स्वतंत्र आध्यात्मिक शक्ति आहे, हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. तारा दिसायला किती लहान, टांचणीच्या टोंकाएवढा प्रकाशाचा एक ठिपका दिसतो. पण वस्तुतः तो एक स्वतंत्र विशाल तेजोगोल आहे. त्याचप्रमाणें लहान मूल स्थूलदर्शनीं जरी मानवजातीचा इवलासा अंश दिसत असलें, तरी त्यामध्यें आत्म्याचें साम्राज्यवैभव सामावून राहिलें आहे.

—डॉ. मेरिआ मांटेसोरी (मुंबई. २२-१०-१९४८)












श्री. काका कालेलकर (अनुवादक : श्री. पां. ग. देशपांडे)

# गांधीयुगाचा प्रेरक प्रतिनिधि

[श्री. रविशंकर व्यास ऊर्फ रविशंकर महाराज हे गांधीजींच्या प्रभावळींतलि एक थोर दर्जाचे लोकसेवक आहेत. पाटणवाडिया नांवाच्या मागासलेल्या व गुन्हेगार म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जातींत त्यांनीं आपल्या आदर्श जीवनानें व सेवापरायणतेनें एक प्रकारची क्रान्तिच घडवून आणली आहे. श्री. बबलभाई महेतांनीं त्यांचें एक विस्तृत चरित्र लिहिलें असून तें थोडयाच दिवसांत 'कमल प्रकाशन मंदिर' अमदाबाद मार्फत प्रसिद्ध होईल. त्या ग्रंथास श्री. काकासाहेब कालेलकर यांनीं लिहिलेली प्रस्तावना खालीं दिली आहे. —अनुवादक]

श्री. रविशंकर व्यास यांची जेव्हां अगदीं प्रथम भेट झाली त्या वेळीं त्यांचा पोशाख, त्यांची बोंगडी व त्यांची बसण्याची पद्धत पाहून हा कोणी एकादा गांवढळ निरक्षर कार्यकर्ता असावा अशी छाप माझ्या मनावर पडली. त्या वेळीं मला कोणी त्यांची ओळख करून दिली नाहीं, हें एकपरी चांगलेंच झालें. दुसऱ्या क्षणींच कळून आलें कीं, हा खेडवळ मनुष्य शरीरानें जसा निरोगी आहे तसा मनानेंहि निरोगी आहे. त्यांच्या अंगीं असामान्य नम्रता होती. परंतु त्या नम्रतेच्या मागें स्वतःविषयीं कोणत्याहि प्रकारचा अविश्वास दिसत नव्हता.

## 'रविशंकर महाराजांचा शोध'

त्यांच्याशीं बोलणें सुरू झालें तेव्हां मला दिसून आलें कीं, शुद्ध जिज्ञासेनें प्रेरित होऊन ते जे प्रश्न विचारीत होते, त्या प्रश्नांच्या मागें उच्च दर्जाची संस्कारिता व सामान्य लोकांपाशीं असते त्यापेक्षां पुष्कळ उपयुक्त आणि विपुल माहिती आहे. आर्यसमाजाचे संस्कार हे तर तत्काळ दिसून येतच; परंतु कित्येक आर्यसमाजी लोकांमध्यें ज्या प्रकारचा सनातनी कट्टर 'समाजी'पणा असतो त्यापासून ते मुक्त होते. मी त्यांना म्हणालों कीं, "सनातनी वृत्ति न सोडून दिलेले लोक जेव्हां आर्यसमाजी बनतात तेव्हां ते वेदाचा अर्थ करतांना सायणाचार्यांच्या ऐवजीं ऋषि दयानंदांना प्रमाण मानतात, एवढेंच. परंतु अंधानुयायिता व कट्टरपणा दोहोंचा सारखाच असतो. एक जण 'धर्मसिंधू'ला व (किंवा) रूढि–स्मृतीला मानतो तर दुसरा 'सत्यार्थ प्रकाश'-ला मानतो. परंतु आंधळ्या अनुसरणाच्या बाबतींत दोघेहि सारखेच सनातनी असतात. तुमच्यांत असला सनातनीपणा मला दिसत नाहीं. तुम्ही अगदीं ताजे (जिवंत) दिसतां."

अशा रीतीनें रविशंकर महाराजांचा शोध माझ्यापुरता मीं स्वतःच लावला. या गोष्टीला आज पाव शतकाहून जास्त काळ लोटला आहे. इतक्या वर्षांत मी अनेक वार, अनेक प्रसंगीं रविशंकर महाराजांच्या परिचयांत आलों आहें. आणि मला असें दिसून आलें आहे कीं, बुद्धीचा, हृदयाचा आणि जीवनदृष्टीचा त्यांचा ताजेपणा (जिवंतपणा) पूर्वीं होता तसाच कायम राहिला आहे; इतकेंच नव्हे तर कांहींसा वाढलेला आहे. निःस्पृहता बाळगून देखील सर्वांशीं समभाव व माधुर्य ठेवून वागण्याच्या कलेंत तर गांधीजींनंतर त्यांचाच नंबर लागेल. त्यांच्याशीं तासन्–तास बोलत बसा, व वर्षानुवर्षें त्यांच्या कामाचें निरीक्षण करा, त्यांच्या मनांत कोणाहि विषयीं कटुता किंवा शत्रुत्व असल्याचें दिसून येणार नाहीं.

जेव्हां जेव्हां याचें कारण शोधण्याचा प्रयत्न मीं केला आहे, तेव्हां तेव्हां मला तरी त्यांच्या या



अनुक्रमणिका






सिद्धीच्या मुळाशीं त्यांचा निर्लोभीपणा, अपरिग्रह व अनासक्ति हींच दिसून आलीं आहेत. आणि लोकांना जरी आश्चर्य वाटलें, तरी मला असें निश्चित वाटतें कीं, त्यांच्या या गोड स्वभावाच्या मुळाशीं त्यांचें साधें, कष्टसहिष्णु कणखर जीवनच आहे. ज्या लोकांचा कणखरपणा जबरदस्तीनें कमावलेला असतो व नीट पचलेला नसतो, असे लोक स्वतःची कदर व्हावी म्हणून देखील इतर शिथिल व मवाळ मनाच्या लोकांशीं कडकपणा दाखवतात. परंतु ज्यांनीं शीतल त्याग साधला आहे, पचवला आहे, काबाड कष्ट करतांना ज्यांना आनंदाचें भरतें येतें, व परिश्रमी जीवन ज्यांना कष्टासारखें वाटत नाहीं, असे लोक त्याच चारित्र्य-सिद्धीच्या कारणानें, केवळ वर वर नव्हे, तर अगदीं अन्तःकरणाच्या खोलांतून इतरांशीं वागतांना गोडपणा बाळगूं शकतात, दाखवूं शकतात.

## सेवावृत्तीच्या बुडाशीं वात्सल्यभावना

कित्येक आध्यात्मिक साधनेचे उपासक फारच कोमल स्वरानें बोलतात, प्रत्येक बाबतीकडे उदार दृष्टीनें पाहण्याचा आग्रह बाळगतात, परंतु ते राकट व खऱ्या वस्तुस्थितीला शिवतच नाहींत. मग एकाद्या भांडणांत पडून दबलेल्यांचा प्रत्यक्ष कैवार घेणें तर दूरच राहिलें. रविशंकर अशा कोटींतील नव्हत. त्यांचा पुण्यप्रकोप जागृत होऊं शकतो. गरिबांच्या मदतीला त्यांना धांवून जातां येतें. भांडण आपल्या अंगावर घेऊं शकतात. परंतु त्यांची उच्च भूमिका लेचीपेची नव्हे तर भरीव व भक्कम असून स्वतःच्या अनासक्तीच्या द्वाराच ते सर्वांच्या आदरास पात्र होतात. दूर राहून स्वतःच्या कातडीस वांचवणें म्हणजे कांहीं अनासक्ति नव्हे; परंतु स्वतःच्या स्वार्थावर निखारा ठेवून दुर्जनांच्या विषयींहि सम-भाव अंगीं बाणवणें ही खरी अनासक्ति होय हें ते जाणतात. आणि गरिबांस न्याय मिळवून देण्यासाठीं आणि त्यांच्यावरील संकट निवारण्यासाठीं न्यायनिष्ठेनें प्रेरित होण्याच्याऐवजीं प्रेम, बंधुभावना, आणि मानव्याविषयींच्या निष्ठेनेंच ते समाजसेवेच्या कार्यास प्रवृत्त झाले आहेत. अथवा असें म्हणणें जास्त उचित होईल कीं, मातेच्या ठिकाणीं स्वतःच्या अपत्यां-विषयीं जें निःसीम वात्सल्य वसत असतें तेंच गुन्हेगार गणल्या जाणाऱ्या व समाजास उपद्रवकारक म्हणून ठरलेल्या दुर्दैवी जातींची सेवा करण्यास त्यांना प्रेरणा देतें.

सेवा करण्याची ही वृत्ति घेऊनच ते जन्मास आले असावेत असें वाटतें. पण ती सेवा करण्याची विवेकपूर्ण कुशलता त्यांना अनुभवानेंच प्राप्त झालेली आहे. या बाबतींतील त्यांचें आत्मपरीक्षण इतकें उग्र आहे कीं, सेवाभावांत परोपकारबुद्धीचें मिश्रण झाल्यानें सेवाभाव मलिन होऊं शकतो हेंहि त्यांच्या लक्षांत आलेलें आहे.

## अंतर्मुख जागरूकता

त्यांची तत्त्वनिष्ठा व सेवाभाव पाहून सत्तेचे प्रतिनिधि असे सरकारी अंमलदार लोक त्यांची कदर करूं लागले. त्यांच्या सूचनांना मान देऊन गरिबांना न्यायाची, त्याचप्रमाणें पैशाची व सुखसोयींची मदत करूं लागले. महाराज या कामांत ओढले गेले, वाहवलेच म्हणाना; परंतु त्यांच्या अंतर्मुख जागरूकपणाला यांत असलेले दोष पारखण्यास उशीर लागला नाहीं. चारित्र्यसंगठनाच्या दृष्टीनें तात्कालिक मदतीचें काम हें संकटनिवारणाचें पांगळें साधन आहे हें त्यांनीं पाहून घेतलें आणि त्यांना त्याची प्रतीति होतांच त्यांनीं ती गोष्ट जाहीरपणें सांगितली. परंतु संकटनिवारणाचें काम सोडून देण्याइतका आध्यात्मिक आंधळेपणा त्यांच्या ठिकाणीं नाहीं. संकट-निवारणाचें महत्त्व संकटनिवारणापुरतेंच आहे, त्याहून त्याची जास्त किंमत नाहीं एवढें त्यांनीं पाहून घेतलें आहे. आणि गरिबांचें दुःखनिवारण करण्यासाठीं स्वराज्य– सरकारची मदत घेण्यास ते तयार झाले तरी सत्य आणि सत्ता या दोहोंचा मेळ बसणें शक्य नाहीं, एवढी गोष्ट तर त्यांच्या मनांत पूर्ण बिंबलेली आहे. कणखरपणाच्या जीवनाच्या कारणानें टिकून राहिलेली जागरूकता हेंच त्यांचें मुख्य भांडवल आहे. आणि त्यामुळेंच ते एक उच्च कोटीचे सेवक व साधक होऊं शकले आहेत.

## अशिक्षित मानणें चूक

त्यांना संस्कृत किंवा इंग्रजी जरी येत नसलें, तरी त्यांना कोणी अशिक्षित मानलें तर ती मोठी चूक होईल. मानवी मनाचें व जीवनाचें पृथक्करण करण्याची कला ज्यानें कमावली आहे आणि







सेवेप्रीत्यर्थ ती ज्यास वापरतां येते त्याला कधींहि अशिक्षित म्हणतांच येत नाहीं.

रविशंकर जी गांवढळ भाषा बोलतात ती त्यांनीं कमावलेली आहे. त्यांच्या प्रत्येक वाक्यांतून त्यांची शब्दसंपत्ति दृष्टिगोचर होते. इतकेंच नव्हे तर त्यांना शब्दाच्या शक्तीची चांगली जाणीव आहे ही गोष्टहि उघडकीस येते. जेथें सत्यनिष्ठा व जीवननिष्ठा असतील तेथें विचारशुद्धि आणि भाषाशुद्धि या आपोआपच वाढीस लागाव-याच्या. मनुष्यस्वभावाचें व सामाजिक परिस्थितीचें इतकें गभीर ज्ञान ज्याला आहे त्याच्या भाषेंत व शैलींत मार्दव आणि तेजस्विता हीं दोन्ही यावयाचींच.

आदर्शपालनासाठीं जो संयम कमवावा लागतो व व्यावहारिक दृष्ट्या सर्व गमवावें लागतें याचा अनुभव ज्याला आहे त्याच्या मनांत, जर अभिमानानें शिरकाव केला नाहीं तर, सामान्य माणसाच्या शिथिलतेविषयीं अनुकंपा उत्पन्न व्हावयाचीच.

## मानवधर्मपालनाचा खरा मार्ग

रविशंकर महाराज यांच्याविषयीं आतांपर्यंत गुजरातींत चार पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्या पैकीं त्यांच्या पूर्वचरित्राची संक्षिप्त रूपरेखा प्रस्तुत पुस्तकाचे लेखक श्री. बबलभाई महेता यांनींच लिहिलेल्या 'महाराज थया पहेलां' ( महाराज होण्या-पूर्वीं ) या पुस्तकांत दिलेली आहे. श्री. झवेरचंद मेघाणी यांनीं लिहिलेल्या 'माणसाइना दीवा' ( माणुसकीचे दीप ) या पुस्तकांत महाराजांच्या व्यक्तित्वाची व कार्याची यथार्थ कल्पना करून देण्याचा समर्थ प्रयत्न केलेला आहे. त्या पुस्तकास विश्वसाहित्यांत स्थान मिळेल असें जें मी त्याच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे त्यांत तिळमात्र अतिशयोक्ति नाहीं. याचीं तीन कारणें आहेत. आदिवासियांप्रमाणेंच पाटणवाडियासारख्या गुन्हेगार मानल्या जाणाऱ्या जातींच्याकडे मानवजातीचें समभावयुक्त लक्ष गेलेलें आहे. हें एक कारण होय. दुसरें कारण म्हणजे आपल्या पुढील विषयाचें महत्त्व बरोबर ओळखून घेऊन त्याला योग्य शब्दांत रुजू करणारी झवेरचंद मेघाणी यांची परिपक्व शैली होय. आणि तिसरें व मुख्य कारण असें कीं गांधीजींच्याकडून प्रेरणा घेऊन व घाडग्यासारख्या सज्जन पोलिस अमलदारापासून गुन्हेगार जातीच्या अंतःकरणाची पकड घेण्याची शक्ति प्राप्त करून रविशंकर महाराज यांनीं जी उज्ज्वल मानवसेवा केली आहे तिला जोड मिळणें अशक्यप्राय; आणि या मार्गानेंच गुन्हेगार जातीच्या प्रश्नाचा निकाल जगाला लावावा लागणार आहे. रविशंकर महाराजांनीं केवळ हिंदुस्थानपुढेंच नव्हे, तर आजच्या समस्त दुनियेपुढें एक उदात्त आदर्श मांडलेला आहे व त्याचा स्वीकार करण्यास आजचें जग हळूहळू का होईना तयार होत चाललें आहे.

वेगवेगळ्या जातींच्या मध्यें बंधुत्वाची भावना स्थापन करावयाची असेल व युगानुयुगें हाडींमांसीं खिळलेले सामाजिक दोष आणि चुकीचे आदर्श दूर करावयाचे असतील, तर कठोर न्यायनिष्ठेपेक्षां प्रेमळ बंधुभावना व मातृसहज क्षमावृत्तीच कमावली पाहिजे. असें केलें तरच माणसांमाणसांत, जातीजातींत, जमातीजमातींत आणि राष्ट्राराष्ट्रांत भ्रातृभावना किंवा कौटुंबिक भाव स्थापन होऊं शकेल. सत्य आणि अहिंसा यांच्या द्वारा जो मानवधर्म स्थापन करण्यासाठीं गांधीजींनीं अजन्म व आमरण शिकस्त केली त्याच मानवधर्माचें पालन करण्याचा खरा मार्ग रविशंकर महाराज यांनीं अजमावून पाहिला आहे.

## एका सेवावीरानें दुसऱ्या सेवावीराचें लिहिलेलें चरित्र

'माणसाईना दीवा' या पुस्तकांत पाटणवाडिया जातीची परिस्थिति आणि तिच्या मनोरचनेच्या भूमिकेवर महाराजांचें चरित्र कसें उठावदार दिसून येतें तें मध्ययुगीन सौराष्ट्राच्या बहारवटिया* युगाचे आधुनिक चारण श्री. झवेरचंद मेघाणी यांनीं फारच सुंदर तऱ्हेनें दाखवलें आहे. परंतु रविशंकर महाराज यांचें जीवनकार्य समजण्यासाठीं तेवढें पुरें नव्हतें. गांधीयुगांत राष्ट्रीय महासभेनें स्वराज्यप्राप्ती-

---

* बहारवटिया म्हणजे राज्याच्या अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठीं बंड पुकारून त्याच्याशीं सामना करीत राहतो तो.



अनुक्रमणिका






प्रीत्यर्थ जी उग्र चळवळ सुरू केली आणि समस्त देशानें गांधीजींच्या प्रेरणेनें जें सांस्कृतिक जागृतीचें कार्य केलें, त्या नकाशांत गुजरातच्या सार्वजनिक जीवनांत रविशंकर महाराजांचें स्थान कोठें आहे तें दाखवणारें महाराजांचें एक व्यवस्थित व समग्र जीवनचरित्र लिहिण्याची जरूर होतीच. हें कार्य रविशंकर महाराजांसारख्याच मागासलेल्या व अशिक्षित जमातींच्या सेवेस वाहून घेतलेल्या बबलभाईंच्या हातून झालें ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. गांधीजींच्या सौराष्ट्रांतूनच जुगतरामभाई-सारखे किंवा बबलभाईसारखे भूमिजन-सेवक आपल्याला लाभले आहेत. त्यांच्यासारख्यांच्या हातून रविशंकरसारख्या गांधीयुगाच्या आर्य प्रतिनिधींचें चरित्र लिहिलें जावें व तेंहि सौराष्ट्राचे साहित्यस्वामी श्री. मेघाणी यांच्या लिखाणापेक्षां कमी प्रतीचें वठूं नये, यामुळें कोणाला आनंद वाटणार नाहीं ? एक सेवावीर दुसऱ्या सेवावीराची जेव्हां कदर करतो तेव्हां तो भाषेच्या बाबतींत संयमशील असावयाचाच. असा संयम या चरित्रांत वाक्योवाक्यीं दिसून येतो. आणि म्हणूनच हें समग्र निवेदन समर्पक, परिणामकारी बनलेलें आहे.

येथें आणखी एक गोष्ट सांगणें जरूरीचें आहे. संभाषणचतुर रविशंकर महाराज यांच्यापासूनच माहिती मिळवून वर सांगितलेलीं चारहि पुस्तकें लिहिण्यांत आलेलीं आहेत. म्हणून चरित्रकारांना जें श्रेय आपण देतों त्यांतील अमुक अंश चरित्रनायकाच्या खातींच जमा करावा लागेल.

गांधीयुगाच्या साहित्यांत एक मोलाची भर टाकल्याबद्दल आपण बबलभाईंचें अभिनंदन करावयास पाहिजे. पाटणवाडिया जातींतील नवयुवक वल्लभविद्यालयासारख्या संस्थेंतून जेव्हां नवे संस्कार प्राप्त करतील आणि स्वतःच्या जातीवरील मध्ययुगीन कात टाकून देतील, तेव्हां त्यांच्या मनांत स्वतःच्या जातीचे उध्दारक जे श्री रविशंकर महाराज त्यांच्या विषयीं असाधारण कृतज्ञताभाव उत्पन्न होऊन ते या जीवनचरित्राची रामायण, महाभारत किंवा बायबलाइतकी कदर करतील. परंतु जगांतील इतर लोक आजपासून या पुस्तकाचें एक प्रेरणादायी ग्रंथ म्हणून स्वागत करतील.

---

## हिंदचा उगवता तारा

गेल्या कांहीं आठवड्यांत लांब अंतरावरून आपल्या या प्रिय देशाकडे पाहण्याची मला संधि लाभली. देशांतल्या देशांत राहून तेथील बदलती परिस्थिति नीट आकलन करतां येत नाहीं; परंतु बाहेर गेल्यानंतर इतर राष्ट्रांना आपला बदललेला देश कसा दिसला व दिसतो हें मला अजमावितां आलें.

त्या लांबच्या अंतरावरून क्षितिजावर बराच उंच आलेला आणि आपला शांत सोज्ज्वल प्रकाश जगावर टाकणारा असा हिंदचा उगवता तारा दिसला. जगांतील राष्ट्रें या ताऱ्याकडे सहकार्याच्या व आपुलकीच्या दृष्टीनें बघत असल्याचें मला आढळलें. जगाचा इतिहास घडविण्याच्या दृष्टीनें हिंदुस्थान किती उपयुक्त ठरेल हें आपणां सर्वांवर अवलंबून आहे.

—पं. जवाहरलाल नेहरू (घटनासमितीपुढें केलेल्या भाषणांतून, ८।११।४८)









आचार्य स. ज. भागवत

# महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य

'महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य' या पुस्तकाचा महाराष्ट्रीय वाचकांना परिचय करून देतांना* मला खरोखरच आनंद वाटत आहे. या पुस्तकाचे लेखक तरुण असून ते मूलतः कृषिशास्त्राचे आधुनिक पद्धतीनें शिकलेले पदवीधर आहेत. राजकाणांत रॉयवाद या नांवानें जो पंथ महाराष्ट्रांत ओळखला जातो त्या पंथाचा त्यांनीं आतांपर्यंत थोडाफार प्रचार केलेला आहे. तथापि त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति सांस्कृतिक विचारांच्या अभ्यासकाला अधिक अनुकूल असल्यामुळें त्यांनीं कृषिकर्म अथवा राजकारण यांच्यापेक्षां सांस्कृतिक अध्ययनांतच आपली बरीच शक्ति वेंचलेली दिसते. संस्कृतीच्या अभ्यासांतहि त्यांची एक विशिष्ट दृष्टि आहे. संस्कृतीचा अभ्यास करण्याच्या रूढ पध्दतींत तात्त्विक अथवा आध्यात्मिक दृष्टीलाच निरतिशय महत्त्व दिलेलें आढळतें. परंतु अलीकडे संस्कृतीच्या अभ्यासाची भौतिक आणि ऐतिहासिक पद्धति पुढें येऊं लागली आहे. त्यांतहि, समाजाच्या भौतिक अंगावर म्हणजेच समाजांतील आर्थिक हितसंबंधावर सांस्कृतिक विचार अवलंबून असतात, ही मार्क्स-प्रणीत दृष्टि प्रधान धरून जगांतील मानवांच्या साऱ्या हालचालींचें स्वरूप उलगडून दाखविण्याचा प्रयत्न करणारे लेखक पुढें येत आहेत. प्रस्तुत पुस्तकाचे लेखक श्री. बा. रं. सुंठणकर यांनीं आपल्या पुस्तकांत हीच दृष्टि वापरलेली आहे. यामुळें या पुस्तकांतील विवेचन बरेंच उद्बोधक झालें आहे असें मला वाटतें. स्वाभाविकच हें विवेचन कित्येक ठिकाणीं वादग्रस्तहि झालेलें आहे. यांतील सारी मीमांसा निर्विवादपणें सर्वमान्य होणार नाहीं हेंहि उघड आहे. तरी देखील या पुस्तकाचें महत्त्व कमी होत नाहीं. महाराष्ट्रांतील संतांच्या ऐतिहासिक कार्याविषयीं आतांपर्यंत अनेक विद्वानांनीं व विचारवतांनीं ज्या विविध मीमांसा प्रसिद्ध केल्या आहेत त्यांत या पुस्तकानें महत्त्वाची भर टाकली आहे असें माझें मत आहे. विरोधी विचारमंथनांतूनच सत्याचें दर्शन होत असतें म्हणून स्वतंत्र विचाराला महत्त्व देण्याची आवश्यकता आहे. या दृष्टीनेंच मला या पुस्तकाविषयीं उत्साह वाटतो.

## अन्तःप्रेरणा आणि बाह्य परिस्थिति यांच्या संघर्षांतून मानवसंस्कृतीचा उदय

संस्कृतीचा अभ्यास म्हणजे मानवजीवनाच्या विकासाचा अभ्यास होय. हा अभ्यास करितांना मानवाच्या अंतःप्रवृत्ती आणि त्याची बाह्य परिस्थिति यांचा सारखाच विचार केला पाहिजे. अंतःप्रवृत्ति आणि बाह्य परिस्थिति यांचा परस्पर संबंध काय आहे याचा उलगडा करण्याची देखील तितकीच आवश्यकता आहे. संस्कृतीच्या अभ्यासकांत जे निरनिराळे पंथ निर्माण झाले आहेत त्यांचें कारण असें दिसतें कीं, मानवाची अन्तःस्फूर्ति आणि त्याची बाह्य परिस्थिति यांतील संबंध निर्विवाद होत नाहींत; आणि यांत कांहीं आश्चर्यहि नाहीं. जीवनाच्या मूलभूत अन्तःप्रेरणा स्वयंभू किती आणि बाह्य परिस्थितीनें त्यांना वळण देण्यास घेतलेला भाग किती याचा निर्णय करणें वाटतें तितकें सोपें

* प्रस्तुत लेख हा श्री. बा. रं. सुंठणकर यांच्या 'महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य' या आगामी पुस्तकाची प्रस्तावना आहे. —का. सं.









अनुक्रमणिका

नाहीं. त्या निर्णयासाठीं तटस्थपणानें जीवनाच्या अन्तर्बाह्य अवस्थांचा सूक्ष्म व तपशीलवार इतिहास शोधावा लागेल. हा इतिहास देखील आधीं तटस्थपणानें संकलित करावा लागेल आणि नंतर त्याचें संशोधन करून कांहीं नियम हातीं लागतात कीं काय तें पाहतां येईल. जगाच्या आजच्या ज्ञानसामग्रींत आणखी पुष्कळच भर पडल्याशिवाय असे नियम निश्चितपणें आपल्या हातीं आले आहेत असें म्हणतां येणार नाहीं. इतकेंच काय पण आपली ज्ञानसामग्री आपण कितीहि वाढविली तरी भौतिक शास्त्रांप्रमाणें सामाजिक शास्त्रांचे म्हणजेच संस्कृतिविकासाचे निर्दोष व बिनचूक नियम माणसाच्या बुद्धीला आकलन करतां येतील असेंहि मला वाटत नाहीं. कारण भौतिक शास्त्रांच्या अभ्यासाची तर्काधिष्ठित व वस्तुनिष्ठ असलेली पद्धति समाजशास्त्राच्या अभ्यासांत पूर्णपणें लावतां येणें शक्य नाहीं. समाजशास्त्राच्या अभ्यासांत माणसाच्या मूळ प्रेरणांचीच चिकित्सा करण्याचा प्रसंग येतो आणि या प्रेरणा स्वयंभू आहेत कीं परप्रेरित आहेत, व्यक्तिनिष्ठ आहेत कीं समाजनिर्मित आहेत याचें उत्तर काढावयाचें असतें. म्हणून या अभ्यासांत शुद्ध वस्तुनिष्ठ वृत्ति निर्माण करणें कठिण आहे. नेहमींच या अभ्यासांत आत्मनिष्ठतेचा थोडाफार दोष मिसळलेला राहणारच अशी माझी समजूत असल्यामुळें मानवी मनाच्या भौतिक मीमांसेविषयीं माझा उत्साह उद्दाम आणि आंधळा नाहीं. यामुळेंच मार्क्सवादी इतिहासमीमांसा मी वेदवाक्याप्रमाणें मानण्यास तयार नाहीं. तथापि त्या मीमांसेपासून मी पुष्कळच शिकलों आहे हें सांगण्यास मला संकोच वाटत नाहीं. आणि माझें असेंहि मत झालें आहे कीं, आध्यात्मिक संस्काराखालीं शतकानुशतकें गुरफटून पडलेल्या भारतीय बुद्धीला मार्क्सच्या इतिहासमीमांसेपासून पुष्कळच शिकतां येण्यासारखें आहे. माणसाच्या अंतःप्रवृत्ती आणि त्याची बाह्य परिस्थिति यांचा नेहमीं संघर्ष येतो आणि त्या संघर्षांतून माणसाचीं ज्ञानें आणि त्याची व्यवहार्य ध्येयें जन्म पावतात. त्यांतूनच सामाजिक मूल्यांचा प्रादुर्भाव होतो. आणि आपण ज्याला मानवसंस्कृति म्हणून म्हणतों ती जन्म पावते. ही संस्कृति कधींच सनातन असूं शकणार नाहीं. तिच्यांत परिवर्तन होत राहणारच. हें परिवर्तन कोणत्या कारणांनीं घडतें याचा विचार केल्यास असें दिसून येतें कीं कांहीं वेळां अंतःप्रेरणांचा जोर वाढल्यामुळें बाह्य परिस्थिति गौण झाली आहे. कांहीं वेळां असेंहि दिसून येतें कीं बाह्य परिस्थितींत क्रांतिकारक बदल झाल्यामुळें अंतःप्रेरणांचें स्वरूपहि पालटून गेलें आहे. असें असल्यामुळें अंतःप्रवृत्ति आणि बाह्य परिस्थिति यांपैकीं एकाच अंगावर जोर देऊन सर्वकाळच्या सांस्कृतिक स्वरूपांचा उलगडा करूं पाहणें सत्याला धरून नाहीं. ती सांप्रदायिकता झाली, विचारांचें संप्रदाय बनले म्हणजे सत्यशोधनाची दृष्टि मंदावते अथवा नष्टहि होते; आणि सत्यापेक्षां संप्रदायच प्रधान ठरतात. मग हे संप्रदाय आध्यात्मिक असोत किंवा भौतिक असोत ! असे संप्रदाय मानवविकासाला अत्यंत विघातक ठरलेले आहेत. या दृष्टीनें पाहतां श्री. सुंठणकर यांच्या विचारांवर भौतिकवादाची छाप विशेष आहे असें दिसून येईल. आरंभींच्या दोन–तीन प्रकरणांत तर ही छाप इतकी पडलेली आहे कीं, भारतीय अथवा महाराष्ट्रीय इतिहासाचें युरोपच्या इतिहासाशीं एकरूपत्व दाखविण्याचे प्रयत्न सांप्रदायिक आग्रहांतून निर्माण झालेले दिसतात. पण लेखकालाहि या कृत्रिमतेची जाणीव झालेली दिसते. कारण पुढचें विवेचन बरेंचसें स्वाभाविक झालेलें आहे. या पुस्तकाबद्दल मला आनंद वाटण्याचें हेंहि एक कारण आहे.

## शेतीचा क्रान्तिकारक शोध व अध्यात्माचा उदय

मानवाच्या विकासांत भौतिक दृष्ट्या बोलावयाचें झालें तर आतांपर्यंत तीनच मोठ्या क्रान्त्या झाल्या आहेत. पहिली क्रान्ति मानवशरीर निर्माण करणारी क्रान्ति होय. या वेळीं पशूप्रमाणें चार पायांवर आपलें शरीर तोलून धरण्याऐवजी तें दोन पायांवर उभें करण्याचा प्रयत्न यशस्वी झाला आणि येथेंच मानवाची मूर्ति सिद्ध झाली. या शारीरिक क्रांतीचा मानवाच्या मनावरहि क्रांतिकारक परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्याचें बुद्धिसामर्थ्य आणि भावनासामर्थ्य विशेष विकसित

झालें. त्या सामर्थ्याच्या द्वारा त्याचें भौतिक जीवनहि बदललें. आणि त्याच्या मानसिक जीवनांतहि मोठें परिवर्तन घडून आलें. हा द्विपाद पशु बराचसा सुसंस्कृत झालेला आदिमानव म्हणून ओळखला जातो. या आदिमानवाची संस्कृति बहुतेक जगभर सामान्यतः सारखीच असलेली आढळते. रानटी, भटक्या, शिकारी, टोळ्यांनीं राहणाऱ्या या माणसांची जीवनपद्धति अग्नीचा आणि शेतीचा शोध लागल्यानंतर आमूलाग्र बदलून गेली. मानवजीवनांतील ही दुसरी क्रांति होय. या क्रांतीमुळें भटक्या मानव स्थिरावला आणि त्याच्या हृदयांतलि भावनांचा फार मोठ्या प्रमाणावर विकास घडून आला. जगाचा गेल्या आठदहा हजार वर्षांचा जो मानवेतिहास आपणांला सध्यां उपलब्ध झाला आहे तो या दुसऱ्या क्रांतीतील मानवजीवनाचा इतिहास होय. या साऱ्या ऐतिहासिक काळांत पृथ्वीच्या पाठीवर निरनिराळ्या ठिकाणीं मानवी समूहांची जी जीवनपद्धति निर्माण झाली त्या पद्धतींतहि सामान्यतः सारखेपणा आढळून येतो. आफ्रिकेंतील नाईल नदीच्या खोऱ्यांतील मिसरी अथवा इजिप्शियन संस्कृति, चीनमधील पिवळ्या नदीच्या खोऱ्यांतील चिनी संस्कृति, मध्यपूर्वेंतील असीरियन, बाबिलोनियन इत्यादि संस्कृती किंवा सिन्धूच्या खोऱ्यांतील वेदपूर्व संस्कृति—या पुराण्या संस्कृती किंवा त्यानंतरच्या भारतीय, ग्रीक इत्यादि प्राचीन संस्कृती अथवा ख्रिस्ती, इस्लामी इत्यादि अलीकडच्या संस्कृती—या सर्व संस्कृतींमध्यें कितीहि भेद भासले तरी स्थूल मानानें त्या सर्वांच्या बुडाशीं कांहीं ठराविक समाजदृष्टि वावरत असलेली आढळून येते. या सर्व संस्कृतींचा तुलनात्मक अभ्यास केला असतां असें दिसून येतें कीं, या सर्वांमध्यें कांहीं ठराविक प्रश्नांचा उकल करण्याची सतत धडपड चाललेली होती. त्या धडपडीचें स्वरूप देखील बहुतेक ठिकाणीं सारखेंच होतें आणि त्या प्रश्नाच्या सोडवणुकीचें यश आणि अपयश हीं देखील बहुतांशीं समानच होतीं. शेतीच्या क्रांतिकारक शोधानें मानवापुढें जे प्रश्न उपस्थित केले त्यांचें स्वरूप समजून घेण्यांत आणि ते प्रश्न सोडविण्याचे मार्ग चोखाळण्यांत या साऱ्या संस्कृतींचा काळ खर्ची पडलेला आहे. दोन पायांवर उभें राहण्याची किमया साधल्यानंतर मानवामध्यें जीवनशक्तीचा अभूतपूर्व आविर्भाव होण्याला प्रारंभ झाला. हात आणि डोळे यांच्या संयुक्त व्यापारामुळें माणसाचें ज्ञान, सामर्थ्य आणि भावना यांच्या विकासाला मोठा बहर आला. शेतीच्या शोधानंतर तर माणसाच्या या तीनहि शक्तींचा अनावर आविष्कार झाला. त्यांतहि शेतीच्या शोधामुळें मानवाच्या अंतःकरणांत प्रेमभावना इतकी उद्दामपणें उसळून आली कीं, तिला व्यवहार्य—अव्यवहार्य हा भेदहि आवर घालूं शकला नाहीं. शरीरधारणेच्या कष्टकारक उद्योगांतच पशूंची जीवनशक्ति अडकून पडलेली असते. द्विपाद मानवामध्यें ही जीवनशक्ति प्रथम उन्मुक्त झाली. तथापि अन्नासाठीं जोंपर्यंत शिकारीवर अवलंबून रहावें लागत होतें तोंपर्यंत मानवालाहि या जीवनशक्तीच्या अनंततेचें भान येऊं शकलें नाहीं. पण शेतीच्या शोधानें जेव्हां मानवाच्या अन्नाचा प्रश्न सुटला त्या वेळीं मात्र मानवांतील ही आतांपर्यंत दडपून पडलेली जीवनशक्ति उफाळून बाहेर पडली. आणि आपण आपल्या देहाइतकें मर्यादित नसून विश्वाहूनहि व्यापक आहोंत असा त्याला प्रथम साक्षात्कार झाला. या साक्षात्कारांतील आनंद आणि उन्माद हीच व्यक्तिगत जीवनाच्या दृष्टीनें प्राप्त होऊं शकणारी परमोच्च अवस्था होय असा त्याचा निर्णय झाला. हेंच मानवाचें अध्यात्म होय आणि हेंच मानवजीवनांतील अंतिम मूल्य आहे, हें आजहि सर्वमान्य होण्यास हरकत नाहीं. या आध्यात्मिक मूल्याची घोषणा आजपर्यंतच्या सर्व संस्कृतींत सतत घुमत आलेली आपणाला आढळेल.

## चातुर्वर्ण्यपद्धतीविरुद्ध संन्यासवादाचें बंड

पण दुःखाची गोष्ट अशी कीं, या मूल्याची प्राप्ति कोणत्याहि संस्कृतींतील सर्व समाजाला कधींहि झालेली नाहीं. शेतीच्या शोधाबरोबर माणूस स्थिरावला. जगण्याचा प्रश्न सोपा झाल्यामुळें त्याच्या जीवनांत सुखलोलुपताहि वाढत गेली आणि त्याचा समाज संख्येनेंहि अपार विस्तारला. भावनेच्या उत्कर्षाप्रमाणेंच ज्ञान सत्ता, संपत्ति यांच्या मागें लागण्याच्या वासनाहि वाढूं लागल्या आणि अन्नोत्पादनाचे कष्ट दुसऱ्यावर टाकून आपल्या या वासना तृप्त करून घेण्याकडे माणसांची प्रवृत्ति बळावत गेली.

यामुळें समाजांत अन्नासाठीं राबणारा व जीवनाला उपयोगी असणाऱ्या इतर वस्तू शरीरकष्टानें निर्माण करणारा असा एक मोठा वर्ग आणि त्या वर्गावर अवलंबून राहून आपले अन्नवस्त्राचे भौतिक प्रश्न सोडवून घेणारा एक अल्पसंख्य वर्ग अशी समाजाची विभागणी झाली. यालाच आपल्याकडच्या भाषेंत चातुर्वर्ण्य म्हणतात. हें चातुर्वर्ण्य जगांतील सर्व संस्कृतींत थोड्याफार फरकानें आजपर्यंत चालत आलेलें आहे. हें चातुर्वर्ण्य शूद्रांच्या गुलामगिरिवर उभारलेलें आहे ही गोष्ट मार्क्स वाचल्यानें समजते. या गुलामगिरीविरुद्ध ज्यांना ज्यांना बंड करावेंसें वाटलें त्यांनीं त्यांनीं या चातुर्वर्ण्याविरुद्ध आपला आवाज उठविलेला आहे. चातुर्वर्ण्यांत शूद्रातिशूद्रांना गुलामांचें स्थान असून त्रैवर्णिकांना प्रभुत्व दिलेलें आढळतें. आणि हा झगडा अंतीं जमिनीच्या मालकी हक्कावर उभारलेला आहे हें कबूल करावें लागतें. यामुळें आतांपर्यंतच्या संस्कृतींत गुलामगिरीविरुद्ध बंड पुकारणाऱ्या अध्यात्मवाद्यांना या मालकी हक्कांविरुद्ध बंड करावें लागलें. या बंडाचें नांव संन्यास. देहाच्या बंधनांतून बाहेर पडूं इच्छिणारा अध्यात्मवादी राज्याचा संन्यास करितो. कारण त्यांत विलास आणि हिंसा हीं भरलेलीं असतात. त्या दोनहि गोष्टी त्याच्या आध्यात्मिक प्रेरणेशीं विसंगत असल्याचें त्याला आढळून येतें. अध्यात्मवादी हा मनानें समाजवादी असतो. पण सामाजिक जीवनांतील विषमता त्याला दूर करितां येत नसल्यामुळें तो आपल्या प्रामाणिकपणाच्या रक्षणासाठीं विषम समाजसंस्थेचा त्याग करतो. विवाह हेंच समाजसंस्थेचें मूलस्वरूप आहे. विवाहांतूनच आणि विवाहासाठींच इतर सर्व अन्याय्य संस्था जन्म पावतात. अध्यात्मवादी पुरुष या विवाहसंस्थेच्या दोषमूलक जीवनाचा स्वीकार करूं इच्छीत नाहीं. वैवाहिक जीवनाचा त्याग हें संन्यासाचें मुख्य स्वरूप आहे. भौतिक सुखांच्या वासना शेवटीं समाजांत विषमता आणि दुःख निर्माण करण्यास कारणीभूत होत असल्यामुळें अध्यात्मवादी या सर्व वासनांच्या विरुद्ध होतो. विषयवासनांचा त्याग हें संन्यासाचें मुख्य तत्त्वज्ञान आहे. ज्या बाह्य विश्वानें आकृष्ट केल्यामुळें वासना उत्तेजित होतात तें बाह्य विश्वच अध्यात्मजीवनाच्या दृष्टीनें मिथ्या ठरेपर्यंत वासनांवर विजयहि मिळविणें अशक्य असल्यामुळें हें सर्व बाह्य विश्वच मिथ्या आहे आणि या विश्वांतून झालेली जीवनशक्ति आपल्याच विलासामध्यें मग्न असतांना प्राप्त होणारें आत्मसुख हीच एकमेव सद्वस्तु आहे हा संन्यासांतील शेवटचा साक्षात्कार होय. बहुजनसमाजाच्या आर्थिक दास्यावर उभारलेल्या चातुर्वर्ण्यपद्धतीविरुध्द अध्यात्मवाद्यांनीं पुरस्कारिलेलें संन्यासवादाचें बंड हें मूलतः सामाजिक विषमतेविरुध्द निर्माण झालेलें आहे. तथापि या मार्गाचा संपूर्ण आणि प्रामाणिकपणें स्वीकार करण्याची शक्ति समाजांतलि सर्व व्यक्तींना कधींच येण्यासारखी नसल्यामुळें या मार्गानें सामाजिक समता निमार्ण होऊं शकली नाहीं. इतकेंच नव्हे तर या मार्गाची भयानक विकृति देखील झाली. यामुळें शेतीचा शोध लागल्यापासून वाफेचा शोध लागेपर्यंतच्या काळांत जगांतील बहुतेक सर्व मानवसमाजांत चातुर्वर्ण्य पद्धतिचसामाजिक दृष्ट्या प्रभावी राहिली आहे. शेतकरी संस्कृतींत भावनांची वाढ मोठ्या प्रमाणांत झाली आणि पोटापाण्याचा प्रश्न बराचसा सुटल्यामुळें मानवाची बुध्दि शास्त्रें, कला, नीति, अध्यात्म इत्यादिकांच्या शोधांत रमली. परंतु वाढत्या लोकसंख्येमुळें अन्नाचा प्रश्नहि हळूंहळूं बिकट होत गेला आणि सांस्कृतिक जीवनाचीं मधुर फळें मूठभर उच्चवर्णीयांच्या हातींच पडलीं. या दीर्घ कालांत भौतिक शास्त्रांचें ज्ञान फारसें वाढलें नाहीं. उत्पादनाचा वेग वाढेल अशी शक्ति मानवाच्या हातीं आली नाहीं आणि उच्चवर्णीयांची भौतिक सोय झाल्यामुळें त्यांनीं आपल्या सर्व बुद्धिशक्तीचा व फुरसतीचा विनियोग शाब्दिक शास्त्रें निर्माण करण्यांत आणि आपलें महत्त्व टिकविण्याच्या योजना व कल्पना तयार करण्यांत केला. बहुजनसमाज अन्नासाठीं कष्टत राहिला. त्याच्या बुद्धीवर फारसे संस्कार झालेच नाहींत. अतिश्रमामुळें त्याची बुध्दि स्वाभाविकच जड होत गेली आणि त्यामुळें त्या वर्गालाहि सामाजिक सुस्थिति प्राप्त करून घेण्याची शक्ति लाभली नाहीं. मानवजीवनाच्या विकासांत शेतीच्या शोधामुळें जी दुसरी क्रान्ति झाली तिचें हें स्वरूप आहे.








आधुनिक काळी वाष्पशक्तीच्या शोधापासून मानवी इतिहासांतील तिसरी क्रान्ति सुरू झालेली आहे. या तिसऱ्या क्रान्तीच्या कोलाहलांतच सध्याचें सारें जग सांपडलें आहे. या तिसऱ्या क्रांतीचें प्रमुख स्वरूप म्हणजे भौतिक ज्ञानाचा विकास हें होय. या ज्ञानाच्या साह्यानें मानवाला भौतिक गरजांवर पुरेसा विजय मिळवून सामाजिक समतेवर आधारलेली नवी मानवसंस्कृति निर्माण करण्याची संधि लाभलेली आहे. दुसऱ्या क्रांतीच्या प्रारंभापासून मानवांत निर्माण झालेलें भावसामर्थ्य या तिसऱ्या क्रांतींतील भौतिक सामर्थ्याशीं जोडलें गेलें, तर आर्थिक शोषणांतून सर्वस्वीं मुक्त झालेली आणि अध्यात्माचीं सर्व मूल्यें समाजांतील प्रत्येक व्यक्तीला उपलब्ध करून देणारी अशी एकवर्ग समाजरचना जन्मास येऊं शकेल. या नवसमाजरचनेच्या कार्यासाठीं प्रेम आणि ज्ञान यांचीं सारखीच गरज आहे.

## वैदिकांचें जड परंपरा टिकविण्याचें धोरण

भारतीय संस्कृतीचा आतांपर्यंतचा इतिहासहि वरील विवेचनाला अपवाद नाहीं. वैदिक आर्य आपल्या वसाहती वाढवीत होते त्या वेळीं स्वाभाविकच त्यांची वृत्ति आनंदी आणि उत्साही होती. तथापि त्यांचें ज्या ज्या लोकांशीं झगडे झाले ते लोक आधींच या भूमींत स्थिर झालेले होते आणि त्यांच्यांत संन्यासमार्गाचे अनेक लोक वावरत होते. वैदिक आर्यांचीं साम्राज्यें झाल्यानंतर त्यांतील विषमतेला विटून गेलेल्या लोकांना स्वाभाविकच या वैदिकेतर संन्यासाचें आकर्षण वाटलें असलें पाहिजे. वैदिक आर्यांची विजिगीषु वृत्ति वैदिकेतर संन्यासवादाशीं झुंजत होती. त्या झुंजींत त्यांना शेवटीं पराभवच स्वीकारावा लागला. कारण वैदिक आर्यांतच संन्यासाचे विचार निर्माण झाले. वैदिक आर्यांत ब्राह्मण आणि क्षत्रिय या वर्णांनाच प्राधान्य असलेलें दिसतें. ब्राह्मणाचें महत्त्व त्याच्या यज्ञसंस्थेमुळें होतें. क्षत्रियाचें वैभव त्याच्या राज्यसंस्थेमुळें त्याला मिळालेलें होतें. या दोन्ही संस्थांनीं परस्पर सहकार्य करून आपलें उभयतांचें महत्त्व राखलें होतें. पुढें आत्मज्ञानाचा आणि संन्यासाचा महिमा वाढूं लागल्याबरोबर या वर्णांनीं देखील त्या नव्या गोष्टींचा स्वीकार केला. अशा रीतीनें वैदिक आर्यांनीं आपली संस्कृति प्रभावी केली. गौतम बुद्ध आणि महावीर यांनीं या वैदिक संस्कृतीला अतिशय जोराचा धक्का दिला. आणि वैदिक परंपरेविरुद्ध सामान्य जनतेंत फार मोठें बंड उभें केलें. या बंडाला वैश्य वर्णानें देखील मोठा पाठिंबा दिला. यानंतर कित्येक शतकें वैदिक आणि अवैदिक विचारांचें व आचारांचें सतत युद्ध चालूं राहिलें होतें. तथापि या युद्धांत पुन्हां चातुर्वण्यपद्धतीचाच विजय झाला. आणि वैदिक संस्कृतीच्या ब्राह्मण–क्षत्रियांनीं आपलें नेतृत्व हिन्दुस्थानांतील सर्व समाजाला मान्य करावयास लावलें. वैश्यांची शक्ति या देशांत कधींच वाढूं शकली नाहीं आणि शूद्रातिशूद्रांना बंड करण्याचें स्फुरण देखील झालें नाहीं. वैश्य-शूद्र दुर्बल झाल्यामुळें चातुर्वर्ण्यांतील विषमतेची पकड अधिक दृढ होत गेली. नवीन स्वतंत्र विचार संपूर्णपणें लोपला. बुद्धकाळापासून भारतीय समाजाच्या अवनतावस्थेला प्रारंभ झाल्याचें स्पष्ट दिसतें. पण त्याची जबाबदारी बुद्धावर किंवा महावीरावर ढकलण्याची आमच्या विचारवंतांची प्रथा मला मान्य नाहीं. बुद्ध आणि महावीर यांनीं निर्माण केलेले सामाजिक प्रश्न वैदिक बुद्धिमंतांना आकलन झाले नाहींत आणि सामाजिक अराजकतेला भिऊन त्यांनीं जड परंपरा टिकविण्याचे जे आंधळे प्रयत्न चालविले त्यामुळें भारतीय समाजाचा सामर्थ्यविनाश झाला असें माझें मत झालें आहे. त्या वेळची भौतिक ज्ञानाची मर्यादा लक्षांत घेतली म्हणजे चातुर्वर्ण्यपद्धति चालूं राहिली यांत कांहीं आश्चर्य नाहीं असें दिसून येईल. परंतु भौतिक ज्ञानासाठीं कित्येक शतकें युरोपांत जी पूर्वतयारी चालली होती तिचा आपल्या इतिहासांत जो अभाव दिसून येतो. तो अत्यंत आश्चर्यकारक आहे. आणि याचें कारण उघड आहे. युरोपीय लोकांत बुद्धिप्रामाण्य आणि व्यक्तिस्वातंत्र्य या दोन सिद्धान्तांची जोपासना अत्यंत कडवेपणानें बुद्धिमंतांनीं चालू ठेवली होती. हिंदुस्थानांत बुद्धकाळानंतर बुद्धिप्रामाण्याऐवजीं शब्दप्रामाण्याला—








# महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य

वेदप्रामाण्याला महत्त्व प्राप्त झालें आणि व्यक्तिस्वातंत्र्याऐवजीं सामाजिक परंपरेला श्रेष्ठत्व दिलें गेलें.

## भक्तिसंप्रदायाचें भावसामर्थ्य

बुद्धानंतर सामान्य जनतेच्या जागृतीची मोठी चळवळ म्हणजे हिन्दुस्तानभर मध्ययुगीन संतांनीं चालविलेली भक्तिमार्गाची चळवळ होय. शेतकरी संस्कृतीच्या काळांत भौतिक ज्ञानाची वाढ फारशी झालेली नसल्यामुळें जीवनशक्तीची सारी वाढ भावनेच्या दिशेनेंच झालेली आढळते. संन्यासवादाच्या बुडाशीं जसें हें भावसामर्थ्य भरून राहिलेलें आढळतें, त्याचप्रमाणें संतांच्या भक्तिसंप्रदायाच्या मुळाशीं देखील हेंच भावसामर्थ्य भरून राहिलेलें आहे. फरक एवढाच कीं संन्यासाचा मार्ग सर्वांना सुलभ नाहीं कारण तो भावनेंतून जन्मला असला तरी त्याचीं साधनें बुद्धिप्रधान आहेत. याच्या उलट भक्तिमार्ग हा संपूर्ण भावनेनेंच सिद्ध झालेला असतो. हा भेद सोडला तर सामाजिक दृष्ट्या संन्यासाप्रमाणेंच भक्ति ही देखील चातुर्वर्ण्यांतील विषमतेविरुद्ध झगडणारी प्रवृत्ति आहे. उत्तर हिन्दुस्थानांत बौद्ध आणि जैन धर्मांच्या हल्ल्यांनीं वैदिक धर्म खिळखिळा झाल्यामुळें त्याचें तेथील तेज लोपलें. त्यानंतर वैदिक संस्कृतीचा प्रभाव दक्षिणेंत वाढूं लागला. संस्कृत भाषा बुद्धकाळापासूनच पंडितांची भाषा बनून राहिली होती. बुद्ध–महावीरांनीं प्राकृत भाषेंतच आपला उपदेश केला होता. पण पुढें त्यांच्या धर्माचें साहित्यहि संस्कृतांत होऊं लागलें. यामुळें बहुजन समाजापासून ते धर्महि दूर गेले. बुद्धकाळाच्या आसपास उत्तरेंत भागवत धर्म बराच पसरलेला होता, त्यानें वैदिक विचारांशीं समन्वय साधून आपलें महत्त्व वाढविलें होतें. दक्षिणेंतहि शैव-वैष्णव मतें वाढूं लागलीं होतीं. या साऱ्या पार्श्वभूमीवर मध्ययुगीन संतांची भक्तिमार्गाची चळवळ उभारली गेली. लोकभाषेचें अधिष्ठान धरून ही चळवळ फोफावली. सांसारिक दुःखांना विटून गेलेल्या जनतेला मानसिक विसांवा देण्याचें कार्य या चळवळीनें केलें. या चळवळींतहि दोन पंथ दिसून येतात. एक संपूर्ण वेदविरोधी असलेला आढळतो. कबीर, चैतन्य, दादू इत्यादि मंडळींचा भक्तिमार्ग वैदिक परंपरेला न जुमानणारा आहे. याच्या उलट तुलसीदास, नरसी मेहता हे वैदिकपरंपरेचा आग्रह बाळगणारे होते असें दिसून येतें. महाराष्ट्रांतहि चक्रधराचा महानुभाव पंथ हा मूलतः वेदप्रामाण्य न मानणारा व चातुर्वर्ण्यांतील आचारधर्म न जुमानणारा भक्तिसंप्रदाय होय. यांत संन्यासाला महत्त्व होतें ही गोष्ट देखील लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पण वारकरी संप्रदायांतील संत हे वेदविरोधी नव्हते. आणि त्यांनीं चातुर्वर्ण्यांतील आचारधर्महि कधीं अव्हेरिले नाहींत. फक्त मुक्तीचा मार्ग नामस्मरणाच्या द्वारा आचांडाळ सर्व समाजाला त्यांनीं मोकळा केला आणि संन्यासाचा आग्रह धरला नाहीं.

प्रस्तुत पुस्तकांत महाराष्ट्रांतील ज्या संतांच्या ऐतिहासिक कार्याचें समालोचन करण्यांत आलें आहे, तें प्राधान्येंकरून वारकरी पंथाचें आहे. रामदासांचें कार्य या संतांच्या कार्याला मारक झालेलें आहे असा विवेचनाचा निष्कर्ष आहे. वारकरी संतांनीं महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाचें मन सुसंस्कृत केलें आणि त्याची संघटना करून उच्चवर्णीयांच्या सांस्कृतिक दास्यांतून त्या समाजाची मुक्तता केली हा पुस्तकाचा मुख्य सिद्धांत आहे. मात्र या चळवळींतून जें महाराष्ट्राचें राज्य निर्माण झालें तें शेवटीं उच्चवर्णीयांनीं आपल्या हितसंबंधासाठीं राबविलें आणि त्यामुळें बहुजनसमाजाला पुन्हां दास्यांतच खितपत पडावें लागलें. या आपत्तींतून बाहेर पडण्याचें सामर्थ्य वारकरी संतांच्या चळवळींतून निर्माण होऊं शकलें नाहीं हें देखील या पुस्तकांत शेवटीं कबूल केलेलें आहे. याचा अर्थ महाराष्ट्रांत मराठेशाहीच्या अंतापर्यंत चातुर्वर्ण्यपद्धतीचेंच वर्चस्व टिकून राहिलें असा होतो. हा महाराष्ट्राच्याच नव्हे पण साऱ्या भारतीय संस्कृतीच्या इतिहासाचा निष्कर्ष आहे.

## संतांचें समाजशास्त्र शंकराचार्यांच्यापेक्षां अधिक पुरोगामी

जीवनविकासाला भौतिक परिस्थितीची अनुकूलता आवश्यक असली, तरी अन्तःप्रेरणा प्रभावी असल्याशिवाय जीवनविकास सिद्ध होत नाहीं. पशूंतून मानवांत झालेला विकास हा देखील अंतर्गत चैतन्यशक्तीच्या अखंड क्रियाशीलतेचाच परिणाम समजला पाहिजे. नवदर्शन निर्माण झाल्यानंतर

त्याला उपयुक्त असा नवदेहहि तयार होणें शक्य होतें. पण दर्शनाचाच अभाव असेल तर देहाची निर्मिति अशक्यच होईल. शिकारी मानवांतून शेतकरी मानवाची निर्मिति झाली. त्यापूर्वी देखील अशा एका नवदर्शनाची निर्मिति झाली असली पाहिजे. शेतकरी अवस्थेंतून जेव्हां संन्यासवादी अध्यात्माची निर्मिति झाली त्या वेळीं त्या अध्यात्म-दर्शनाला नवा समाजदेह मिळवून देण्याची धडपड निर्माण व्हावी हें अगदीं क्रमप्राप्तच होतें. बौद्ध–जैनांच्या यज्ञविरोधी संन्यासदर्शनाला वैदिकांनीं आपल्या परंपरेंत सामावून घेतल्यानंतर त्या दर्शनाला अनुरूप असा नवा समाजदेह निर्माण करण्याचा प्रयत्न वैदिक परंपरेंतील ब्राह्मण करूं शकले नाहींत. उलट सामाजिक बंधनें त्यांनीं पूर्वीपेक्षांहि अधिक कडक केलीं. पूर्वीं वर्णांतराची सर्रहा चालू असलेली प्रथा बंद करून जातिसंस्था रूढ केली. पुनर्विवाह, मिश्रविवाह अधर्म्य ठरविले. सहभोजनादि अन्नव्यवहार आणि परदेशगमन यांना बंदी केली आणि अध्यात्मविद्येचा अधिकारहि वैदिकांपुरता मर्यादित केला. वेदाचा अधिकार पूर्वी निदान त्रैवर्णिकांना तरी होता; आतां क्षत्रिय, वैश्य आणि ब्राह्मण स्त्रिया यांनाहि तो उरला नाहीं; कारण ते वर्ग संस्कारभ्रष्ट होत गेले. केवळ श्रोत्रिय ब्राह्मणांनाच ब्रह्मविद्येचा अधिकार राहिला. आद्य शंकराचार्यांच्या सुमारास जो नववैदिक धर्म हिंदुस्थानांत निर्माण झाला त्याचें असें भ्रष्ट स्वरूप झालें होतें. पाश्चात्य ग्रंथकार याला ब्राह्मणिझम् म्हणतात. त्यांत कांहीं चूक आहे असें मला वाटत नाहीं. आद्य शंकराचार्यांचें अद्वैताचें तत्त्वज्ञान कितीहि क्रांतिकारक असलें तरी त्यांचें समाजशास्त्र संपूर्णपणें प्रतिगामी होतें यांत शंका नाहीं. कारण ब्रह्म ही औपनिषद वस्तु असल्यामुळें वेदाचा अधिकार नसलेल्या कोणाहि माणसाला त्याची प्राप्ति होणें शक्य नाहीं हें त्यांचें मत प्रसिद्धच आहे. व्यवहारांत ब्राह्मणालाच संन्यासाचा अधिकार म्हणजे मोक्षाचा अधिकार अशी शंकराचार्यांची भूमिका ठरते. ही भूमिका अवैदिकांच्या भूमिकेशीं तुलून पाहिली असतां संकुचित आणि अहंकारी आहे हें कबूल केलें पाहिजे. वैदिक समाजशास्त्राचा आणि आध्यात्मिक मुक्तीचा शंकराचार्यांनीं जोडून दिलेला हा संबंध नंतरच्या सर्व भारतीय संतांनीं तोडून टाकला ही गोष्ट भारतीय समाजशास्त्राच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाची आहे. या संतांनीं मुक्तीसाठीं वेदाधिकाराची आवश्यकता ठेवली नाहीं. नामस्मरणानें चित्तशुद्धि होते व चित्तशुद्धि झाल्यानें आत्मज्ञानाची प्राप्ति होते. हीच मोक्षावस्था होय असें संतांचें सांगणें असें. वैदिक कर्मांच्या जागीं नामस्मरणाची स्थापना हा संतांचा क्रान्तिकारक शोध होय. मात्र तो नाममंत्र मुक्त झालेल्या संतांकडूनच घेतला असतां साधकाला चित्तशुद्धिकारक होतो असें संतांनीं ठरविलें. यामुळें वैदिक मार्गांतील ब्राह्मणाचें महत्त्व या संतमार्गांत गुरूला प्राप्त झालें. तथापि हा गुरु जातिदृष्ट्या पारखावयाचा नसून आत्मानुभवदृष्ट्या पारखावयाचा असल्यामुळें संतांच्या गुरुपूजेंत जातिभावनेला स्थान नाहीं. या दृष्टीनें संतांचा साधनमार्ग हा शंकराचार्यांच्याच साधनमार्गापेक्षां अधिक लोकशाही स्वरूपाचा म्हणावा लागतो. आणि याच अर्थानें संतांचें समाजशास्त्र शंकराचार्यांच्या समाजशास्त्रापेक्षां अधिक पुरोगामी ठरतें.

## चातुर्वर्ण्याच्या समाजशास्त्राची मगरमिठी

परंतु हें पुरोगामित्व अध्यात्ममार्गापुरतेंच मर्यादित झालेलें आढळतें. इतर सामाजिक बाबतींत तें प्रतिगामीच राहिलें. याचें कारण या संतांना सामाजिक क्रांतीची दृष्टिच नव्हती. ते फक्त आध्यात्मिक विचारांतच रंगलेले होते. आणि यामुळें चातुर्वर्ण्याच्या भ्रष्ट आवृत्तीलाच त्यांचा न कळत पाठिंबा मिळाला. या पाठिंब्याच्या जोरावर सामाजिक विषमता तशीच जाव धरून राहिली आणि मराठ्यांचें राज्य निर्माण झाल्याबरोबर चातुर्वर्ण्याच्या समाजशास्त्राप्रमाणें तें प्रथम ब्राह्मण–क्षत्रियांच्याच गौरवाला कारणीभूत झालें. या गौरवामुळें त्यांचें वर्चस्व वाढलें. महाराष्ट्रांत शिवाजीनंतर प्रभावी क्षत्रियवर्गाहि पुढें न आल्यामुळें ती राज्यसत्ता देखील महाराष्ट्रांतील कर्तबगार ब्राह्मणांच्याच हातीं गेली आणि ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व वज्रलेप झालें. संतांनीं केलेली पारमार्थिक विचारांतील क्रांति सामाजिक








क्रांतींत परिणत न झाल्यामुळें महाराष्ट्राचा सर्वांगीण विकास होऊं शकला नाहीं.

महाराष्ट्रांत बौद्ध, जैन, लिंगायत, महानुभाव इत्यादि अवैदिक पंथांनीं चालविलेला प्रचार यशस्वी झाला नाहीं याचें कारणहि समाजांतील प्रमुख घटकांवर चातुर्वर्ण्याच्या समाजशास्त्राची बौद्धिक पकड होती हेंच आहे. वारकरी संतांनीं संन्यासमार्ग सोडला व भक्तिमार्गाचा प्रचार केला ही गोष्ट खरी. पण भक्तिमार्गाचा प्रसार करतांना जातिबंधनाचे पाश तोडण्याची अवश्यकता त्यांना भासली नाहीं, ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे. अवैदिकांचा संन्यास हा या दृष्टीनें अधिक पुरोगामी आणि क्रांतिकारक होता असें माझें मत आहे. हें क्रांतिकारकत्व वारकरी संतांना उमगलें नाहीं. शंकराचार्यांना ज्याप्रमाणें अद्वैता-साठीं सामाजिक नवदेह निर्माण करण्याची आवश्य-कता भासली नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरांनाहि भक्ति-सुखाच्या आस्वादासाठीं नवा सामाजिक देह तयार केला पाहिजे याची जाणीव झाली नाहीं. ज्ञानेश्वरांचा समाजशास्त्रांतील हा कच्चेपणाच समजला पाहिजे. शंकराचार्यांचा नवा ब्राह्मणधर्म आणि ज्ञानेश्वरादि-कांचा नवा भक्तिपंथ हे दोन्हीहि मार्ग नव्या समाज-शास्त्राला जन्म देऊं शकले नाहींत ही गोष्ट मोकळे-पणानें कबूल केली पाहिजे. वारकरी संप्रदायाबद्दल राजवाड्यांनीं जे कठोर उद्‌गार काढले आहेत ते एका अर्थानें बरोबर आहेत असेंच म्हणावें लागतें. लोकमान्य टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत भक्ति-मार्गी संतांना शंकराचार्यांच्या संन्यासमार्गांतच गोंवलें आहे तें देखील सामाजिक कर्मयोगाच्या दृष्टीनें बरोबर आहे, असेंच दिसून येईल. राजवाड्यांनीं संतांच्या पारमार्थिक कार्यासंबंधीं गौरवाचे उद्‌गार काढलेलेच आहेत.

## रामदासांचा उत्कट चातुर्वर्ण्याभिमान

महाराष्ट्राच्या संस्कृतिविकासांत रामदासांचें कार्य काय ? हा एक विवाद्य प्रश्न बनून राहिला आहे. पारमार्थिक दृष्ट्या रामदासांच्या शिकवणींत वारकरी संतांच्या आणि रामदासांच्या शिकवणींत विशेष भेद नाहीं. जो भेद आहे तो सामाजिक दृष्टींत आहे. रामदास हे शंकराचा-र्यांनीं पुरस्कारिलेल्या नवब्राह्मणधर्माचे महाराष्ट्रांतील प्रखर पुरस्कर्ते होते. वैदिक परंपरेबद्दल त्यांचा आग्रह विशेष प्रकारचा आहे. चातुर्वर्ण्यांतील आचार-विचारांचें पालन करण्यांत ते अत्यंत दक्ष होते. चातुर्वर्ण्य-व्यवस्थेमागील समाजदर्शन त्यांनीं आदर्श म्हणून मान्य केलें होतें या आदर्शाची महाराष्ट्रांत प्रस्थापना करणें हें त्यांनीं आपलें जीवितकार्य मानलें होतें. त्यासाठीं सर्व प्रकारची संघटना करण्याचें कार्य त्यांनीं हातीं घेतलें. त्यासाठीं प्रथम आदर्श ब्राह्मण निर्माण केले पाहिजेत असें त्यांनीं ठरविलें. त्यांचा दासबोध यासाठींच निर्माण झाला आहे. त्यांच्या मठांतील कडक शिस्त यासाठींच योजि-लेली होती. अशा आदर्श ब्राह्मणांनीं आदर्श क्षत्रियांशीं सहकार्य करून महाराष्ट्रांत बुडालेला महाराष्ट्रधर्म पुन्हां प्रस्थापित करावा हें त्यांचें महान् स्वप्न होतें. वारकरी संतांपेक्षां रामदासांचें हें वैशिष्ट्य स्पष्ट दिसणारें आहे. आणखी एका बाबतींत राम-दासांचें वेगळेपण स्पष्ट केलें पाहिजे. रामदास संत होते, म्हणजे नामस्मरणानें मुक्ति मिळते हें तत्त्व मान्य करणारे होते हें खरें; पण संत असूनहि ते उत्कट चातुर्वर्ण्याभिमानी होते. यामुळें त्यांनीं ' गुरु तो सकळांसि ब्राह्मण ' या तत्त्वाचा आग्रह धरला होता. आणि ब्राह्मणानें नीच जातीचा गुरु करतां कामा नये असा त्यांचा कटाक्ष होता. यामुळें संतांच्या पारमार्थिक जीवनांतहि जातिबंधनांना जें गौणत्व लाभलेलें होतें ते रामदासांच्या पारमार्थिक जीवनांतहि सांपडत नाहीं. त्यांतहि ब्राह्मण–जातीचा गौरव आढळतो. गुणांचें ब्राह्मणत्व आणि जातीचें ब्राह्मणत्व यांचा रामदासांत अभेद मानलेला आहे. यांचा सामाजिक परिणाम प्रतिगामी होणें अपरिहार्य आहे. व तसा तो महाराष्ट्रांत झालेला आहे. प्रस्तुत पुस्तकांत रामदासांच्या कार्याचें मूल्यमापन करतांना रामदासांना थोडा अन्याय झाला आहे. रामदास ब्राह्मणांचें राज्य करूं पहात होते असें म्हणतां येणार नाहीं. वैयक्तिक स्वार्थ रामदासांच्या शिकवणुकींत नाहीं. तथापि त्यांचा चातुर्वर्ण्याच्या आदर्शावरील विश्वास हा कितीहि प्रामाणिक असला, तरी त्याचे सामाजिक दुष्परिणाम त्यांना दिसूं शकले नाहींत. यामुळें त्यांच्या आदर्श कल्पना त्यांच्या ग्रंथांत व त्यांच्या डोक्यांतच राहिल्या. व्यावहारिक दृष्ट्या त्या कल्प-



अनुक्रमणिका






नांचा परिणाम सामाजिक विषमता दृढावण्यांतच झाला असें म्हणावें लागेल. वारकरी संतांचा आणि रामदासांचा चातुर्वर्ण्यावर सारखाच विश्वास असल्यामुळें तत्त्वतः दोघांचें समाजशास्त्र एकच होतें. पण संतांच्या काळीं महाराष्ट्र राजकीय दृष्ट्या परतंत्र झाला होता आणि रामदासांच्या वेळीं महाराष्ट्राचें स्वतंत्र राज्य उदय पावलें होतें. या फरकामुळें आणि कांहीं अंशीं प्रकृतिगत भेदांमुळें संतांच्या व रामदासांच्या उपदेशांत वेगवेगळ्या गोष्टींवर कमी-अधिक भर दिलेला आढळतो. ज्ञानेश्वर हे रामदासांच्या काळीं असते, तर त्यांनीं रामदासांपेक्षां अधिक क्रांतिकारक उपदेश केला असता असें मला वाटत नाहीं. ज्ञानेश्वर-एकनाथांत सुप्त असलेलें ब्राह्मणगौरव रामदासांत प्रकट झालें येवढेंच.

## सामाजिक समता हें प्रधान मूल्य

आत्मसाक्षात्कार आणि सामाजिक समता यांचा परस्पर संबंध काय आहे हा एक अत्यंत विचारणीय प्रश्न आहे. आत्मसाक्षात्कारी पुरुष करील ती नीति आणि सांगेल तो धर्म अशी एक अध्यात्मवादी विचारकांची दृढ श्रद्धा आहे. आत्मसाक्षात्कारी लोकांच्या जीवनाचा तुलनात्मक अभ्यास केल्यानंतर ही श्रद्धा काल्पनिक आहे असा माझा निर्णय झाला आहे. आत्मसाक्षात्कारी पुरुष व्यक्तिशः निरहंकारी आणि निर्मम झालेले आढळतात यांत शंका नाहीं. परंतु सामाजिक बाबतींत सर्वांचे विचार सारखेच असत नाहींत. त्याबाबतींत त्यांची बुद्धि पूर्वसंस्कारानुसारच काम करीत राहते. अथवा त्यांची विशिष्ट प्रकृति आत्मसाक्षात्कारानंतरहि फारशी बदललेली आढळत नाहीं. आणि म्हणूनच आत्मसाक्षात्कारी मंडळींत परस्परविरोधी सामाजशास्त्रांचे पुरस्कर्ते आढळून येतात. यामुळें आत्मसाक्षात्कार हें जीवनाचें एकमेव मूल्य मानणें धोक्याचें होईल. आत्मसाक्षात्काराबरोबरच सामाजिक समतेची तळमळ हें देखील जीवनाचें मूल्य म्हणून स्वतंत्रपणें मान्य करण्यात आलें पाहिजे असें माझें मत झालें आहे हीं दोनहि मूल्यें सारखीच महत्त्वाचीं मानल्याशिवाय विचारांतील गोंधळ नाहींसा होणार नाहीं. माझें स्वतःचें मत तर असें झालें आहे कीं, सामाजिक विकासाच्या दृष्टीनें समता हें प्रधान मूल्य समजलें पाहिजे. या मूल्याची आराधना करीत असतांना जेव्हां आत्मसाक्षात्कार होईल त्या वेळीं तो व्यक्तीला आणि समाजाला एकाच वेळीं कृतार्थ करूं शकेल.

---

गांधीजींच्या नेतृत्वाखालीं बनलेला गेल्या तीस वर्षांचा इतिहास अत्यंत नाट्यपूर्ण असा आहे. स्वतः गांधीजींमध्यें नाट्याचें सारसर्वस्व संक्षेपानें केंद्रित झालें होतें. जसें त्यांचें जीवन संयमानें, कलामयतेनें आणि काव्यसौंदर्यानें नटलेलें होतें, तसेंच त्यांचें मरणहि.

—पं. जवाहरलाल नेहरू (लंडन २२-१०-१९४८)

प्रा. द. रा. वेंद्रे

# साहित्यिकाचें तत्त्वज्ञान

साहित्यिकाला तत्त्वज्ञान असतें काय ? असलेंच पाहिजे कां ? नसल्यास साहित्यास कमीपणा येईल काय ? अतात्त्विक साहित्य म्हणजे तरी काय ? आणि साहित्यांत तत्त्वज्ञान असल्यास तें त्याला अधीन ठेवितें कीं, तें त्याला अधीन असतें ? किंवा असा कांहीं प्रकार नसून हे दोन्ही शिवशक्तीप्रमाणें द्वैतांत अद्वैत साधतात ? हें सृष्टितत्त्व आहे तरी काय ?—हे आणि असलेच कांहीं प्रश्न साहित्य-तत्त्वविचार करीत असतांना उद्भूत झाल्याशिवाय रहात नाहींत. आणि त्याला उत्तर देण्याची टाळा-टाळी करण्यांत अर्थ नाहीं आणि तें अवश्यहि नाहीं.

## तत्त्वज्ञान हें साहित्याचें संजीवन

पहिली गोष्ट ही कीं, साहित्यांतलें तत्त्वज्ञान हें त्याचें अंगभूत असतें. तें साहित्याला पशु मानून आपलें पशुपातित्व गाजवीत नाहीं. असें न झाल्यास हा पशु-पशुपातित्वाचा पाश साहित्यास गळफांसहि होऊं शकतो. आणि हा गळफांस चुकविण्याच्या गडबडींत साहित्य मतधर्माची अथवा राजनीतीची बटीक बनते. आणि हें साहित्याचें चारित्र्य त्याच्या आत्महत्येहून खडतर असतें. तें साहित्याला ताप-दायक होतें. आणि हा ताप जर साहित्यास तपा प्रमाणें फलदायक करतां आला नाहीं तर साहित्य रोगिष्ट बनतें—मरतुकडें बनतें. आणि या धक्क्याच्या मामल्यांत तें मरूनहि जातें. परंतु हें मेलेलें मढें जिवंतपणावर मात करण्याकरितां ' ममी '-(Mummy)च्या वेशांत थाटून पितरांच्या ऐटींत मिरवूं पहातें. साहित्याची ही दुर्दशा व्हावयाची नसल्यास त्यानें आपल्या अंतर्गत संजीवनानें आपल्याला नवीन तर केलें पाहिजेच; एवढेंच नव्हे तर आपल्या रूपनावीन्याहूनहि वरचढ असा आत्माविष्कारहि केला पाहिजे.

## साहित्य विश्वोत्पत्तीइतकें अजब

साहित्य शब्दानें जड आहे पण अर्थानें अमर आहे. आणि साहित्यांतील शब्दार्थांची ही जोडी आपल्या दांपत्याच्या समरसतेनें नित्य नवी अशी सृष्टि निर्माण करते. पण जसें दांपत्यजीवनाचें सामरस्य लग्नासारख्या शरीरसंबंधांतहि गृहीत धरलें जाऊन जीवन जुलमाचा रामराम बनतें, आणि कामाच्या होळींत प्रेमाचीहि राख होते, त्याप्रमाणें शब्दजनित विकल्प आणि वितर्क यांनीं विचारांत प्रलय माजतो, आणि अर्थाचा अनर्थ होऊन शब्दा-च्या जाळ्यांत व्यर्थ वाऱ्याशिवाय कांहींच दुसरें सांपडत नाहीं !

पण साहित्यिक शब्द जातिवंत सामरस्यांतून निष्पन्न झालेला असतो. अर्थ म्हणजेच शब्द. शब्द म्हणजेच अर्थ. कुत्रा म्हणजे क्, उ, त्, र, व आ या स्वरव्यंजनांचा संघात नसून तो आपल्या ज्ञान-चक्षूंसमोर कुत्रा या शब्दांत गर्भित असलेल्या अर्थाची आकृति वा चित्र उभें करूं शकतो. कोणी म्हणतील, हें मराठी भाषेचें रूढिसामर्थ्य आहे. कारण कांहीं असो; अशा अर्थसंपन्न शब्दांनींच भरलेल्या कोण-त्याहि भाषेंत हें नांवरूपांचें जोडपें आपलें भाव-साम्राज्य प्रस्थापित करूं शकतें. या साध्या तत्त्वांतहि पुष्कळच ज्ञान भरलें आहे. शब्द नांवागणिक कृतिआकृतींचे तरंग उठवीत चित्तांत भावमंथन करूं शकतो, ही साधी घटना विश्वोत्पत्तीइतकीच अजब आहे. आपल्या ज्ञानेंद्रियांवर क्षणोक्षणीं येऊन आद-ळणारीं अनंत रूपें शब्दाच्या शून्यांतून सूक्ष्म देह निर्माण करून घेऊन, आपल्या भावनेच्या प्रांतांत शिरून शब्दगतीच्या छंदाबरोबर चित्ताच्या आनंदा-पर्यंत जाऊं शकतात. हा त्यांचा व्याप पाहिल्यास विश्वांतील ही अणुघटना कोणत्याहि महत्त्वाच्या घट-

नेहून आपल्या अंतःसारांत यत्किंचित् कमी नाहीं असें दिसून येतें. सिंधूच्या बिंदूंत अल्लोल–कल्लोल दिसणें अवश्य असल्यास आपली दृष्टिहि सूक्ष्मदर्शक बनली पाहिजे. त्याचप्रमाणें साहित्यांतील मात्रांच्या लघुगुरूंच्या गतींतील स्वरितोदात्तांच्या चलनवलनांतील संवेदनांचें सुख भोगण्यास हृदय संस्कारसंपन्न असावें लागतें. तेव्हां त्याच्या लक्षांत येतें कीं, शब्दांतून भावना प्रगट होते, त्याप्रमाणें भावनेंतून शब्द प्रगट होतात. अदृश्य जगांतून, वैज्ञानिकाच्या शास्त्रीय तराजूहून अत्यंत सूक्ष्म अशा बिनतारी यंत्रावरून सदैव संदेश चालूच असतात; त्यांतील कांहीं एकेकांच्या हृदयकेंद्राकडे आकर्षित होऊन त्या स्पर्शांच्या चटक्यांत उत्पन्न झालेल्या विजेंत चित्रांची सृष्टि निर्माण होते, आणि ती आपल्या जिवाला झोंबून मुक्या बोलांतूनच रंजवूं लागते. या रंजनांतूनच भावार्थसंपन्न, रूपवान् आणि नृत्यशील असे शब्द येतात आणि अशा वेळीं आलेल्या उद्गाराला आपण काव्य म्हणतों.

### शब्दार्थ हे 'क्रौंचमिथुन'

श्रीवाल्मीकि कवीला अशाच एका बाह्योद्दीपित धक्क्यानें आपल्या एका अंतर्गत अनादि भावाचा स्फोट करावा लागला. क्रौंचवधाची ही घटना एका अर्थी अत्यंत सामान्य होय. आजहि हजारों लोक मोहांत असलेल्या प्राण्यांची शिकार करतात व आपली अत्यंत साधी भूक भागवितात. परंतु साहित्यिक मनाला ही साधी घटना विश्वप्रळयाची प्रतीक बनते. विश्वाची उभारणी करूं पाहणाऱ्या भावाचा संदेश ती घटना त्याच मनांतून प्रकट करविते. क्षणभर आपण अशी कल्पना करूं कीं, हें क्रौंच-मिथुन शब्दार्थ-मिथुनच आहेत. आणि त्यांच्यांतील एकमेकांकडील स्वाभाविक ओढ जो भाव ध्वनित करते तो तर विश्वोत्पत्तीच्या ऊर्मीचा उगमच आहे. हा स्पर्श ज्या हृदयाला होऊं शकतो, तें हृदय विषयनिरपेक्ष आनंदाचें प्रतीक बनतें आणि सृष्टीच्या आनंदाला सहकारी होतें. याउलट कांहीं बेरड मनें अशींहि असूं शकतात कीं, त्यांच्या विषयसापेक्ष प्रयोजक दृष्टीला शब्दार्थांचें हें परस्पर गोंजारणें वेगळ्याच अर्थानें उपयुक्त वाटून त्यांना एकमेकांपासून झोडून फोडून वेगळें करण्यांत दिक्कत तर वाटतच नाहीं, उलट आपल्या या शिकारीच्या शिताफीबद्दल स्वाभाविक धन्यता वाटते. ही वृत्ति साहित्यांतील सह-भावनेच्याच नव्हे, तर कोणत्याहि सह-जीवनाच्या भावनेस संहारक आहे. हृदयाचें काव्य न्यायाच्या तर्कटांत शिरून बुद्धीच्या रणसंग्रामांत हृदयाचा चूर होऊं शकतो तो असा! कवि कालिदासाला वागर्थांत पार्वती–परमेश्वर दिसले. आपल्याला वरील उदाहरणाप्रमाणें शब्दार्थ हेहि एक क्रौंच-मिथुनच आहे असें दिसेल.

### ईश्वराचाहि ईश्वर !

राम-सीता या दांपत्याचा बिघाड करून जो रावण आपली अनिर्बंध विषयवासना तृप्त करूं पहात आहे त्यांत श्रीवाल्मीकीच्या आर्ष दृष्टीला विश्वसंहाराचें बीज दिसलें व तसल्या संहारकाचा संहार करणारा राम धर्मप्रतिष्ठापनेचा अवतार वाटतो. आपण शब्दार्थ-दांपत्याचें बीजरहस्य ओळखूं, तर शब्दाचा मंत्र बनेल आणि अर्थ केवळ मानसिक आकृति न राहतां सृष्टिरूप होईल; आणि अशा मंत्रवाणींतूनच नवी सृष्टि निर्माण होते. म्हणून तर श्रीसमर्थ रामदास म्हणूं शकतात—

जे अनंत ब्रह्मांडें घडी। लीलाविनोदेंचि मोडी।
आपण आदिपुरुषीं दडी। मारूनि राहे ॥
जे लावण्यस्वरूपाची शोभा। जे परब्रह्मसूर्याची प्रभा।
जे शब्दीं वदोनी उभा। संसार नाशी ॥
जे ब्रह्मादिकांची जननी। हरिहर जेपासुनी।
सृष्टिरचना लोक तिन्ही। विस्तार जयेचा ॥
जे योगियांचे ध्यानीं। जे साधकाचे चिंतनीं।
जे सिद्धांचें अंतःकरणीं। समाधिरूपें ॥
नाना विद्या–कला–सिद्धि। नाना विश्व यांची बुद्धि।
जे सूक्ष्म वस्तूची शुद्धि। ज्ञप्ति मात्र ॥

असें सांगून श्रीरामदास शेवटीं सांगण्यास विसरत नाहींत—

या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती ॥

ती शब्द–शक्ति सरस्वती ही ईश्वराचाहि ईश्वर आहे म्हणे !

---








# क व न

बाऱ्याची लहरि खुले
त्यांतचि नवदृष्टि फुले
त्या स्पर्शें हृदय भुले
हो, हो, आकाश झुले !
डोळ्यांनीं रंगविलें
श्वासांनीं नृत्य दिलें,
नांवाला जणुं नटलें,
—काव्य जाहलें !

त्याचे ते वज्रबोल
रुक्ष हृदीं रुतति खोल
निंद्य जीभ जाळुनि
फोला हुसकावुनी
दुःखावरि नाचतें—
दर्पित शिर ठेंचतें !

—गोल दृष्टी माप तें,
स्वर्ग-नरका व्यापतें !
आंतड्याशीं बोलते
सौख्य-साथें डोलते
सुप्त सुमनीं गुंगते
प्रेम-प्रेमीं रंगते !
जीव मोहळ तुंबलें,
काव्य गीतीं डुंबलें !

गीतलहरी उधळती
तारकाही खिदळती !
भूवरीं ऋतु खेळला
सूर्य चन्द्रा भाळला !
जीव जीवें भारला
रसगुणें तो हारला;
सर्व ओतप्रोत ती
एकमेकीं ओतती !

— द. रा. बेन्द्रे

—•—

## कलांचें स्वरूप

मी तरी जीवनाप्रमाणें कलाहि आनंदांत उगम पावून आनंदानें विस्तारून आनंदांतच विलीन होणाऱ्या चिजा आहेत असें समजतों. आणि या दोन्ही प्रान्तांत जे कांहीं तरंगत येणारे सुख-दुःखांचे ढग असतील ते देवसत्राला आडव्या येणाऱ्या राक्षसी छायेप्रमाणें आपल्या तात्पुरत्या विरोधानें सत्राचीच महती वाढवून डोळ्याआड होतात, अशा कल्पनेनें आणि दृष्टीनें मी कलासमुदायाकडे पहातों... कलांची सामग्री आणि सुप्त शक्ति, त्यांचा अभ्यास आणि सिद्धि, त्यांची नियोजना या सर्वांतून अनुस्यूतपणें दिसणारी कलात्मक दृष्टि ही जीवनाला रूप देऊन सजविणारी विश्वमायाच आहे.

—प्रा. द. रा. बेन्द्रे, मुंबई मराठी साहित्यसंघासमोरील भाषणांतून (२४-७-४८)

श्री. ह. कृ. मोहनी

# कॉंग्रेसची अध्यक्षीय निवडणूक

## त्रिपुरी कॉंग्रेसच्या वेळीं

ऑक्टोबर महिन्याच्या अखेर कॉंग्रेससंस्थेच्या अध्यक्षपदासाठीं जी निवडणूक झाली तीं कॉंग्रेस-संस्थेच्या भवितव्याच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे. गेलीं कित्येक वर्षें क्वचितच एकाद्या वेळीं कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं निवडणूक लढविली गेली आहे. त्रिपुरी कॉंग्रेसच्या वेळीं कै. श्रीसुभाषचंद्र बोस व श्री. पट्टाभि सीतारामय्या ह्यांमध्यें निवडणुकीनें अध्यक्षपद ठरविलें गेलें असलें, तरी त्या वेळीं कॉंग्रेस-च्या पुढील राजकीय धोरणाबद्दलचा प्रश्न गंभीर स्वरूपाचा होता, असें मानण्यास जागा होती. प्रांतिक स्वायत्तता मिळाल्यानंतर मध्यवर्ती सत्तेसाठीं किंवा स्वराज्यासाठीं तावडतोब लढा द्यावा कीं, राजकारणाचें गाडें आस्ते कदम चालवून लढ्यासाठीं अनुकूल संधीची वाट पहात बसावें असा त्या वेळीं प्रश्न उत्पन्न झाला होता. श्रीसुभाषचंद्र लढा देण्यास उत्सुक असले, तर वर्किंग कमिटीचे इतर गांधीमतानुयायी सदस्य गांधीजींच्या एकमेव व्यक्तिमत्तेवर निर्भर राहून राजकारण चालवणारे होते. ह्यामुळें श्रीसुभाष बोस यांचें राजकीय धोरण कॉंग्रेसमध्यें प्रभावी व्हावयाचें, कीं महात्मा-जींच्या आज्ञेनुसार कॉंग्रेसची नौका हाकारावयाची असा पेंच राजकीय पुढाऱ्यांमध्यें निर्माण झालेला होता. त्या वेळीं राजकारणाचा हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा होता, आणि पुढील दहा वर्षांच्या राजकारणी घटनांमुळें, आपल्या देशांतील व पर-देशांतील लष्करी घडामोडी अनुभवल्यानंतर हा सामान्य व उपेक्षणीय प्रश्न होता असें आतां कोणी म्हणूं शकणार नाहीं.

दहा वर्षांपूर्वीच्या राजकारणाची ज्यांना आठवण आहे त्यांस हेंहि स्मरत असेल कीं, गांधी–सेवा–संघ ही हिंदुस्थानव्यापी संघटना देखील 'सुभाष बोस विरुद्ध पट्टाभि सीतारामय्या' ह्या राजकारणांतील पक्षभेदामुळें बहुतांशीं अंतर्धान पावली. गांधी–सेवा-संघ हा विधायक कार्यकर्त्यांचा, नैतिक गुणांचें संगो-पन करणारा गांधी–मतानुसारी संघ असल्यामुळें तो राजकारणांतील पक्षभेदाच्या अतीत असा संघ राहिला पाहिजे अशी संघाचे अध्यक्ष श्री. किशोर-लालजी मश्रूवाला, महात्मा गांधी व संघांतील अधिकारी सदस्य यांची नैतिक धारणा होती. आणि अध्यक्षपदासाठीं उभे राहिलेल्या दोन उमेदवारांच्या मतभिन्नतेमुळें व एकदम उपस्थित झालेल्या अशा पक्षभेदामुळें हा मोठा संघ देखील गांधीजींनीं विसर्जन करून टाकला !

## निवडणुकीमागील भिन्न विचारछटा

मागच्या महिन्यांत कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं जी निवडणूक झाली व जे मतांचे आंकडे प्रांतानि-हाय प्रसिद्ध झाले, तिच्यावरून कॉंग्रेसमध्यें देशा-पुढील निरनिराळ्या राजकीय धोरणांचा प्रश्न उप-स्थित झाला आहे असें म्हणतां येण्यासारखें नाहीं. महाराष्ट्रामध्यें मतें देणाऱ्या कॉंग्रेस सभासदांस श्री. पुरुषोत्तमदास टंडन ह्यांची विशेष वैयक्तिक माहिती असेल, त्यांचें व्यक्तिमत्त्व, ध्येय-धोरण, त्यांच्या राज-कीय आशाआकांक्षा, ह्यांबद्दल चिकित्सायुक्त ज्ञान मतें देणाऱ्या लोकांस असेल असें दिसून येत नाहीं. श्री. पट्टाभि सीतारामय्या ह्यांचें नांव वर्किंग कमिटीच्या सदस्यांमध्यें अनेक वर्षें झळकत राहिलेलें असल्या-मुळें, तें राजकारण जाणणाऱ्या लोकांच्या कानां-वरून अनेक वर्षें गेलेलें आहे, एवढाच फरक अध्यक्ष-

पदासाठीं उभे राहिलेल्या ह्या दोन उमेदवार व्यक्तीं-मध्यें आहे असें सामान्येंकरून म्हणतां येतें. महाराष्ट्रांतील काँग्रेसच्या मतदारांचीच फक्त ही मनोवृत्ति आहे असें नाहीं. बहुतेक सर्व प्रांतांमधून मतदारांची हीच मनोभावना असावी असें अनुमान करतां येण्यासारखें आहे. आणि म्हणून अध्यक्षपदाची ही निवडणूक पुढील राजकारणाच्या दृष्टीनें कांहीं खळबळ उत्पन्न करणारी आहे असें म्हणतां येत नाहीं.

राजकारणाच्या विचार-प्रवाहाच्या दृष्टीनें जरी ह्या निवडणुकीमध्यें विशेष स्वारस्य नसलें, तरी काँग्रेससंस्थेच्या स्थैर्याच्या, दृढते ( Solidarity )च्या, एकजिनसीपणाच्या, स्थितिस्थापकतेच्या दृष्टीनें ही निवडणूक महत्त्वाची आहे असें म्हणतां येण्यासारखें आहे. ह्या निवडणुकीमध्यें हिंदी-हिन्दुस्तानी, धार्मिक राज्य व धर्मातीत राज्य, भाषावार प्रांतरचना, पाकिस्तानाविरुद्ध आक्रमक वृत्ति, उत्तर-दाक्षिण ह्यांमधील भिन्नभाव, ह्या निरनिराळ्या विचारांच्या किंवा भावनांच्या छटा थोड्याबहुत अंशानें मिश्रित झालेल्या नसतील असें नाहीं. हे निरनिराळे विचार जरी मतें देणाऱ्या लोकांच्या हृदयांत डोकावत असले तरी त्या अस्फुट विचारांस कांहीं निश्चित राजकीय उपपत्तीचें किंवा मता-( Ideology ) चें स्वरूप प्राप्त झालेलें दिसून आलेलें नाहीं हें स्पष्ट आहे. अध्यक्षपदासाठीं उभे राहिलेल्या उमेदवारांनीं आपलें मतवैशिष्ट्य दर्शविणारीं पत्रकें काढलेलीं नव्हतीं. मतें देणाऱ्यांनीं देखील कांहीं ठराविक राजकीय ध्येयधोरणांची किंवा उपपत्तींची चिकित्सा करून मतें दिलेलीं आहेत असें म्हणवत नाहीं.

### काँग्रेसचें आतांपयतचें स्वरूप

तथापि ह्या निवडणुकीमुळें व त्यावरून दिग्दर्शित झालेल्या मतदानामुळें काँग्रेस संस्थेचा दबदबा, वजन, इभ्रत ही उत्तरोत्तर कमी होईल असा रंग दिसूं लागला आहे. आणि म्हणूनच ही घटना काँग्रेसच्या भवितव्याच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे. काँग्रेस ही हिंदुस्थानव्यापी अवाढव्य अशी राजकीय संघटना असली, तरी दीर्घ काल चाललेल्या एकाद्या सुसंघटित राजकीय पक्षाची ( Political Party) शिस्त, स्थैर्य, बांधेसूदपणा, परंपरा काँग्रेसमध्यें उत्पन्न झालेली नाहीं. स्वराज्य प्राप्त होण्याच्या पूर्वी काँग्रेस ही आंदोलन ( Movement ) उत्पन्न करणारी, चळवळ करणारी ( Agitational ) अशी एक संघटना होती. ती शिस्तबाज सुसूत्र घट्ट वीण असलेली ( well–knit. ) अशी राजकीय संस्था ( Institution ) नव्हती. त्याचप्रमाणें काँग्रेस हा एक सुसंघटित राजकीय पक्ष ( Political Party ) आहे, अशीहि काँग्रेसची वाढ झालेली नव्हती. दीर्घकाल एका धोरणानें कार्य करणाऱ्या राजकीय पक्षामध्यें परंपरागत घट्ट अशी सूत्रबद्धता साहजिकच निर्माण होते. अनेक वर्षें चाललेल्या राजकीय संस्थेमध्यें विशिष्ट बांधेसूदपणा निर्माण झालेला असतो. पक्ष किंवा संस्था ह्या दोन्ही दृष्टींची कसोटी काँग्रेसला लाविल्यास काँग्रेसचा उणेपणाच प्रत्ययास येतो. एका विशिष्ट दिशेनें स्वराज्य मिळविण्यासाठीं आंदोलन करणारी, सैल बंधनांनीं सभासदांशीं संबंधित झालेली अशी हिंदुस्थानव्यापी संघटना म्हणजे काँग्रेस असें काँग्रेसचें स्वरूप आतांपर्यंत म्हणजे स्वराज्यप्राप्तीपर्यंत होतें.

स्वराज्यप्राप्तीनंतर काँग्रेस ह्या संस्थेचें परिवर्तन होणें अपरिहार्यच आहे. काँग्रेसमधील कांहीं अधिकारी लोक स्वराज्यप्राप्तीनंतर काँग्रेसचें विसर्जन करावें असा सूर काढूं लागले. निवडणूक लढविणारा बलाढ्य राजकीय पक्ष म्हणून काँग्रेसचें रूपान्तर करावें, असें काँग्रेसमधील अनेकांस वाटूं लागलें.

### काँग्रेसच्या भवितव्याबद्दलची समस्या

महात्मा गांधीजींनीं आपल्या मृत्यूपूर्वी काँग्रेस हा लोकसेवक, नैतिक सत्याग्रही संघ व्हावा अशी योजना केली होती. ह्या गांधीजींच्या योजनेचा विचार करून शेवटीं काँग्रेसश्रेष्ठींनीं काँग्रेसमध्यें गांधीजींच्या लोकसेवकसंघाचें वैशिष्ट्य अंतर्भूत करून आणि राजकीय पक्षाचीहि उपयुक्तता काँग्रेसमध्यें रहावी असा हेतु धरून काँग्रेसचें सद्यःस्थितींत लोकोपयोगी राजकीय कार्य चालूं ठेवण्यासाठीं तिला त्यांच्या मतानें व्यवहार्य असें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. काँग्रेस कार्यकर्त्यांची कार्यक्षमता वाढावी म्हणून विधायक कार्याबद्दलचें एक प्रतिज्ञापत्रक काँग्रेस कार्यकर्त्यांकडून भरून घ्यावें असाहि उपक्रम नुकताच काँग्रेसनें सुरू केला. काँग्रेस ही संस्था नष्ट न



अनुक्रमणिका






करतां, तिच्यांत देशकालवर्तमान जाणून राजकीय पक्ष, जनसेवासंघ व गांधीमतप्रणाली यांचें मिश्रण करून लोकोपयोगी परिवर्तन घडवून आणावें अशी सर्व योजना कॉंग्रेसधुरीणांनीं आंखली.

कॉंग्रेसमध्यें गांधीवादी विचारसरणीचे जे थोडे निष्ठावान् लोक आहेत, त्यांना कॉंग्रेस ही संघटना गांधीमतानुसारी बनवावयाची आहे. गांधीजींचा राजकारणाबद्दलचा एक विशिष्ट, अनन्यसाधारण, क्षुण्ण ठराविक राजकारणापलीकडील, असा अपूर्व दृष्टिकोन होता. हिंदुस्थानास स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर हा दृष्टिकोन नेहमीच्या मामुली राजकारणांत कसा उमटवावयाचा ही बिकट समस्या गांधीविचाराच्या निष्ठावान् लोकांच्या पुढें आहे; गांधीजी हयात असतांना या दृष्टिकोनाची जबाबदारी त्यांच्या वैलक्षण्यपूर्ण, असामान्य अशा व्यक्तित्वावर अवलंबून होती; परंतु त्यांच्या मृत्यूनंतर गेल्या एका पिढीच्या गांधीप्रणीत राजकारणास नवीन परिस्थितींत कशी दिशा लावावयाची हा अत्यंत कठीण असा प्रश्न होऊन बसलेला आहे. जे थोडे निष्ठावान् गांधीवादी लोक राष्ट्रांत आहेत त्यांच्या मनांत या बाबतींत विचारमंथन चालूं आहे.

## निवडणूक लढविण्यास परिस्थिति प्रतिकूल

एकंदरींत कॉंग्रेसचें आंदोलनात्मक स्वरूप सध्यां राहूं शकत नाहीं हें स्पष्ट आहे. कॉंग्रेसचा एक मोठा सुसंघटित राजकीय पक्ष (Party) बनवावयाचा असल्यास त्यालाहि कांहीं कालावधीची गरज आहे. कॉंग्रेसला लोकसेवासंघाचें स्वरूप द्यावयाचें असल्यास तीहि कांहीं सोपी गोष्ट नाहीं. आणि कॉंग्रेसला गांधीवादी संघटना बनवायची असल्यास तीहि कांहीं कमी दुष्कर अशी घटना आहे असें म्हणतां येणार नाहीं. अशा प्रकारचें कोणतेंहि परिवर्तन लवकर घडून येणार नाहीं. अशा परिस्थितींत ज्यांनीं हिंदुस्थानी राजकारणाची धुरा गेलीं अनेक वर्षें खांद्यांवर वाळगली, त्यांनीं पुढील राजकारणदृष्ट्या एकतानतेनें, धीमेपणानें, एकमेकांबरोबर सहकार्याची पराकाष्ठा करून कॉंग्रेसचें तारूं हाकारलें पाहिजे. आणि म्हणूनच असें वाटतें कीं, वर्किंग कमिटीनें स्वतःपासून सुरुवात करून, रागद्वेष—अहंकारमिश्रित अशी लोकशाहीच्या निवडणुकीचीं चक्रें कॉंग्रेससंघटनेमध्यें सद्यःस्थितींत तरी निदान फिरूं देतां कामां नयेत. हिंदुस्थानांतील लोकशाही कोरी करकरीत नवीन अशी मांगल्यकारक वस्तु आहे. तिला हाताळण्याची कला मोठमोठ्या लोकांच्या देखील अंगांत भिनलेली आहे असें म्हणतां येणार नाहीं. लोकशाहीवांचून तर हिंदुस्थानचा तरणोपाय नाहीं. हिंदुस्थानसारख्या अवाढव्य देशांत जातिभेद, प्रांतभेद, धर्मभेद, वर्गभेद, वंशभेद, संस्कृतिभेद हे निरनिराळ्या रूपानें धुडघूस घालीत आहेत. सर्व देशाची तयारी व तपश्चर्या नसतांना स्वराज्याचे संपूर्ण अधिकार एकदम प्राप्त झाल्यामुळें अधिकारलालसेचें पिशाच हिंदुस्थानभर थैमान घालूं लागलें आहे. हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या भोंवतालचें सध्यांचें वातावरण नीतिमत्तेस, ध्येयवादास, सात्त्विक मनोवृत्तीस, देशप्रेमविषयक उन्नतिकारक सद्गुणांस मदत करणारें नाहीं.

कॉंग्रेस हीच एक राजकीय संघटना देशभर प्रभुत्व गाजविणारी आहे. दुसरे राजकीय पक्ष किंवा संघटना ह्या दुर्बल आहेत किंवा बाल्यावस्थेंत आहेत; शिवाय त्या संघटना किंवा पक्ष देशाच्या तयारीची किंवा संस्कृतीच्या पायरीची पर्वा न करतां परंपरा सोडून अव्यवहारी, अनैतिहासिक राजकीय विचारसरणीची कास, उतावीळ मनोवृत्तीच्या अधीन होऊन, धरतांनाहि आढळतात. अशा परिस्थितींत कॉंग्रेसची वाढ इष्ट दिशेनें होणें अत्यंत जरूरीचें आहे आणि म्हणूनच कॉंग्रेसमधील श्रेष्ठींनीं अध्यक्षपदाची अशी निवडणूक होऊं देण्यानें कोणत्याहि तन्हेनें कॉंग्रेसच्या इभ्रतींत भर घातली आहे, असें म्हणतां येत नाहीं. कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाचा मान, एक विचारानें कोणत्या तरी अधिकारी व्यक्तीस कॉंग्रेसश्रेष्ठींनीं आपलें शक्य तितकें अधिक सहकार्य देऊन, द्यावयास पाहिजे होता. अध्यक्षपदासाठीं निवडणूक लढविण्याचा पायंडा कॉंग्रेसनें घालावा अशी कॉंग्रेसची आजची परिस्थिति नाहीं. अशी निवडणूक सुखानें व खेळाडूपणा (Sportsmanship)नें होऊं देण्याइतकी लोकशाहीची वाढ कॉंग्रेससंस्थेंत देखील झालेली नाहीं. कॉंग्रेसचा पाया राजकीय पक्ष या दृष्टीनें, गांधीवादी संघटनेच्या दृष्टीनें किंवा जनसेवा-












## काँग्रेसची अध्यक्षीय निवडणूक

स्त अशा लोकसेवासंघाच्या दृष्टीनें अद्याप पुरा भरलेला नाहीं. काँग्रेसमध्यें सामील झालेले सहस्रावधि स्वार्थपरायण लोक पुढील निवडणुकीचें एक प्रभावी साधन याच दृष्टीनें केवळ काँग्रेसकडे पहात आहेत. स्वतःच्या महत्त्वाकांक्षेच्या पूर्तीसाठीं काँग्रेसचा फायदा ते घेऊं पहात आहेत. खरी लोकशाही अद्याप जनतेमध्यें रुजावयाची आहे. वर्किंग कमिटीसारख्या उच्च काँग्रेस संस्थांनीं देखील लोकशाहींतील निवडणुकीद्वारा लोकशाहीचा प्रत्यक्ष अनुभव घेऊनच हिंदुस्थानांतील लोकशाहींत सुधारणा घडून येईल असें मानणें वस्तुस्थितीस सोडून होईल असें प्रस्तुत लेखकास वाटतें. सत्प्रवृत्त, अनुभवी व वजनदार अशा काँग्रेसमधील लोकाग्रणींनीं स्वतःच्या आचरणामध्यें सहकार्याची पराकाष्ठा करून, महत्त्वाकांक्षेच्या आहारीं जाणाऱ्या निवडणुकी शक्य तोंवर टाळून, हळूहळू लोकशाहीचीं तत्त्वें काँग्रेससारख्या संस्थेंत व काँग्रेसच्या अनुकरणानें इतर संस्थांमध्यें रूढ केलीं पाहिजेत. असें न झाल्यास आमची लोकशाही हें झंझावातांत सांपडलेलें व कोठें तरी भरकटत जाणारें एक तारूं राहील व बाल्यावस्थेंत असलेल्या राज्यसंस्थेसहि अशा डळमळीत लोकशाहीमुळें धोका उत्पन्न झाल्याशिवाय राहाणार नाहीं. हा धोका टाळणें हें विचारी काँग्रेस-सभासदांचें कर्तव्य आहे. काँग्रेस श्रेष्ठींचें तर हें परमकर्तव्य ठरतें.

### मिठानें मीठपणा सोडला तर !

सध्यांचे राज्यकारभाराचे प्रश्न इतके बिकट, गुंतागुंतीचे व सर्व लक्ष वेधून टाकणारे आहेत कीं, राज्यकारभार करणाऱ्या काँग्रेसश्रेष्ठींस काँग्रेससंस्थेमध्यें सुधारणा घडवून आणण्यास फुरसत नाहीं, त्या संस्थेची निर्वेधपणें वाढ करण्याचा उद्योग करण्याइतका विसांवा त्यांना मिळूं शकत नाहीं असा युक्तिवाद निरुपयोगी व घातक आहे. राज्यकारभार करणाऱ्या काँग्रेसच्या जबाबदार लोकाग्रणींची शक्ति, सामर्थ्य व वैभव काँग्रेससंस्थेपासूनच मिळालेलीं आहेत, हें त्यांनीं विसरून चालावयाचें नाहीं. अधिकारपदावर आरूढ झाल्यामुळें व त्या कामाच्या गर्दीमुळें त्यांनीं काँग्रेससंघटनांची उपेक्षा करणें हें सद्यःस्थितींत स्वतःच्या व देशाच्या पायांवर कुऱ्हाड पाडून घेण्याइतकें आत्मनाशाचें कृत्य आहे. परंतु कोणत्याहि संस्थांचें सामर्थ्य व्यक्तींच्या सामर्थ्यापेक्षां अधिक असतें व तसें तें असण्यांतच समाजाची शक्ति व वाढ अंतर्भूत झालेली असते, याचें बाळकडू आमच्या देशांतील मोठमोठ्या वजनदार पुढाऱ्यांसहि मिळालेलें नाहीं. व्यक्तिनिष्ठतेचेंच वळण हिंदुसमाजास पिढ्यानुपिढ्या मिळालेलें आहे. व्यक्तिनिष्ठतेचें अहंकारमय वळण कमी होऊन संस्थांवरील निष्ठा व संस्थांची शिस्त, संस्थांमध्यें आत्मविसर्जन करण्याची शक्ति, आणि सांघिक सामर्थ्य हे गुण व्यक्तींमध्यें स्वराज्यप्राप्तीनंतर तरी झपाट्यानें वृद्धिंगत झाले पाहिजेत. खेळीमेळीनें, रागद्वेषाच्या आहारीं न जातां, व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा, असूया व मत्सर यांना थारा न देतां, लोकसेवेवरच दृष्टि केंद्रित करून, निवडणुकी लढविण्यास आम्हांमधील रथीमहारथी देखील शिकलेले नाहींत. अशा अवस्थेंत काँग्रेससारख्या राजकारणदृष्ट्या एकमेव अशा वजनदार संस्थेमध्यें अध्यक्षपदासाठीं ईर्ष्येनें निवडणूक लढविणें योग्य ठरूं शकत नाहीं; कारण आज काँग्रेसश्रेष्ठींनीं इतरांस खऱ्या लोकशाहीचे धडे देण्याची निकडीची गरज आहे. त्यांनींच स्वतः निवडणुकी लढवून राजकारण कलुषित करण्यास आरंभ केल्यास मिठानेंच मीठपणा सोडण्यासारखें आहे !

काँग्रेसच्या अध्यक्षपदाच्या प्रस्तुत निवडणुकीनें काँग्रेस ही आतां अवनतीच्याच घसरणीवर लागणार कीं काय अशी सकारण भीति निर्माण झाली आहे. अद्यापहि काँग्रेसच्या तारवाची ही गळती थांबवतां येणार नाहीं असें नाहीं. काँग्रेसचें भवितव्य वैभवशाली व्हावें अशी इच्छा ज्यांस आहे ते अशीच अपेक्षा करतील कीं, काँग्रेस या संस्थेमध्यें विशेषतः काँग्रेससंस्थेंतील वजनदार लोकाग्रणींमध्यें एकजिनसीपणा, सहकार्य, तात्त्विक निष्ठा व निरहंकार वृत्ति ह्यांचीच जोपासना झाली पाहिजे. हे गुण जबाबदार लोकांमध्यें वाढीस न लागल्यास काँग्रेस संस्थेचें व पर्यायानें देशाचें तें दुर्दैव ठरणार आहे असें दुःखानें म्हणावें लागेल.

प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# प्राचीचें प्रश्नचिन्ह : जपान

आजवर कोणत्याहि भूकंपानें मिळाला नसेल असा जबरदस्त धक्का ऑगस्ट १९४५ मध्यें जपानला मिळाला. त्यापूर्वी दोन हजार वर्षांत परकीयांच्या हातचा पराभव म्हणून तो कसा जपानी राष्ट्राला माहीत नव्हता. या युद्धांतहि जपानचा असा आकस्मिक अनपेक्षित पराभव होईल अशी कोणाची कल्पना नव्हती. परंतु अणु-अस्त्रापुढें दोन आठवड्यांच्या अवधींत जपानला दातीं तृण धरून शस्त्र खालीं ठेवावें लागलें. विजिगीषु, युयुत्सु, मानधन जपानी राष्ट्राच्या अंतःकरणावर केवढा आघात झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. परंतु तरीहि ज्या शिस्तींत जपाननें आपला पराभव स्वीकारला ती शिस्त त्याच्या शत्रूंनाहि कौतुकास्पदच वाटली.

आज जर्मनीच्या प्रश्नाकडे सर्व जगाचे डोळे लागून राहिलेले आहेत. जर्मनीचे चार तुकडे करून ते चौकडींत वांटण्यांत आल्याकारणानें जर्मनी साहजिकच रशिया-अमेरिकेमधील युद्धोत्तर संघर्षाचें प्रमुख केंद्र बनला. जपानवरील अधिकार अमेरिकेनें प्रामुख्यानें किंबहुना सर्वांशानें आपल्याच हातीं ठेवला. अतिपूर्वमंडळ (Far Eastern Commission) व मित्रसमिति (Allied Council) —या दोन समित्यांवर इंग्लंड, रशिया, चीन, ऑस्ट्रेलिया, हिंदुस्थान, आदि राष्ट्रांचे प्रतिनिधी आहेत ही गोष्ट खरी, व महत्त्वाच्या गोष्टींत या समित्यांचा सल्ला घेण्यांत व मानण्यांत यावा अशी संघटनेची अपेक्षा आहे हेंहि पण खरें. परंतु प्रत्यक्षांत मात्र मित्रसमितीचा अध्यक्ष, अमेरिकन प्रतिनिधि, प्रशासक जनरल मॅक्‌आर्थर याचीच सत्ता जपानी राजकारणांत अप्रतिहत चालू आहे. ती तशीच किती दिवस चालू राहील हेंहि आज निश्चित नाहीं.

या अमेरिकन वर्चस्वाला इतर राष्ट्रांची व अर्थातच विशेषतः रशियाची संमति नाहीं. जपानशीं करावयाचा युद्धोत्तर अंतिम तह याच कारणानें लांबणीवर पडत आला आहे व तसा तह होतांना याच मतभेदामुळें जपान हा रशिया व अमेरिका यांच्या संघर्षाचें स्थान होणार ही गोष्ट निश्चित आहे. याच दृष्टीनें जपानी प्रश्नाचें स्वरूप समजावून घेणें जरूरीचें आहे.

जपानच्या प्रश्नाचे आपल्या सोयीसाठीं आपल्याला दोन विभाग करतां येतील—(१) अंतर्गत प्रश्न (२) आंतरराष्ट्रीय प्रश्न. अन्तर्गत प्रश्नांत, जपानमध्यें लोकशाही स्थापन होऊं शकेल काय? हा महत्त्वाचा प्रश्न आहे. आंतरराष्ट्रीय प्रश्नांत युद्धोत्तर जपानला द्यावयाच्या सवलती--, हा महत्त्वाचा भाग आहे.

## जपानमध्यें लोकशाहीचा प्रयोग

जपानमध्यें लोकशाही स्थापन करणें हें आपलें ध्येय असल्याचें अमेरिकेनें घोषित केलें. त्यानंतर अलीकडे जपानमध्यें लोकशाही जवळजवळ स्थापन झाल्यासारखीच आहे अशीहि पण घोषणा जनरल मॅक्‌आर्थरनें करून टाकली आहे. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनीमध्यें स्थापन झालेल्या लोकशाहीच्या धिंडवड्यांचा इतिहास अद्याप जुना झालेला नाहीं. अशा परिस्थितींत जपानमधील लोकशाहीच्या यशस्वितेविषयीं जगाला शंका वाटावी हें अगदीं साहजिक आहे. अमेरिकन आदेशानुसार जपानी जनतेनें आपल्या नेहमींच्या शिस्तबद्ध रीतीनें लोकशाहीच्या प्रयोगाला सुरुवात मात्र केली आहे.

३ मे १९४७ रोजीं जपानच्या विधिमंडळानें स्वीकारलेली जपानची नवी राज्यघटना अंमलांत आली. अमेरिकन व ब्रिटिश राज्यघटनांची छाप

अर्थातच या राज्यघटनेवर पडलेली आहे. या राज्यघटनेप्रमाणें राजाचे सर्व शासनाधिकार काढून घेण्यांत आले. उमराव-सभा नष्ट करण्यांत आली. विधिमंडळाच्या दोन्ही गृहांतील सभासद लोक-नियुक्त असावेत असें ठरलें. स्त्रियांना मतदानाचा हक्क देण्यांत आला व नागरिक-हक्कांचा मसुदाहि पण मान्य करण्यांत आला. एकादा कायदा राज्य-घटनेंतील तत्त्वाच्या विरुद्ध असल्यास तो रद्द ठरविण्याचा अधिकार सर्वोच्च न्यायालयाला देण्यांत आलेला आहे.

मंत्रिमंडळ हें विधिमंडळानें निवडावयाचं आहे. कोणत्याहि पूर्वीच्या लष्करी वा आरमारी अधि-काऱ्याला मंत्री होतां येणार नाहीं, असा निर्बंध घालण्यांत आलेला आहे. 'कायमचा' शस्त्रसंन्यास जाहीर करण्यांत आलेला असून सार्वत्रिक लष्कर-भरतीला घटनेप्रमाणें बंदी करण्यांत आलेली आहे. 'आम्ही जपानी लोक, अमेरिकेच्या हातांतील बाहुलीं, आपली राज्यघटना अशी ठरवितों कीं,' अशीच जपानी राज्यघटनेची सुरुवात असावयास हवी होती, अशी टीका एका अमेरिकन टीका-कारानें केली आहे ! ती सार्थ नाहीं असें कोण म्हणेल ? परंतु कोणत्याहि राष्ट्राला अशा परिस्थितींत दुसरें तरी काय करतां आलें असतें ?

निवडणुकींत ७२ टक्के मतदारांनीं मतदान केलें. नवीन तंत्रानें राज्यकारभार सुरू झाला. जपानमध्यें लोकशाही खरोखरीच रुजली काय ? या प्रश्नाचा विचार करतांना इतर कांहीं गोष्टी आपण लक्षांत घेणें जरूर आहे.

युद्धपूर्व जपानमध्यें लोकशाहीला विघातक अशा तीन शक्ती होत्या. (१) राजा (२) झाइबत्सु किंवा 'अष्टधनिक' हा आठ धनाढ्य कुटुंबांचा वर्ग (३) लष्कर. यांपैकीं राजाचें अमर्याद स्तोम जपानमध्यें माजलें होतें. जपानी माणसाच्या अंतःकरणांत देवा-इतकेंच किंबहुना अधिकच उच्च स्थान जपानच्या राजाला मिळत असतें. राष्ट्रभक्ति व राजनिष्ठा हा जपानी लोकांचा जीवनधर्म होता. सर्व जपानच्या भावसामर्थ्याचें केंद्रस्थान राजा हें होतें. 'अष्टधनि-कां'च्या हातांत राष्ट्राची अर्थव्यवस्था होती. त्यांच्या भांडवलावरच जपानचे बहुतांश उद्योगधंदे चाललेले होते. १९३० नंतर लष्करानें या अष्टधनिकांची सत्ता कमी केली ही गोष्ट खरी. परंतु तरीहि त्यांना संपूर्णपणें डावलणें लष्करी हुकूमशाहीलाहि शक्य झालें नाहीं. मांच्युरिआवरील आक्रमणानंतर लष्क-राचा राजकारणावरील पगडा उत्तरोत्तर वाढतच होता. आणि लष्कर व लोकशाही यांचें किती सख्य असतें हें वेगळें सांगण्याचें कारण नाहीं.

युद्धोत्तर जपानमध्यें या तीनहि शक्तींना तडाखा बसला. एक उपयुक्त बाहुलें म्हणून राजाला राज्यपद नष्ट न करतां राहूं देण्यांत आलें, परंतु त्याचे सर्व अधिकार नाहींसे झाले. 'मी ईश्वरी अंश नाहीं' अशी कबुली त्याला जपानी जनतेसमोर आपल्या मुखानें वदावी लागली. जपानी उद्योगधंद्यांवर टाकलेल्या युद्धोत्तर कडक नियंत्रणांनीं धनिकवर्गाच्या सत्तेचें मूळच बरेचसें उखडल्यासारखें झालें. लष्करी संघटना तर पूर्णपणें नाहींशी करण्यांत आली. जपानी लोक-शाहीच्या मार्गांतलि तीन अडथळे तर असे दूर झाले.

परंतु लोकशाही कोणावर लादतां येत नाहीं हेंच सत्य कदाचित् इतिहास आपल्याला पुन्हां शिकवूं पहात असेल. जपानची अंतःप्रवृत्ति लोकशाहीला अनु-कूल नाहीं असें अनेक विचारवंतांना वाटतें. जेत्यांनीं लादलेली राज्यघटना कोणतेंहि राष्ट्र हार्दिक उत्साहानें राबवूं पाहील ही गोष्ट शक्य नाहीं. 'सुराज्यापेक्षां स्वराज्य श्रेष्ठ आहे' हीच पराभूत राष्ट्राची साह-जिक भावना राहणार. आणि जपानमध्यें सुराज्य तरी नांदेल असें कोणी सांगावें ? जपानच्या मह-त्त्वाच्या उद्योगधंद्यांवर घाला पडलेला आहे. जपानचें साम्राज्य हिरावून घेण्यांत आलेलें आहे. तेथून सुमारें एक कोटी जपान्यांची सक्तीनें परत जपानला रवा-नगी करण्यांत आलेली आहे. उत्पादन कमी व लोकसंख्या अधिक अशा परिस्थितींत जनतेचें राह-णीचें मान हें खालीं जाणारच व अशा आर्थिक दुरवस्थेंतच हुकूमशाही झपाट्यानें फोफावूं शकते. जपानमध्यें असा प्रसंग येणार नाहीं अशी ग्वाही कोण देऊं शकेल ?

## आंतरराष्ट्रीय राजकारणांतील पवित्रे

रशिया-अमेरिकेची दुही हें आज एक जपानचें आशास्थान आहे. या आंतरराष्ट्रीय संघर्षांतूनच जपानला हवी असलेली संधि कदाचित् मिळेल. या










दृष्टीनें आंतरराष्ट्रीय परिस्थितीचा विचार करावयास पाहिजे.

युद्धाच्या पूर्वी निरनिराळ्या कारणांनीं निरनिराळ्या राष्ट्रांना जपानची भीति वा असूया वाटत असे. एक नजीकचें साम्राज्यवादी लष्करी राष्ट्र म्हणून रशियाला जागरूक राहणें भाग होतें. मांच्युरियांत रशियन वर्चस्वाला मुख्यत्वें जपानचीच अटक होती. चीन तर प्रत्यक्ष जपानच्या आक्रमणाखालींच सांपडला होता. आस्ट्रेलिया, न्यू झिलंड वगैरे राष्ट्रांना युद्धकालीन जपानी आक्रमणाची भीति होती. ब्रिटनच्या पूर्वेकडील साम्राज्याला जपानच्या वाढत्या सामर्थ्यापासून धोका होता. अमेरिकेचे हितसंबंध चीनमध्यें गुंतलेले होते. अमेरिका व ब्रिटन या दोनाहि राष्ट्रांना जपानची जागतिक व्यापारक्षेत्रांतील चढाओढहि पण जाणवूं लागलेली होती. जपानला पायबंद घालणें सर्वांच्याच दृष्टीनें जरूरीचें होतें.

नोव्हेंबर १९४३च्या कैरो जाहीरनाम्याप्रमाणें जपानविषयीं खालील धोरण जाहीर करण्यांत आलें—
(१) जपानचें सर्व साम्राज्य हिरावून घेण्यांत येईल
(२) चीनचा भाग चीनला परत करण्यांत येईल.
(३) कोरिआला यथाकाल स्वातंत्र्य देण्यांत येईल. कोणताहि मुलूख आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याची मित्रराष्ट्रांची इच्छा नाहीं, अशी पुस्तीहि पण या जाहीरनाम्याला लावण्यांत आली. याल्टा येथील भेटीच्या वेळीं पुढील अटींवर जपानविरुद्ध युद्ध पुकारण्याचें कबूल केलें--(१) मंगोलियांत कोणीहि हस्तक्षेप करूं नये. (२) साखालीन बेटांचा दक्षिणार्ध व आसपासचीं बेटें रशियाला मिळावींत (उत्तरार्ध रशियाच्या आधींच ताब्यांत होता.) (३) क्यूराइल बेटें रशियाला देण्यांत यावींत.

८ ऑगस्ट १९४५ रोजीं रशियानें जपानविरुद्ध युद्ध पुकारलें त्याच दिवशीं दुसरा ॲटम बॉंब जपानवर टाकण्यांत आला. जपान शरण येईपर्यंत उत्तर कोरिया रशियानें व्यापून टाकला. दक्षिण कोरिया अमेरिकेनें आपल्या ताब्यांत घेतला. जर्मनीप्रमाणेंच तेथेंहि त्या दोन विभागांत निरनिराळी राज्यव्यवस्था सुरू झाली.

आज जपानच्या आंतरराष्ट्रीय प्रश्नाला या सर्व गुंतागुंतींतून वाट काढावयाची आहे. जपानचें लष्करी सामर्थ्य पूर्णपणें खची केलें पाहिजे याविषयीं सर्व राष्ट्रांचें एकमत आहे. लष्करी दृष्टीनें महत्त्वाचे नौकाबंधन, नौकानयन यांसारखे उद्योगधंदे देखील नाहींसे करण्यांत येत आहेत. कोणत्याहि परिस्थितींत आपल्या बळावर निदान एक शतक तरी जपानला वर डोकें काढतां येणार नाहीं, असेंच निरीक्षकांचें मत आहे. परंतु जपानला अन्य कोणी मदत केली तर? ही मदत चीन वा ऑस्ट्रेलिया करतील ही गोष्ट अशक्य आहे. जपानमध्यें कम्युनिस्ट-क्रांति होईपर्यंत जपानचें बळ वाढूं देण्यांत रशियालाहि धोकाच आहे. तेव्हां जपानी प्रश्नाकडे आज केवळ अमेरिकाच सहानभूतीनें पाहाणें शक्य आहे. या सहानुभूतीचा उगम अर्थातच रशियावरील अविश्वासांत सांपडतो. अमेरिकेपुढें पडलेला पेंच कांहींसा गंमतीदारच आहे.

अमेरिकेपुढील पर्याय खालीलप्रमाणें आहेत—
(१) आपली फौज निरंतर ठेवून कारभार हाकणें—परंतु याला आंतरराष्ट्रीय विरोध होईल व कालांतरानें जपानी प्रतिकार व द्वेषहि पण वाढेल. या द्वेषामुळेंच कदाचित् जपानी जनता रशियाकडे ओढली जाईल.
(२) जपानला पुन्हां सामर्थ्यसंपन्न करणें—परंतु हा भस्मासुर आपल्यावरच उलटणार नाहीं याची खात्री कोण देईल? (३) जपान स्वतंत्र परंतु लष्करी दृष्ट्या निर्बल ठेवणें— या परिस्थितींत रशियाचें जपानवर आक्रमण सोपें होईल. या तीनहि योजनांमध्यें अमेरिकेच्या दृष्टीनें असे धोके आहेत. गेल्या निवडणुकींत प्रातिनिधिसंभे-(House of Representatives)-मध्यें ४६६ सभासदांपैकीं ९२ सोशालिस्ट व फक्त पांचच कम्युनिस्ट निवडून आले ही गोष्ट खरी. परंतु जपानमध्यें निर्वात पोकळी निर्माण केल्यास कम्युनिस्ट क्रांतितंत्राच्या झंझांत जपान सांपडावयास कितीसा वेळ लागेल?

या दृष्टीनेंच जपानच्या अंतर्गत प्रश्नाकडे अमेरिकेला पाहिलें पाहिजे. जपानच्या साम्राज्याची व आजूबाजूच्या बेटांची व्यवस्था लावतांनाहि अमेरिकेपुढें हीच रशियाविषयींची साशंकता उभी राहील. कोरियामध्यें आजच दोघांचींहि तोंडें विरुद्ध दिशेला फिरलेलीं दिसतात. रशियाचा नाद सोडून



अनुक्रमणिका






## प्राचीचें प्रश्नचिन्ह : जपान

कोरियाच्या आपल्या ताब्यांतील विभागा-च्या व्यवस्थेस अमेरिका लागलेली आहे. जपानवरील प्रत्यक्ष वर्चस्व कालान्तरानें दूर केलें तरी अप्रत्यक्ष नियंत्रण राहावें म्हणून आजूबाजूची न्यूक्‌ बेटांतील ओकिनारासारखीं महत्त्वाचीं ठाणीं अमेरिका आपल्या ताब्यांत ठेवील असें दिसतें. साखालीन व क्यूराईल बेटें मात्र रशियाला देण्या-वांचून गत्यंतर दिसत नाहीं.

रशियावर पूर्वेकडून दहशत म्हणून व रशियाच्या चीनवरील वर्चस्वाला आळा म्हणून अमेरिकेला जपा-नचें महत्त्व आहे. अमेरिकेचे चीनमध्यें हितसंबंध आहेतच. शिवाय खुद्द जपान रशियाच्या हातीं जाऊं न देणें हीहि अमेरिकेच्या दृष्टीनें अत्यंत मह-त्त्वाची गोष्ट आहे. याच दृष्टीनें अमेरिकेचे पूर्वेकडील राजकारणांतील पवित्रे पडत राहतील व आज ना उद्यां जपानचा प्रश्नहि ज्वालाग्राही स्वरूप धारण केल्याखेरीज राहाणार नाहीं.

---

## चलनाविषयींची एक अभिनव सूचना (self-depreciating currency)

चलन हें आपल्या व्यवहारोपयोगी वस्तूंच्या विनिमयाचें माध्यम आहे. चलनाला स्वतंत्र असें अस्तित्व नाहीं. तेव्हां विनिमयाला पुरेसें तेवढेंच चलन चालू असलें पाहिजे. चलन वाजवीपेक्षां अधिक झालें आणि त्याचे सांठे साठूं लागले तर तेवढें चलन निरुपयोगी आहे; एवढेंच नव्हे तर तें सुरळीत आर्थिक व्यवहाराला अपायकारकहि आहे. शिवाय जें चालू (current) असेल तेंच चलन म्हणावयाचें! खाजगी तिजोरींत अथवा सार्वजनिक बँकेंत डांबून राहिलें तर तें चलन कसलें!

धनाचा संचय व पैशाचा संचय हा अधिकाधिक उत्पादनाला उपयुक्त आहे हें खरें! परंतु तो व्यवहारांत गुंतला असेल तेव्हांच; एरवीं नाहीं. परंतु व्याजाच्या आमिषामुळें संचयाकडे प्रवृत्ति वाढूं लागली आहे. पूर्वीं किंमतींत न उतरणाऱ्या अशा सोनें-चांदीसारख्या मौल्यवान् धातूंच्या देवघेवींशींच 'व्याजा'च्या संस्थेचा संबंध होता. परंतु आतां इतर कागदाप्रमाणें झिजणाऱ्या व फाटणाऱ्या कागदी चलनाशींहि व्याज ह्या संस्थेचा संबंध जडला आहे. व्याजाच्या आमिषामुळें चलनाकरितां काढलेलें चलन गोठून पडूं लागलें आहे; कारण त्यामुळेंच फायदा अधिक मिळतो. मोटारगाडी तबेल्यांत ठेवल्यामुळेंच ती जास्त लाभदायी ठरण्यासारखें हें झालें! (आणि पेट्रोलच्या काळ्या बाजारानें तसें झालेंहि!) परंतु हें सारें कृत्रिम आहे.

संपत्तीचे इतर प्रकार जसे कालानुक्रमानें किंमतींत कमी उतरतात (जसें इमारती, मशिनरी, कापड, धान्य, वाहनें इ.), त्याचप्रमाणें नाणीं व कागदी चलनें हींहि कालानुक्रमें आपोआप किंमतींत कमी भरण्याची सोय झाली पाहिजे. १ जानेवारीचा शिक्का असलेली नोट ३१ डिसेंबरला, १६ आण्यांपेक्षां कमी किंमतीची ठरली पाहिजे. दहा वर्षांपूर्वीच्याहि नोटा जर आज 'नवीन'च राहिल्या तर त्या अनावश्यक होत्या व म्हणून आर्थिक जीवनाला अपायकारक होत्या असा त्याचा अर्थ आहे. १९४८ सालच्या १ रु. च्या नोटीची किंमत १९४९ सालीं १५ आणे झाली, १९५० सालीं १४ आणे झाली, तर चलनाच्या सांठ्याला तसेंच चलनवाढीला आळा बसेल. छापविलेल्या नोटा बाहेर काढण्याची कोशीस सरकार करीत आहे; त्यालाहि ही योजना उपकारक ठरण्यासारखी आहे.

----**श्री. किशोरलालजी मश्रूवाला** [ हरिजन, ३१ ऑक्टोबर १९४८ वरून सारांशरूपानें ]



अनुक्रमणिका








प्रा. रा. ना. पुसाळकर

# वैद्यकीय साहाय्य स्वल्पमोली हवें

रीडर्स डायजेस्टच्या मे १९४८च्या अंकांत Medical kickbacks can be ended या नांवाचा विचारप्रवर्तक व पूर्ण माहितीचा लेख आलेला आहे. डॉक्टरी धंदा समाजाला अत्यंत आवश्यक आहे. वैद्यकशास्त्राच्या प्रगतीबरोबर 'तज्ज्ञां'ची संख्या वाढली आहे. अमेरिकेंत वैद्यकीय धंदा करणाऱ्या व्यावसायिकांना निरनिराळ्या उपशाखेंतील व्यावसायिकांकडून कमिशन देण्याची प्रथा इतकी वाढूं लागली कीं, त्यामुळें वैद्यकीय उपचार करून घ्यावयास गेलेल्या रोग्यास येणारें खर्चाचें बिल असह्य होऊं लागलें व यांतून मार्ग कसा काढावा याबद्दल प्रयत्न सुरू झाले. त्याची माहिती या लेखांत आहे.

## अमेरिकेंतील एक उदाहरण

वैद्यकीय सल्लागाराकडे गेल्यावर त्यानें दांत, डोळे, रक्त, मलमूत्र, अस्थि याप्रमाणें प्रत्येक विषयांतील तज्ज्ञ तपासनिसाकडे जाऊन प्रत्येकाचा रिपोर्ट घेतल्यानंतर अखेर सल्लागार रोगनिदान करीत व नंतर औषधीयोजना. याप्रमाणें प्रत्येक रोग्यास करावें लागे. निरनिराळ्या विषयाचे तज्ज्ञ तपासनीस त्यांच्याकडे रोगी गिऱ्हाईक पाठविल्याबद्दल त्यांना मिळणाऱ्या तपासणी-फीमधून त्यांच्याकडे सदर गिऱ्हाईक पाठविणाऱ्या डॉक्टरास रोखीनें रिबेट देत. या रिबेटचें उत्पन्न प्रत्येक डॉक्टरचें फार मोठें असें व हा बोजा रोग्यावरच पडे. सल्लागार डॉक्टर आपली स्वतःची फी वेगळी घेत असे. या प्रकारामुळें समाजांत असंतोष उत्पन्न होऊं लागला. वैद्यकीय उपचार ही बाब प्रत्येकाला आवश्यक असल्यानें व दिवसेंदिवस फार खर्चाची होऊं लागल्यानें त्यांतून मार्ग कसा काढतां येईल याचा विचार लॉस अँजेलिस येथील बेटर बिझिनेस ब्यूरो (Better Business Bureau) या संस्थेनें करावयाचें ठरविलें. त्यांना प्रथम यश मिळालें नाहीं. समाजांतील वजनदार व प्रमुख डॉक्टरांनीं त्यांच्या प्रयत्नाशीं सहकार्य करण्याचें नाकारलें. विनाश्रम मिळणारें रिबेटचें उत्पन्न कोणी स्वखुषीनें सोडण्यास कबूल होईनात. तोच प्रयत्न त्यांनीं किरणांच्या लॅबोरेटरीज् व इतर उपांगांच्या चिकित्सकांकडे केले व त्यांनीं रिबेट देऊं नये अशी विनंति करून पाहिलें. पण त्याचाहि उपयोग झाला नाहीं. तथापि त्यांनीं आपल्या प्रयत्नांची चिकाटी सोडली नाहीं. अखेर त्यांच्या प्रयत्नाला यश आलें. लॉस एंजेलिस येथील मेडिकल कौन्सिलनें ता. १ फेब्रुवारी १९४८ ला असा ठराव केला कीं, सदर कौन्सिलच्या स्थळसीमेंतील कोणाहि सभासदानें रिबेट घेऊं नये व जर कोणी रिबेट घेतल्याचें आढळून येईल तर त्याला मेडिकल कौन्सिलच्या मेंबरशिपमधून काढून टाकण्यांत येईल. याचा इष्ट तोच परिणाम झाला. लॅबोरेटरीजच्या फी शेंकडा पन्नास टक्क्यांनीं व कांहीं बाबतींत अधिक उतरल्या व त्याचा फायदा सामान्य जनतेला झाला.

अद्याप सबंध U. S. A. मध्यें ही सुधारणा झालेली नाहीं. पण ती वाट चालूं लागली आहे व लौकरच सबंध देशभर या सुधारणेचा पुरस्कार यशस्वीपणें होईल.

## इंग्लंडमधील 'राष्ट्रीय आरोग्य-विमा'

इंग्लंडमध्यें गेल्या वर्षी पार्लमेंटमध्यें याच विषयावर एक बिल आलें होतें. त्याचा हेतु : प्रत्येक डॉक्टरनें समाजांतील प्रत्येक रोगपीडित व्यक्तीस विनामूल्य उपचार केला पाहिजे व त्याच्या श्रमाबद्दल



अनुक्रमणिका

## वैद्यकीय साहाय्य स्वल्पमोली हवें

सरकार त्यांना श्रम-वेतन देईल. सदर सुधारणेविरुद्ध इंग्लंडमधील डॉक्टरवर्गांत फार खळबळ माजली. पण अखेर राष्ट्रीय आरोग्य-विमा (National Health Insurance) म्हणून सदर योजना—कायदा मंजूर झालेला आहे. त्याप्रमाणें इंग्लंड देशांत वैद्यकीय उपचार विनामूल्य प्रत्येकास मिळण्याची सोय झाली आहे व त्याचा खर्च सरकार देणार आहे.

इंग्लंड-अमेरिकेसारख्या संपन्न व पुढारलेल्या देशांत देखील जी बाब सामान्य माणसास डोईजड झाली म्हणून सुधारत आहे व सुधारली आहे, त्या दृष्टीनें इकडे आमच्या सरकारनेंहि विचार केला पाहिजे. आज सर्वसामान्यपणें पाहिलें, तर सामान्य जनतेवर हा भार असह्य होत आहे व झालेला आहे. वैज्ञानिक शोध व त्याचा फायदा प्रत्येकास मिळालाच पाहिजे. त्यांत गरीब-श्रीमंत हा भेद नसावा. श्रीमंताचा जीव हा गरीबांच्या जीवापेक्षां अधिक मोलाचा असतो असें कोणीहि म्हणणार नाहीं. तेव्हां आमच्या स्वतंत्र भारतांत वैद्यकीय उपचार हा सर्व समाजाला विनामूल्य मिळावयास हवा. त्यांत जात, धर्म, गरीब–श्रीमंत हे भेद नकोत. खुद्द मुंबईत गेल्या वर्षी असे प्रकार घडल्याचें प्रसिद्ध झालें आहे कीं, सार्वजनिक दवाखान्यांत देखील आसन्नमरण अशा अपघाती रोग्यास 'जातीच्या' कारणावरून प्रवेश मिळाला नाहीं. अशी गोष्ट पुनः स्वतंत्र राष्ट्रांत यापुढें घडणें अगर घडण्याची शक्यता राहणें राष्ट्रीय जीवनाच्या दृष्टीनें धोक्याचें वाटतें.

खासगी रीतीनें धंदा करून व्यवसाय करणाऱ्या वकील, इंजिनियर इत्यादि व्यावसायिकांवर कायद्यानें बंधनें आहेत. पण डॉक्टरी व्यवसाय करणारांवर त्या प्रमाणांत बंधनें नाहींत. वकिलाची फी कायद्यानें ठरविली आहे. तोच प्रकार इंजिनियरबाबत आहे व ह्या व्यवसायी लोकांचा समाजांत शेंकडां पांच ते दहा टक्के लोकांशीं संबंध येतो. पण डॉक्टरांचा मात्र शेंकडा ९९ टक्के समाजाशीं संबंध येत असल्यानें त्यांच्यावर फी व औषधांचे दर कायद्यानें अद्याप ठरविले नाहींत. त्यामुळें आज या बाबींमध्यें चढश्रेणीनें वाढ होत आहे व समाजाला फार चिंता उत्पन्न झाली आहे व होत आहे.

### हिंदुस्थानांत आशेचा किरण

ता.५ ऑक्टोबर १९४८ हा दिन फार महत्त्वाचा आहे. या दिवशीं हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल चक्रवर्ती राजगोपालाचारी यांनीं उद्योगधंद्यांतील नोकरांच्या वैद्यकीय साहाय्यासाठीं (Employees' State Insurance Corporation) नांवाच्या एका संस्थेचें उद्घाटन केलें. या संस्थेचा उद्देश कोळशाच्या खाणी, विजेचे कारखाने, कापड व लोखंड या धंद्यांतील नोकरांना यापुढें विनामूल्य वैद्यकीय उपचार देण्याचा आहे. या संस्थेनें तूर्त आरंभिलेल्या कार्याचा फायदा सुमारें २० ते २५ लक्ष कामगारांना मिळेल. ही संस्था म्हणजे आशेचा किरण होय.

मध्यमवर्गीय समाजाला अशा कांहीं तरी उपायांनीं तांतडीनें साहाय्य व संरक्षण आमच्या सरकारनें दिलें पाहिजे. मध्यमवर्गीय पांढरपेशे हे सर्व धर्मांचे, सर्व जातींचे व सर्वत्र आहेत. त्यांचीं उत्पन्नें मर्यादित आहेत. सध्यांच्या भयंकर महागाईच्या राहणीच्या काळांत जर त्यांना वैद्यकीय उपचाराबाबत ताबडतोब सरकारी साहाय्य मिळेल, तर सरकारची वेतनवाढ व महागाई भत्ता या साहाय्याहून अधिक उपयुक्त व महत्त्वाचें साहाय्य होईल. आज सामान्यतः मासिक प्राप्ति १००-१२५रु. असलेल्या चार माणसांच्या कुटुंबांत वैद्यकीय उपचारासाठीं निदान दरमहा २० ते २५ रुपये खर्च होतात. त्याला कारणें राहण्याच्या जागेची कमतरता, अन्नांत सकसपणा नसणें, दूधतुपाचें दुर्भिक्ष व इतर बाबतींत जीवन कष्टमय झालेलें—यामुळें सर्वसामान्य आरोग्य फार खालावलेलें आहे व त्यामुळें हा भयंकर खर्च त्याला करावा लागतो. तेव्हां आमचें प्रांतिक व मध्यवर्ति सरकार या दिशेनें केव्हां सुधारणा करतें त्याकडे इतर असंख्य मध्यमवर्गीयांप्रमाणें आम्हीं आशेनें पहात आहोंत.

———



अनुक्रमणिका






# अखिल-भारतीय प्राच्यविद्यापरिषद्, दरभंगा

अखिलभारतीय प्राच्यविद्यापरिषदेचें पहिलें अधिवेशन पुणें येथें १९१७ सालीं झालें. त्यानंतर दर दोन वर्षांनीं परिषदेचीं अधिवेशनें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतून भरत आलीं. यंदा परिषदेचें १४ वें अधिवेशन दरभंगा येथें ऑक्टोबर १५ ते १८ भरलें होतें. परिषदेचें उद्‌घाटन दरभंग्याच्या महाराजांनीं केलें. दरभंग्याचेच मूळचे रहाणारे हल्लीं बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे व्हाइस-चॅन्सेलर श्री. अमरनाथ झा हे स्वागताध्यक्ष असून, डाका विश्वविद्यालयाचे माजी व्हाइस-चॅन्सेलर डॉ. रमेशचंद्र मजुमदार हे परिषदेचे अध्यक्ष होते. परिषदेचे वेद, संस्कृत साहित्य, धर्म, तत्त्वज्ञान; भारतीय, द्राविड, इराणी संस्कृती इत्यादि विभाग पाडले होते. त्याबरोबरच हिंदी व मैथिली असे देशभाषांचेहि विभाग होते. दरभंगा किंवा मिथिला हें संस्कृत विद्येचें एक माहेरघर समजलें जात असल्यामुळें परिषदेबरोबरच पंडितसंमेलनहि भरविलें असून, त्याचेहि निरनिराळे दर्शन-वार विभाग होते. परिषदेला हिंदुस्थानांतील प्रांताप्रांतांतून सुमारें ३०० प्रतिनिधी उपस्थित होते. याच सुमारास हिंदुस्थानांत आलेले फ्रेंच प्राच्यविद्यापंडित प्रो. लुइ रनु ( Renou ) हेहि परिषदेस हजर होते.

## दरभंग्याचें आकर्षण

दरभंग्याबद्दल आधींपासूनच प्रतिनिधींच्या मनांत एक प्रकारचें आकर्षण होतें. हल्लींच्या दरभंगा या नांवाबद्दल अनेक व्युत्पत्ती देतात : दुआर आ बंग = बंगालचें द्वार, किंवा 'दारुभंग' लांकडें, झाडें तोडून बसविलेलें किंवा दरभंगखान नांवाचा एक मुसलमान सरदार होऊन गेला त्याच्यावरून नांव पडलें असावें असें म्हणतात. परंतु दरभंगा म्हणजे प्राचीन मिथिला. आपल्या प्राचीन संस्कृतीच्या जणूं आपण माहेरीं आलों आहोंत अशा प्रकारची ( Nostalgia ) भावना तेथें जमलेल्यांची होती. येथेंच पुण्यश्लोक वैदेह जनक होऊन गेला. जनकपुर नांवाचें गांव दरभंग्या जवळच आहे. साहजिकच प्रमुख वक्त्यांनीं आपल्या भाषणांत त्या पुण्यश्लोकाची आठवण करून त्या जीवन्मुक्त महाभागाच्या 'अनन्तं बत मे वित्तं यस्य मे नास्ति किंचन । मिथिलायां प्रदीप्तायां न मे किंचन दह्यते ॥' या वचनाचा उल्लेख करून श्रोत्यांच्या भावना पुलकित केल्या. त्याचप्रमाणें जनकतनयेच्या वास्तव्यामुळें हा प्रदेश साहजिकच 'जनकतनयास्नानपुण्योदक' आणि 'रघुपतिपदैः अंकित' असावा अशी श्रोत्यांची भावना असल्यास नवल नाहीं. येथेंच उपनिषत्कालीं जनकाच्या वादसभा जिंकणारा ब्रह्मिष्ठ याज्ञवल्क्य होऊन गेला. येथून जवळच असलेल्या वैशाली या गांवीं भगवान् बुद्धाचें कांहीं काळ वास्तव्य होतें. येथेंच न्यायदर्शनकार गौतम झाला. सुप्रसिद्ध मैथिलीय भक्त–कवि विद्यापति ह्याची हीच भूमि. –या सर्व पवित्र स्मृतींनीं प्रतिनिधींचीं मनें भरून गेलीं होतीं. याशिवाय आणखी एक आकर्षण परिषदेच्या योजकांनीं निर्माण केलें होतें. नेपाळची सरहद्द दरभंग्यालाच लागून आहे. नेपाळमधील सुप्रसिद्ध पशुपतिनाथ याचेंहि दर्शन घेण्याची संधि प्रतिनिधींना मिळेल असें आधीं जाहीर केलें होतें. परंतु नेपाळ दरबारनें ही परवानगी नाकारल्यामुळें प्रतिनिधींची निराशा झाली. फक्त भांडारकर प्राच्य-विद्या-संशोधन-मंदिराच्या 'महाभारता'चे मुख्य संपादक डॉ. बेलवलकर व त्यांचे कांहीं सहकारी यांना मात्र नेपाळच्या राजधानींत असलेल्या शांतिपर्वाच्या हस्तलिखित पोथीचें छायाचित्र घेण्याकरितां नेपाळांत जाण्याची परवानगी मिळून ते त्याप्रमाणें जाऊन आले. –या प्राचीन संस्कृतीच्या आकर्षणाबरोबर दरभंग्याचें किंवा उत्तर बिहारचें सृष्टिस्वरूपहि सुंदर व आकर्षक

होतें. तें पाहून आपल्या हिंदभूमीच्या 'सुजला सुफला, सस्यश्यामला' या सुप्रसिद्ध विशेषणांची सार्थता पटल्याशिवाय राहिली नाहीं. परंतु पावसाळा नुकताच संपून गेल्यामुळें हवा मात्र आल्हाददायक नव्हती, खूप उकडत होतें. त्यामुळें 'मलयजशीतला' या विशेषणाची मात्र विरोधानें आठवण होत होती.

## प्राच्यविद्यापंडितांपुढील कर्तव्य

हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतरचें परिषदेचें हें पाहिलें अधिवेशन. त्यामुळें बहुतेक सर्व अध्यक्षांच्या भाषणांतून भारत स्वतंत्र झाल्याबद्दलचा आनंद, त्याचबरोबर महात्मा गांधींच्या अमानुष परिस्थितींत घडलेल्या मृत्यूबद्दल दुःख—ह्या भावना प्रकट होणें अपरिहार्यच होतें. आपल्या स्वतंत्र हिंदुस्थानचें स्वातंत्र्य टिकविणें, आपणांपुढील असलेले प्रश्न सोडवून आपल्या देशास बलाढ्य करणें या कामीं आपणां प्राच्यविद्यापंडितांना काय करतां येईल याचे विचार जमलेल्या विद्वन्मंडळींच्या मनांत येणें स्वाभाविक होतें. परिषदेचे अध्यक्ष डॉ. रमेशचंद्र मजुमदार यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत प्रामुख्यानें याच प्रश्नाचें दिग्दर्शन केलें. ते म्हणाले,— "स्वामी विवेकानंदांची अशी श्रद्धा होती कीं, हिंदी संस्कृतींत प्रकट झालेल्या वेदान्तदर्शनानेंच मानवजातीचा उद्धार होईल. ही श्रद्धा उद्घोषून सांगतांना विवेकानंद असेंहि सांगत असत कीं, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्याशिवाय, स्वतंत्र होऊन हीं आपलीं वेदान्ततत्त्वें त्यानें आपल्या जीवनांत आचरून दाखविल्याशिवाय, जगांत त्यांचा स्वीकार व प्रसार होणार नाहीं-. ती वेळ आतां आली आहे. आपल्या प्राचीन संस्कृतींतील उदात्त तत्त्वांचें संशोधन करून आपली प्राचीन संस्कृति म्हणजे पुराणवस्तु—संग्रहांतील एक मनोरंजक कुतूहलजनक चीज नसून ती एक उदात्त जीवनपद्धति आहे हें पटविण्याचा आपण प्राच्यविद्यापंडितांनीं उच्चारानें व कृतीनें प्रयत्न केला पाहिजे. आधुनिक वैज्ञानिक संस्कृतींतील उत्तमोत्तम गोष्टी स्वीकारून, आपल्या रक्तांत असलेल्या प्राचीन संस्कृतीच्या मूलभूत तत्त्वांप्रमाणें आपण आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाची पुनर्घटना केली पाहिजे. आपल्या प्राचीन संस्कृतींमध्यें कोणतीं उदात्त तत्त्वें दिसून येतात ? माझ्या दृष्टीनें पहिलें तत्त्व म्हणजे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चारहि पुरुषार्थांचें परस्परांच्या अविरोधानें पालन हें होय. हे चारहि पुरुषार्थ जीवनांत सारख्याच महत्त्वाचे आहेत. माणसाची भौतिक गरज ही आध्यात्मिक गरजेइतकीच प्रभावी आहे. हे चारही पुरुषार्थ समबल मानून जीवनांत समतोलपणा राखूनच जीवन सफल होऊं शकतें. —आपल्या प्राचीन संस्कृतीचें दुसरें मूलभूत तत्त्व म्हणजे स्व कर्तव्याची जाणीव. माणसाला व समाजाला जसे हक्क असतात तशीं कर्तव्येंहि असतात. केवळ हक्कांवर भर देऊन कर्तव्यांत कसूर होण्याचा संभव असतो. अर्थात् एकाचें कर्तव्य तें दुसऱ्याचा हक्क असतें (उदा० राजानें जें प्रजेकरितां कर्तव्य म्हणून करावयाचें तें प्रजेच्या हक्काचें असतें), हें खरें. तरी पण त्याच गोष्टीकडे हक्क म्हणून न पहातां कर्तव्य म्हणून पहाण्यांत आपल्या संस्कृतीचा एक विशिष्ट दृष्टिकोन आहे.— आपल्या प्राचीन संस्कृतींत दिसून येणारी तिसरी गोष्ट म्हणजे परमतसाहिष्णुता व व्यक्तींना असलेलें विचारस्वातंत्र्य. सेश्वर दर्शनाबरोबर निरीश्वर दर्शनेंहि धर्म्य मानलीं जात असत. अशोकाची सर्व धर्मांबद्दलची औदार्यभावना सुविख्यात आहे. इकडे दोन सैन्यांमधील सैनिक एकमेकांच्या जिवावर उठून प्राणपणानें लढत असतांना, जवळच शेतांतील शेतकरी खुशाल आपापलें शेतीचें काम करीत असल्याचा आपला अनुभव एका प्राचीन ग्रीक वकिलानें नमूद करून ठेवला आहे—या आपल्या प्राचीन संस्कृतीच्या उदात्त तत्त्वांना मालिन्य येऊन आपली अवनति झाली हें खरें आहे. जातिभेदांचा बुजबुजाट, अस्पृश्यतेचा कलंक, स्त्रियांची मागासलेली व परवश स्थिति, खानपाननिषेधादि आचारधर्मांचें प्राबल्य—ह्या गोष्टी आपल्या अवनतीची धडधडीत साक्ष आहेत. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत आहे हा सिद्धान्त सांगण्याबद्दल जर युरोपमध्यें गॅलिलिओला शिक्षा झाली, तर आमच्याकडे तोच सिद्धान्त प्रतिपादन करणारा किंवा ईश्वर न मानणारा नास्तिक हा धार्मिक म्हणून गणला जात असे. पण त्यानेंच जर अभक्ष्यभक्षण केलें, समुद्रपर्यटन केलें तर तो धर्मभ्रष्ट समजला जाई ! हा केवढा विरोधाभास ! मन व








बुद्धि स्वतंत्र होतीं पण शरीर मात्र हजारों बंधनांनीं, शृंखलांनीं जखडलें होतें.... ! !– महात्मा गांधी आपल्या प्राचीन संस्कृतींतील उदात्त तत्त्वांचे मूर्तिमंत आदर्श होते. त्यांनीं तीं तत्त्वें आपल्या जीवनांत आचरून दाखवून युद्धभ्रान्त आणि श्रान्त जगाला तरणोपायाचा एक मार्ग दाखवून दिला आहे. एका थोर पुरुषानें म्हटल्याप्रमाणें, 'The world must choose between the Atom Bomb and Gandhiji' जगापुढें दोन गोष्टी आहेत : एक अणु-बॉंब, दुसरी गांधीजी. जग यांपैकीं कशाची निवड करणार यावर मानवजातीचें भवितव्य अवलंबून आहे. आपल्या प्राचीन संस्कृतींतील मूलभूत तत्त्वें किती चैतन्यपूर्ण ( dynamic ) आहेत, त्यांचा प्रभाव जगाच्या भवितव्यावर कसा होऊं शकेल. याचें स्पष्ट दिग्दर्शन आपणांस म. गांधींच्या उदाहरणावरून होऊं शकतें. ''

## हिंदुस्थानची राष्ट्रभाषा

परिषदेचे अध्यक्ष, स्वागताध्यक्ष व दुसरे अनेक वक्ते यांनीं ज्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला असा एक प्रश्न म्हणजे हिंदुस्थानची राष्ट्रभाषा कोणती असावी हा होय. या बाबतींत परिषदेनें शेवटीं विचारपूर्वक निर्णय देऊन असा ठराव केला कीं, हिंदुस्थानची राष्ट्रभाषा हिंदी, व लिपि देवनागरी असावी. परंतु हा बुद्धिनिष्ठ समतोल निर्णय घेण्यापूर्वीं परिषदेंत कांहीं मजेदार असे भिन्न विचारप्रवाह दिसून आले. अधिवेशनाच्या एका दिवशीं याच विषयावर एक वादचक्री ( symposium ) भरविण्यांत आली. त्यांत विरोधी पक्षांनीं आपापलीं मतें मोठ्या आवेशानें व वक्तृत्वपूर्ण रीतीनें मांडलीं. संस्कृत ही आपली राष्ट्रभाषा असावी या पक्षानें आपल्या बाजूच्या मंडनार्थ युक्तिवाद करतांना निरनिराळ्या थोर गृहस्थांनीं निरनिराळ्या प्रसंगीं प्रकट केलेल्या अनुकूल मतांचा आधार दिला. प्राच्यविद्यापरिषदेचे माजी अध्यक्ष सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित प्रो. एफ्. डब्ल्यू. टामस, बंगालचे हल्लीचे गव्हर्नर डॉ. कैलासनाथ काटजू यांनीं संस्कृत हीच हिंदुस्थानची राष्ट्रभाषा असावी असें आपलें मत अन्यत्र मोठ्या हिरिरीनें मांडलेलें आहे. त्याचा आधार वक्त्यांनीं दिला. मद्रास हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश श्री. रट्टी यांनीं देखील याच मताचें जोराचें मंडन केलेलें सुप्रसिद्ध आहे. श्री. रट्टी यांनीं म्हटलें आहे, "आपल्या भारतभूमीची सर्व संस्कृति संस्कृत वाङ्मयांत भरून राहिली आहे. हिंदुस्थानच्या मूलभूत ऐक्याची भावना जर आपणांस निर्माण करावयाची असेल, तर त्याकरितां सर्वांच्या अंतरंगांत शिरायचा खोल मार्ग म्हणजे संस्कृताचें अध्ययन हा होय. वाल्मीकीची एकादी पंक्ति, कालिदासाची एकादी उपमा, उपनिषदांतील एकादें उदात्त वचन जरी आपल्या नुसतें कानांवरून गेलें तरी आपल्या हृदयाचें तंतू छेडले जातात. भूतकाळाविषयींच्या आपल्या अंतःकरणांतील हजारों स्मृती जागृत होतात ! आज जरी वरपांगीं आपणांत विस्कळितपणा व फाटाफूट दिसत असली तरी आपण या भूतकालीन स्मृतींच्या समान स्निग्ध बंधनांनीं बांधले गेलों आहोंत!" या सर्व मतांचा वादचक्रींतील संस्कृताच्या कैवाऱ्यांनीं उल्लेख केला. कांहींनीं व्याकरणाच्या दृष्टीनें संस्कृत ही भाषा सोपी व सुगम करावी असें प्रतिपादिलें. अर्थात् संस्कृताच्या कैवाऱ्यांच्या युक्तिवादांत भावनेचाच भर जास्ती दिसून येत होता. बुद्धिनिष्ठ आणि व्यवहारी अशा हिंदीनिष्ठ प्रतिपक्षीयांनीं ते सहज खोडून काढले असल्यास नवल नाहीं. एका वक्त्यानें उत्तर देतांना म्हटलें कीं, 'संस्कृत ही स्तोत्र–भाषा आहे, ती राष्ट्रभाषा कधींहि होऊं शकणार नाहीं. ती जर सुगम, सोपी व सर्वजनसुलभ करावयाची तर त्यांत काय लाभ ? संस्कृत ही संस्कृत म्हणून रहावी, तिची हानि होऊं नये म्हणूनच ती राष्ट्रभाषा करूं नये.' प्रा. अळतेकर यांनीं कांहीं खडखडीत युक्तिवाद मांडले. ते म्हणाले, "राष्ट्रभाषा ही सर्व जनांना समजणारी व व्यवहारोपयोगी अशी भाषा असावयास पाहिजे. समुद्रगुप्त आणि चन्द्रगुप्त हे वेदविद्येचे मोठे चहाते; परंतु त्यांनीं आपले शिलालेख कांहीं वैदिक भाषेंत कोरवून घेतले नाहींत ? चॉसरची भाषा कितीहि लोकप्रिय असेल, पण ती कांहीं इंग्लंडची राष्ट्रभाषा होऊं शकत नाहीं ! आपल्या प्राचीन भाषेबद्दल आपणांला जरी खूप आदर असला, तरी आधुनिक काळीं बहुजनसमाजाला जी भाषा सुलभ तीच राष्ट्रभाषा होऊं शकेल, हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. ''



अनुक्रमणिका

सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ डॉ. सुनीतिकुमार चतरजी यांची गंमत झाली. ते स्वतः परिषदेला हजर होते. डॉ. चतरजी यांनीं पूर्वी तिरुपती येथील परिषदेचे अध्यक्ष असतांना 'संस्कृत हीच राष्ट्रभाषा होऊं शकेल' असें मत मांडलें होतें. पण नुकतेंच त्यांचें मतपरिवर्तन होऊन परिषदेच्या कौन्सिलमध्यें हिंदी ही राष्ट्रभाषा असावी या ठरावाला त्यांनीं पाठिंबा दिला होता, हें लोकांना कळलें होतें. त्यामुळें या वादचक्रीमध्यें दोन्हींहि परस्परविरुद्ध पक्ष आपल्या मतांच्या मंडनार्थ व दुसऱ्याच्या खंडनार्थ त्यांचा उपयोग करूं लागले. शेवटीं चतरजींना पुढें येऊन खुलासा करावा लागला. ते म्हणाले, "डॉ. जेकिल आणि मि. हाइड यांसारखी माझी स्थिति झाली आहे. माझें एक ध्येयवादी मन सांगतें कीं, संस्कृत ही राष्ट्रभाषा असावी. दुसरें व्यवहारवादी मन सांगूं लागलें आहे कीं हिंदी ही राष्ट्रभाषा असावी! 'अर्धं त्यजति पंडितः' या न्यायानें मी हिंदीला मान्यता देऊं इच्छितों. नाहीं तरी, संस्कृत ही हल्लींच्या देशी-भाषांच्या मधून जिवंत आहेच." वर दिलेल्या निरनिराळ्या विचारप्रवाहांवरून तज्ज्ञ म्हणविणाऱ्या पंडितांमध्येंहि वस्तुनिष्ठ व्यवहार्य विचारप्रवाहाबरोबर भावनाप्रधान अव्यवहार्य विचारप्रवाहही कसे असूं शकतात हें दिसून येतें.

### 'प्राचीन साहित्या'-(Classics)चा अभ्यास

संस्कृत ही राष्ट्रभाषा जरी नसली तरी त्यांतील 'प्राचीन साहित्या'-(Classics)-चा अभ्यास विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमांत समाविष्ट व्हावयास पाहिजे याची परिषदेला जाणीव दिसून आली. 'प्राचीन साहित्या'च्या अभ्यासाचें (the study of the classics चें) किती महत्त्व आहे याविषयीं स्वागताध्यक्ष श्री. अमरनाथ झा यांनीं आपल्या भाषणांत अतिशय मार्मिक, सुंदर आणि काव्यमय वर्णन केलें. ते म्हणाले, "भौतिक शास्त्राचा अभ्यास मी गौण लेखीत नाहीं. तो अत्यंत महत्त्वाचा आहे यांत शंकाच नाहीं; परंतु त्यावरच केवळ भर देण्याची प्रवृत्ति बळावूं देऊन उपयोगी नाहीं. प्रो. टायनबी यांनीं आपल्या 'Civilization on its trial' या ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें (These gadgets for harnessing the physical forces of non-human nature have left human nature unchanged), विज्ञाननिर्मित अनेक कल्पत्यांमुळें मनुष्याला निसर्गावर प्रभुत्व मिळालें असलें तरी मनुष्यस्वभावांत बदल घडून आलेला नाहीं. आपल्या अध्ययनाचें, अभ्यासाचें मध्यवर्ती लक्ष्य मानव, त्याचा स्वभाव, त्यांचीं ध्येयें, त्याची अंतःसृष्टि हें असलें पाहिजे. या गोष्टीकडे आपलें लक्ष केंद्रित करावयास 'प्राचीन साहित्या'चें आपणांस अत्यंत मोठें साहाय्य होणार आहे. या प्राचीन साहित्यामधून आपणांस सात्त्विक संतापाचे, धैर्याचे, शांतीचे, नम्रतेचे, अविनाशी सौन्दर्याचे किती दिव्य आदर्श दिसून येतात! आणि हे आदर्श अशा हृदयंगम भाषेंत वर्णिलेले आहेत कीं, इतक्या दीर्घ कालानंतरहि ते वाचून आपल्या हृदयांत त्यांचे पडसाद उमटतात. विशेषतः या जगांत वागावें कसें, जगावें कसें, आणि उदात्त ध्येयाकरितां मरावें कसें, हें आपणांस त्यावरून कळून येतें. 'प्राचीन साहित्यां'त दिसून येणारे निरनिराळे व्यक्तिविशेष बघितल्यास सिसरोनें आपल्या मुलाला लिहिलेल्या पत्रांतील एका वाक्याची आठवण होते: (You are going to visit men who are supremely men) 'तुला अशीं माणसें भेटतील कीं, ज्यांचा प्रमुख विशेष म्हणजे तीं माणसें आहेत!' कोणतेंहि 'प्राचीन साहित्य' घ्या. त्याचें जर आपण खरोखरी अवगाहन केलें तर आपणांला खरें शिक्षण मिळेल, ऑर्नाल्डनें म्हटल्याप्रमाणें 'आपली श्रद्धा अधिक शुद्ध पावन होईल, आपलीं अंतःकरणें निर्मळ होतील, उजळतील, आपणांस सत्याच्या ध्रुवताऱ्याचें दर्शन होईल आणि आपल्या ध्येयावर आपली दृष्टि स्थिर होईल.' ['the rigorous teachers will purge our faith and trim our fire, show us the white star of Truth, and there bid us gaze, and there aspire']"

### मध्यवर्ती संशोधन-संस्था

परिषदेनें केलेल्या ठरावांपैकीं आणखी एक उल्लेखनीय ठराव म्हणजे हिंदुस्थानांत एक मध्यवर्ती प्राच्यविद्या-संशोधन-संस्था (Institute of Indological Research) मध्यवर्ती सरकारनें काढावी अशाबद्दलचा होता. अशा मध्यवर्ती संशो-

धनसंस्थेमार्फत भारतांतीलच नव्हे तर ईजिप्त, इराण चीन, जावा, सुमात्रा, सिलोन वगैरे भारतसंबध्द देशांतील भाषा, इतिहास, कला, साहित्य इत्यादि गोष्टींचा अभ्यास होऊन हिंदी संस्कृतीचा खऱ्या व्यापक अर्थी प्रचार होण्यास मदत होईल. यासंबंधीं परिषदेसमोर हिंदुस्थानच्या पुराणवस्तुसंशोधनखात्याचे प्रमुख ( Director-General ) श्री. चक्रवर्ती यांचें एक भाषण झालें, त्याचा उल्लेख करणें उचित होईल. हिंदुस्थानामध्यें या पुराणवस्तु-संशोधन-विषयाची किती भयंकर अनास्था आहे, याचें वर्णन करतांना त्यांनीं ग्रेट ब्रिटनचें उदाहरण देऊन सांगितलें कीं, १९४७ सालीं ब्रिटिश सरकारनें नेमलेल्या स्कारबरो कमिटीनें, 'प्राच्य देशाशीं आपले जे संबंध बदलत आहेत ते लक्षांत घेऊन प्राच्य देशांतील समाजाचें ज्ञान अधिक करून घेण्याकरितां, त्यांच्यामध्यें अधिक सदिच्छा निर्माण करण्याकरितां' प्राच्य विद्यांचें अध्ययन व अध्यापन अधिक जोमानें व सुसंघटित रीतीनें चालू ठेवण्याबद्दल शिफारस केली, व त्या शिफारशीनुसार ब्रिटिश सरकार आज हिंदुस्थानच्या किती तरी पटींनीं प्राच्यविद्याशिक्षणावर खर्च करीत आहे.

प्राच्यविद्यापरिषदेचें जें पुढील कार्यकारी मंडळ निवडलें गेलें त्यावर एकंदर १८ सभासदांपैकीं सुमारें दहा महाराष्ट्रीय आहेत हें लक्षांत घेतल्यास प्राच्यविद्यासंशोधनांत महाराष्ट्रीय पंडित किती आस्थेनें आपलें मन घालीत आहेत हें दिसून येईल. ज्या महाराष्ट्रांत भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूटसारख्या प्राच्यविद्यासंशोधनसंस्था काम करीत आहेत, त्या महाराष्ट्रांतील विद्वान् पंडितांना ही गोष्ट भूषणावहच आहे. पुढील वर्षी प्राच्यविद्यापरिषदेचे चिटणीस पुण्याचे डॉ. रा. ना दांडेकर व बनारसचे प्रा. अ. स. अळतेकर हे असून पुढील अधिवेशन पुढील वर्षी मुंबईला होणार आहे.

**—वि. म. वेडेकर**

---

## " धर्म–विजय "

असा एकहि देश नाहीं कीं, ज्यामध्यें श्रमण ब्राह्मण असणारे पंथ नाहींत. असा कोणताहि देश सांपडणार नाहीं कीं, ज्यांत लोकांच्या मनांत कोणत्या ना कोणत्या पंथांविषयीं श्रद्धा असणार नाहीं. कलिंग देशांत जितके लोक मारले गेले किंवा मेले किंवा शत्रूंच्या हातीं सांपडून बंदिस्त झाले, त्यांच्या शतांश किंवा सहस्रांश देखील जर आज नाश पावले तर त्याबद्दल देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाला फार दुःख होईल ! ज्या कोणीं अपकार केला असेल त्याला देखील जर माफी देणें शक्य असेल तर माफी देण्यांत येईल. देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या अमलाखालीं जो कांहीं जंगलाचा भाग असेल, तेथील लोकांशीं देखील जुळतें घेण्याचें धोरण ( अनुनय ) स्वीकारून तो त्यांना शान्त ठेवील. असें जर न केलें तर देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाला पश्चात्ताप होईल. कारण त्याची अशी इच्छा आहे कीं, पाप करणाऱ्याला लज्जा वाटूनच ( अवश्य ) शिक्षा व्हावी; प्रत्यक्ष दंड करून त्याला शिक्षा होऊं नये. देवाच्या प्रिय प्रियदर्शी राजाची अशी इच्छा आहे कीं, सर्व प्राणिमात्रांच्या ठायीं निर्भयता, स्वतःवर ताबा, सर्वांशीं सारखी रीत, व मृदुता हीं असावींच. अशा प्रकारचा लोकांवर मिळविलेला विजय, यांसच धर्म-विजय म्हणतां येईल; आणि असलाच धर्म-विजय देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाला महत्त्वाचा वाटतो.

— **सम्राट् अशोकाच्या शिलालेखांतून** ( धर्मचक्र मासिक, १५ नोव्हेंबर १९४८ च्या अंकांतून )












वर्ष दुसरें
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

आर्य महौषधालय : आयडियल फर्निचर वर्क्स : डॉ. पुरोहित फार्मसी : गजानन जनार्दन बोडस : कैसरी इंडस्ट्रियल्स लि. : साठे बिस्किट कंपनी : रॉय आणि कंपनी : आयुर्वेद रसशाळा लि. : आयुर्वेदाश्रम फार्मसी लि. : अब्दुल हुसेन अल्लाबक्षजी : धि सेंट्रल पॉटरीज लि. : विष्णू फार्मसी : दि सह्याद्रि विमा कंपनी लि : सेंट्रल ग्लास फॅक्टरी :









नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका





---

## जाहिरातीचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळां | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानांपेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | १५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | १२० रुपये |

(१) सर्व जाहिराती ‘जाहिराती व जाहिरातदार’ या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥''×५।''

व्यवस्थापक
**‘नवभारत’**
२९१ शनिवार, पुणें २.

# वर्गणीदारास सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोष्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाही तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोष्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरीतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(३) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(४) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत'**,
२९१ शनवार पेठ, पुणें २.

---

# एजन्सीबाबत खुलासा

'नवभारत' हें एक उच्च दर्जाचें, वैशिष्ट्यपूर्ण मासिक मराठींत आहे, असा अभिप्राय अनेक वृत्तपत्रांनीं दिलेला आहे. अशा तऱ्हेच्या मासिकाचा प्रसार जास्तींत जास्त व्हावा यासाठीं ठिकठिकाणीं एजन्टस् नेमण्याची योजना आम्हीं तयार केलेली आहे. एजन्सीचे साधारण नियम पुढें देत आहे. तपशीलवार नियमांची मागणी कचेरीकडे केल्यास ते पाठविले जातील.

(१) विक्रेत्यानें कमींत कमी चार अंक घ्यावेत. अंक न खपल्यास परत घेतले जाणार नाहींत.

(२) डिपॉझिट म्हणून कमींत कमी दहा रुपये आमचेकडे जमा ठेवावेत.

(३) पंचवीस अंकांपेक्षां जास्त मागणी असल्यास एजंटास एक प्रत दिली जाते.

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२९१ शनवार पेठ, पुणें २.





Regd. No. B. 5177

# आमचें नवें प्रकाशन

महाराष्ट्र-वाङ्मयांत महत्त्वाची भर घालणारा नवा ग्रंथ

# ज्ञानेश्वरी-अंतरंग

लेखक : डॉ० रा. द. रानडे, एम्. ए., डी. लिट्.

अनुवादक : प्रा० कृ. वें. गजेंद्रगडकर, एम्. ए.

पृष्ठसंख्या १४० : मूल्य २॥ रुपये

डॉ० रानडे यांच्या Mysticism in Maharashtra या सुप्रसिद्ध ग्रंथाचा मराठी अनुवाद खालील पांच खंडांत प्रकाशित करण्याचें आम्हीं योजिलें असून तदनुसार वरील ग्रंथाचें प्रकाशन होत आहे:—

१ **ज्ञानेश्वर** :— चरित्र आणि तत्त्वविवेचन
पूर्वार्ध : ज्ञानेश्वरी—अंतरंग
उत्तरार्ध: मूळ ग्रंथकाराची प्रस्तावना, भारतीय अनुभूतिशास्त्राचा विकास, अमृतानुभव, चांगदेवपांसष्टी, अभंग इ.

२ **रामदास**:— चरित्र आणि तत्त्वविवेचन

३ **तुकाराम**:— चरित्र आणि तत्त्वविवेचन

४ **नामदेवादि संत**:— चरित्र आणि तत्त्वविवेचन

५ **एकनाथ**:— चरित्र आणि तत्त्वविवेचन

★

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २

अनुक्रमणिका